# गजाभाऊ



लेखक

रा म त न य

जोशी ब्रदर्स
प्रकाशक व पुस्तक विक्रेते
गौळीगुडा, हैद्राबाद.

किंमत रु. १-८-०

व्हीनस बुकस्टॉल : पुणे २

# निवेदन

गजाभाऊ हातावेगळा करून मी माझ्या वाचकमित्रांच्या हातीं देत आहें. अशा प्रकारचें कथानक लिहावें, असा मी कांहीं वर्षांपूर्वी संकल्प केला होता. पण तो ह्या नाहीं या कारणांमुळें मागें पडत गेला. तो मूर्त स्वरूपात येण्याकरिता माझे मागें प्रकाशक मित्र वारवार आठवण करीत होते, त्यामुळेंच हें पुस्तक पुढें आलें आहे. तेव्हां याचें पुष्कळसें श्रेय प्रकाशकांना आहे, हें उघड आहे.

पन्नास वर्षांपूर्वीचें ग्रामीण जीवन गजाभाऊमध्यें रेखाटण्याचा मी प्रयत्न केला आहे. त्या जीवनांतील बहुविध अंगें-उपांगें या पुस्तकांत सूत्ररूपानें आढळतील. त्या जीवनातील सामाजिक, धार्मिक आणि शैक्षणिक दृश्यांच्या छटा विद्यार्थ्यांना तर विशेष उद्बोधक वाटतील. सध्यां महाराष्ट्रातील सामाजिक जीवन क्रांतिदर्शी रून झपाट्यानें पुढें सरकत आहे. त्याची पार्श्वभूमि ह्या भागांत त्याना कांहीं अंशीं तरी कळूं शकेल. आपण ज्याना जुन्या पिढींतील चारित्र्यसंपन्न माणसें म्हणतों, त्यांची ओळख कथानकांतील विशिष्ठ पात्रांच्या स्वभावचित्रणात सापडू शकेल.

कथानकांतील पात्रें व स्थळें पूर्णपणें काल्पनिक आहेत. तें वाचीत असतां पन्नास वर्षांपूर्वीच्या जीवनांत निखालस आपण आहोंत, कथानकातील व्यक्ति जणू आपल्या घरांतही वावरत आहेत, आणि त्यांचें चारित्र्यसंपन्न उदात्त जीवन आपल्यास मार्गदर्शन करून स्फूर्ति देत आहे, अशी स्वानुभूति विद्यार्थिमित्रांमध्यें निर्माण होऊं शकेल असा मला भरंवसा वाटतो.

१५ ऑगस्ट १९५१ रामतनय

# — रामतनय यांचें वाङ्मय —

## प्रकाशित

१ मोहित्यांची मंजुळा किं. ३ रु. (दुसरी आवृत्ति)
२. खरा उद्धार किं. ३ रु. (तिसरी आवृत्ति)
३. साखरगोटी कि ५ रु.
४. तिघीजणी किं. ३ रु.
५. प्रमिलाबेन किं. ४ रु.
६. तापीतीरीं (छापत आहे.)

## विद्यार्थ्यांकरितां

१. कॅ. प्रताप किं. १। रु. (दुसरी आवृत्ति)
२. खरा उद्धार किं. १। रु. (पांचवी वि. आवृत्ति)
३. गजाभाऊ किं. १॥ रु.

## बालवाचन

१. रामायण आणि महाभारत गोष्टी भाग १ किं. ५॥ आणे
२. रामायण आणि महाभारत गोष्टी भाग २ किं. ६ आणे
३. बाळू नि बगडी किं ६ आणे
४. आंधळेपण गेलें किं. ४ आणे
५. मंतर तंतर किं. ४ आणे
६. खंडेरावाचें सोनगांव किं. ४ आ.
७. माणिक-मोतीं किं. ४ आणे
८. लगीन पण लगीन किं. ४ आ.

## आगामी

१. कॅ. प्रताप भाग २
२. दुहेरी धार
३. एक प्राचीन दिव्य कथा
४. मोहित्यांची इंदिरा
५. गजरा
६. बाळ्या

# गजाभाऊ

प्रकरण पहिलें

माझें नांव गजानन. आतां मला गांवचे लोक गजाननराव म्हणतात. पण लहानपणीं मला माझे मित्र गजा म्हणत असत. पुढें ते मला गजाभाऊ म्हणू लागले. खरोखर सांगावयाचें म्हणजे, मला गजाभाऊ हेच नांव फार आवडते. कारण त्यांतील भाऊ या शब्दानें बंधुत्वाची भावना जागृत होते; आणि तीच मला फार प्रिय आहे.

आतां माझी साठी उलटलेली असली, तरी माझें शरीर चांगलें दणकट आहे. लाथ मारीन तेथें पाणी काढीन, इतका उत्साह माझ्या आंगीं आहे.

जन्मभर मी सदाचार सोडला नाहीं. कर्तव्यकर्म करण्याचें टाळलें नाहीं. सतत उद्योग करीत राहिलो. माझे पूर्वकर्म म्हणा, योगायोग म्हणा, अथवा मी विचारपूर्वक केलेले प्रयत्न म्हणा, त्यायोगें मला माझ्या पूर्वायुष्यांत नसलें तरी, आयुष्याच्या उत्तरार्धांत सतत यश लाभत गेलें. "यत्न तो देव जाणावा" हा सत्पुरुषांचा उपदेश मी आजपर्यंत पाळीत आलों आहें.

'विशी विद्या व तिशी धन' अशी एक म्हण आपल्या भाषेंत आहे. पण माझ्या खऱ्या विद्येची सुरवात विशी उलटल्यावरच झाली! आणि माझी भाग्यरेषा खुलू लागण्यास आरंभ झाला, तो तिशी उलटल्यानंतरच होय!

कांहीं अज्ञात अशी चिच्छक्ति आहे, तीच बुद्धिदाती आहे. ऐन संकटकालीं मला तिच्याकडून स्फूर्ति मिळालेली आहे. संकटें माझ्यामागें

हात धुऊन लागतात, पण धैर्यानें त्याना तोड देण्यातच मला खरा पुरुषार्थ वाटतो. पूर्व आफ्रिकेंत, जर्मनींत मीं उद्योगाची शिकस्त केली ! त्यात मला कित्येक वेळां अपयश आलें, पण त्यावर मात करण्याचे सामर्थ्य, बुद्धि आणि योजकता परमेश्वरानें ऐन वेळीं मला दिली ! त्याच्याच कृपेनें साऱ्या आपत्तीशीं झगडत झगडत मी यशाचे शिखर गाठलें !

मी मूळचा अतिदरिद्री, पण आज चागला ऐश्वर्यसपन्न आहें ! पण त्या ऐश्वर्याला भुलून मी जात नाहीं. मिळालेले भाग्य सतत राहीलच असें नाहीं. मला ज्याच्या स्फूर्तीमुळें ही स्थिति प्राप्त झाली, त्याची स्मृति, त्याचा उपदेश माझ्या मनात सतत जागृत राहिलेला आहे.

**मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव.** असा उपनिषदातील आदेश सर्वांना महशूर आहे. मी श्रद्धेने या आदेशातील कर्तव्यें पार पाडण्यात दक्ष असतो. ही दक्षता मला यशाच्या मार्गाकडे नेते.

माझी आई, माझे वडील याच्या आचारविचाराचा योग्य परिणाम झालेला माझा पिंड आहे. त्याची स्मृति जागृत राहावी, अशी त्याच्यासंबंधीं काहीं कृति करावी, ह्यासाठीं मी दोन तीन वर्षांपूर्वीं माझे मूळगाव देवगाव येथे जाऊन काहीं दिवस राहिलों. तेथील माझे जिव्हाळ्याचे जुने मित्र सदोबा गुरव, बाबुराव मोरे आणि ज्ञानोबा मुसळे वगैरे मित्राना मी भेटलो. सर्वांना आनद झाला. त्यावेळीं आमच्या लहानपणच्या जुन्या आठवणी जागृत झाल्या.

माझ्या मुलापैकीं शिवानंद आणि सदानंद हे दोघे सुविद्य मुलगे देवगांवांत माझ्याबरोबर नेहमीं असत. त्याना आमच्या जुन्या गप्पागोष्टी ऐकून आश्चर्य वाटे !

ज्या गावीं मी बेकार होतों, जेथें मी अन्नाला महाग झालों, जेथें माझे वडील बापू यानीं दारिद्र्याचे चटके सोसले, तेथें मीं गावच्या हद्दीतील जंगलानजीकची फार मोठी पड असलेली जमीन संपादन करून ठेविली होती. स्वातंत्र्योदयानंतर मी त्या शेतीची अद्यावत् सुधारणा केली. ताली घातल्या; लहान लहान बंधारे बाधले; विहिरी खगल्या; अशा प्रकारें ती जमीन सुपीक केली आणि तिची सारी

व्यवस्था बाबू मोरे यांच्याकडे सोपविली. ही सारी शेती माझ्या वडिलांचें स्मारक म्हणून मी देवगावच्या जनतेसाठीं दिलेली आहे.

माझ्या गावात कोणी बेकार राहूं नये, अशी कल्पना ह्या स्मारकाच्या मुळाशीं आहे. ज्याला उद्योग पाहिजे असेल, त्यानें त्या शेतात खपावें. पोटभर अन्न खावे. कुटुंबपोषणही करावें. शेतीच्या सुधारणेसाठीं लागेल तो भांडवली खर्च मी करणार आहे अन्नधान्याच्या बाबतींत माझा गांव स्वावलंबी व्हावा, अशी ती योजना आहे.

माझी आई परोपरीने साऱ्या गावची सेवा करीत असे. अशी सेवा करिता करिताच तिनें त्या गावीं देह ठेविला. तिचें स्मरण नित्य राहावे, म्हणून मी माझ्या घराच्या जागेत सुधारलेल्या पद्धतीचें भव्य रुग्णालय स्थापन करण्याचे ठरविले आहे.

माझी वडील बहीण ताई हिची त्या गांवांतील कर्तबगारी फार महत्त्वाची आहे. तिच्या दिव्य चारित्र्याची आठवण सतत सर्वांना राहावी, ह्यासाठीं तिच्या नावाने एक मोठी विहीर खणून तिचा उपयोग गांवच्या सर्व जमातींना व्हावा, ह्यासाठीं तिला दहा बारा लोखंडी राहाट बसविणार आहे. ,शिवाय तेथेच सुंदर शिवालय स्थापन करून त्याच्या सभोवतीं आम्रवृक्षांची व नारळींची राई आणि छोटीशी फुलबाग तयार करून त्याची सर्व व्यवस्था माझे मित्र सदोबा गुरव यांच्याकडे सोपविणार आहे.

ह्या सर्व योजनांसाठीं मी मोठी रक्कम निराळी काढून ठेविलेली आहे. ती रक्कम आणि ह्या तिन्ही योजनांची व्यवस्था करण्याचें कार्य करणें ह्यासाठीं माझे वरील तीन मित्र आणि शिवानद व सदानंद हे दोघे चिरंजीव ह्याना विश्वस्त नेमण्याचें मी देवगांवांतच निश्चित केलें. त्या वेळीं माझा मुलगा सदानद म्हणाला,

“भाऊ! ही चागली योजना तुम्ही केली. आम्ही पुढची सारी व्यवस्था पार पाडूं. देवऋण, पितृऋण आणि गांवांतील समाजाकरितांच हे सर्व तुम्ही करीत असल्यामुळें समाजाचें ऋणही तुम्ही फेडीत आहांत. संपत्तीचा सद्विनियोग होत आहे, पण आम्हांला तुमच्या लहानपणची

काहीं माहिती नाहीं. तारुण्यात तुम्ही केलेल्या व्यापाची योग्य अशी कल्पना नाहीं. तुमचं आयुष्य कोणत्या दिव्यातून पार पडले, हे कांहीं माहीत नाहीं. तें तुम्ही आम्हाला सागा. आपल्या गांवचे तुमचे मित्र आहेतच त्यांत भर घालायला!"

"हो!" थोडा विचार करून मी म्हटले, "माझें आयुष्य तें काय यःकश्चित! लहानपणच्या साऱ्या घडामोडी ह्या माझ्या मित्राना माहीत आहेतच. त्यांना विचारा म्हणजे झाले."

"भाऊ!" बाबू मोरे म्हणाले, "सदानद विचारतो, तें अगदीं बरोबर आहे. पन्नास वर्षांपूर्वीच्या आपल्या गावच्या परिस्थितीची मुलांना काय कल्पना असणार? तुम्हीच तें सारे सागा. आम्ही देखील गोडीनं ऐकू! पण भाऊ! तुम्ही गांव सोडल्यानतरची तुमची कामगिरी अद्वितीय आहे. मधून मधून वर्तमानपत्रात ती हकीकत येत असे. पण खर काय काय झाल, हें तुमच्या लहानपणच्या लगोटी मित्राना कळावयास नको का?"

त्यानंतर शिवानदही अधिक उत्सुकतेनें बोलला, "मोठे लोक आपल्या लहानपणच्या गोष्टी प्रसिद्ध करीत असतातच कीं! परवाच मी काका कालेलकरांची 'जीवनयात्रा' वाचली. किती बारीकसारीक गोष्टी लिहिल्या आहेत त्यानीं! साऱ्या घटना तुटक तुटक आहेत! पण जुनी स्थिति समजण्यास पुष्कळ उपयोग आहे त्याचा. आणि तुमचे तर जगातले अनुभव विविध आणि लोकाना उद्बोधक असेच आहेत. मधून मधून तुम्ही ज्या ओझरत्या गोष्टी आम्हाला सागता, त्यावरून त्यातील तेजाची, बोधाची आणि विलक्षण बिकट प्रसंगाची आम्हांला कल्पना येते. ते काहीं नाहीं भाऊ? आम्हाला अगदीं लहानपणापासूनची माहिती तुम्ही सांगा."

शिवानंदाच्या आग्रहाला सदोबानें जोराचा टेकू दिला आणि तो म्हणाला,

"भाऊ! तुम्ही तुमच्या खऱ्या गोष्टी आम्हांला सांगा व त्याचें पुस्तक पण करा. मुलांनाच काय, पण मोठ्या माणसांना त्याचा फार उपयोग होईल!"

त्यानंतर मी म्हटले " पुस्तकाबिस्तकाची कल्पना आपल्याला पसंत नाहीं. मधून मधून जसे आठवेल तसें मी केव्हा तरी सांगेन कीं ! "

अद्यापर्यंत ज्ञानू मुसळे गप्प बसले होते. ते अधिक आग्रहाच्या स्वरात माझा हात धरून म्हणाले, " भाऊ ! आमच्या साऱ्याची इच्छा तुम्हीं मानली पाहिजे. आमचीं मुलेंबाळें, नातवंडे देखील शिकलीं आहेत, तुमचेंच उदाहरण डोळ्यांपुढे ठेवून ! तेव्हा तुमची माहिती चांगली पुस्तकांत मुलाबाळांना वाचायला मिळाली पाहिजे. सदानंद, व शिवानंद तुम्ही सांगाल ते उतरून घेऊन छापतील पाहिजे तेवढें ! "

" छापण्याची काळजी कशाला ? " सदानंद आनंदाने म्हणाला, " त्याची व्यवस्था कशीही होईल, पण भाऊंनीं गोष्टी सांगण्याची तयारी केली पाहिजे. त्यांना आत्मस्तुति आवडत नाहीं. पण महत्त्वाच्या बारीक सारीक गोष्टीदेखील त्यांनी मोकळेपणाने सांगाव्या, आम्हाला ! क्षुल्लक म्हणून काहीं देखील सोडू नये ! "

सर्वांचा आग्रहाचा मारा मजवर झाला. तेव्हा मी म्हटले, " साऱ्याचाच आग्रह आहे, तर मी आठवेल तसें सांगेन, तुम्हाला ! "

" पण भाऊ ! " बाबूराव म्हणाले. " वेळ मारून नेत आहात तुम्ही ? तुम्ही आता एक दोन दिवसांत नाशिकास जाणार म्हणता ! मग सांगणार केव्हा ? तें काहीं नाहीं. सदानंदानेंच हे काम करावें. तो तेथें आहेच काहीं दिवस. चांगला एम्. ए. झालाय. अमेरिकेंत पण पुढल्या वर्षीं जाणार आहे तो ! तुम्ही सांगा, शिवा किंवा सदा कोणीही लिहील. मग आम्ही वाचून लहानपणाच्या गोष्टींमध्यें काहीं दुरुस्त्या सुचवूं पाहिजे तर ! पण झालंच पाहिजे हे ! "

मित्रांचा आग्रह मला मानावा लागला. " नासिकांत गेल्यानंतर आमच्या बंगल्यातील गच्चीवर बसून मी सांगेन आठवतील तशा साऱ्या गोष्टी अगदीं लहानपणापासूनच्या. " असें मला कबूल करावें लागलें. सदानंदानें लिहून घेण्याची कामगिरी पत्करली.

पण नंतर माझ्या मनात एक शंका आलीच. नासिकास ह्या मुलांची आई आणि आमची दहा बारा वर्षांची छोटी सुलभा हीं मधून मधून

मला प्रश्न विचारतील. शिवाय माझी पत्नी मूळची श्रीमंत घराण्यांतील आहे, तिच्यापुढें अगदीं लाचारी वाटण्यासारख्या गोष्टीही मला सांगाव्या लागतील !

पण मी पुन्हां मनांत म्हटलें, "आतां एकदां कबुली दिल्यानंतर अंतःकरण उकलून जे सत्य आहे, तेंच मला सांगितलें पाहिजे. आतां छपवाछपवी चालावयाची नाहीं."

यावेळीं विदूरनीतींतील एक वचन झटकन् माझ्या मनःचक्षूपुढें आलें. त्या नीतींचे अभंग वृत्तांत भाषांतरही पुण्याच्या एका विद्वानानें केलेलें आहे. त्यांतील त्या वचनाच्या भाषांतराच्या दोन ओळी पुढें दिल्या आहेत.

मिथ्या शब्दें कोणा न करी संतुष्ट ।
वचन स्वदत्त नियमें पाळी ॥

वाचक मित्रानो, ह्याच ओळींनीं माझा निश्चय अगदीं पक्का झाला.

———

## प्रकरण दुसरें

आश्विन महिन्यांतील ती पूर्णिमा होती. कोजागिरीनिमित्त गोड आणि गरम दुग्धपान करावयाचें आहे, अशी घोषणा आमच्या सुलभानें केली होती. रात्रीचे दहा वाजण्याच्या सुमारास आम्ही सर्व आमच्या बंगलीच्या गच्चीवर जाऊन बसलो होतों. फुलांच्या कुंड्यांतील मधुर सुगंध वाऱ्याच्या मंद झुळुकीबरोबर आमच्या सत्कारार्थच येत आहे, असें वाटत होतें! चंद्रमा हळू हळू सरकत सरकत आमच्या डोक्यावरून पलीकडे जाण्याची इच्छा करीत आहे कीं काय, असें भासत होतें! आकाश स्वच्छ असून त्याच्या निळसर वर्णाच्या पडद्यावर चंद्राभोंवतीं फेर घालून चांदण्या आनंदाने नाचत होत्या! आणि चंद्रिकेनें आपला पांढरा शुभ्र सुंदर शेला पृथ्वीवरील आपल्या अखिल स्थावर जंगम बालकांच्या अंगावर प्रेमभरानें जणूं घातला असावा, असे दिसत होतें!

त्यावेळीं सुलभा मला म्हणाली,

"सदानंद म्हणतों कीं, भाऊ आपल्याला त्यांच्या आयुष्यांतील गमती गमतीच्या गोष्टी सांगणार आहेत! खरंच कां हो भाऊ?"

"सांगणारच आहेत ते!" शिवानंद बोलला. "त्यांनीं देवगांवीं हा निश्चय केला आहे! सदानंद त्या लिहून घेणार आहे!"

"होय काय रे सदा!" सुलभाची आई बोलली. "मग आण तुझी वही नि झरणी! छान वेळ आहे ही! आणि आपल्याला थोडं जागायचंही आहे!"

मी म्हटलें, "आतांच काय नडलं आहे. सांगूं केव्हां तरी! अजून सदा, शिवा इथ दोन तीन महिने तरी आहेत ना? मग घाई कां इतकी?"

" भाऊ ! " सदानद बोलला. " ही वेळ पण आल्हादकारक आहे. आई पण जागते आहे. मला लिहिण्याचं काम लवकर उरकावयाचं आहे. मग केव्हा तरी सुरवात करावयाची, ती आताच करा ना ? "

मलाही जुन्या गोष्टी सागावयाच्या होत्या. त्यातील माहितीमुळें पन्नास वर्षापूर्वीची आपल्या गावची स्थिति मुलाबाळाच्या दृष्टीपुढे आणावयाची होती. त्या गोष्टींना आरभ कसा करावा, ह्याचा विचार मी मनातल्या मनांत करू लागलों, इतक्यात सुलभा म्हणाली,

" भाऊ ! सागता ना ? नाहीं तर मला बाई झोप यायची आणि तुम्ही सागत बसावयाचे. पण असं मात्र चालायच नाहीं ! "

सुलभाचा तो आग्रह पाहून आरभीं कोणती गोष्ट सागावी, हें मी चटकन निश्चित केले आणि म्हटलें,

वक्रतुंड महाकाय कोटिसूर्यसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥

मी असे म्हणताच सुलभा आणि सुलभाची आई खदखदून हसूं लागली. नंतर सुलभा मला म्हणाली,

" भाऊ ही सकाळची गणपतीची प्रार्थना म्हणतां कीं काय ? अजून रात्र सपायची आहे. उजाडण्यास अवकाश आहे ! "

इतक्यात सदानंद म्हणाला, " गप्प बसा आता ! भाऊची गोष्टीला सुरवात दिसते ही ! "

मी म्हटलें " बरोबर जाणलें सदानंदानें ! ही गोष्टीची सुरवातच आहे. मी पाच वर्षांचा होतों, तेव्हाची ही गोष्ट आहे. मी माझ्या ताईला वाकडे तोंड करून वेडावणें दाखवीत होतो. त्यावेळीं 'वक्रतुंड महाकाय' हा श्लोक ताईनें माझ्यापुढें हात हालवीत हालवीत म्हटला.

ताईनें अशा प्रकारें माझी चेष्टा चालविली. ताई माझ्यापेक्षां चारपाच वर्षांनीं वडील होती. ती फार सुंदर होती. चोळी परकर नेसून ती आईला घरांतली डाळ आणून देत होती. तिसऱ्या प्रहरच्या वेळीं डाळ निवडीत आई सोप्यावर बसली होती. मला वक्रतुंड म्हणजे वांकडें तोंड, हा अर्थ समजला ! तो अर्थ माझ्या वडिलांनीं गणपतीची पूजा करताना आम्हांला

सांगितला होता. तेव्हा ताईनें मला वाकड्या तोंडाचा म्हणावें, त्याबद्दल मला तिचा फार राग आला. 'ताईटली' म्हणत म्हणत मी तिच्या अंगावर चाल करून गेलो. त्यावेळीं आईनें मला आवरून धरलें; आणि ती म्हणाली,

"गजू! असा रागावूं नको. ताईला तो श्लोक पाठ येतो. अरे, ती गणपतीची स्तुति आहे. तो मोठ्या शरिराचा व सूर्यासारखा तेजस्वी आहे, असे पुढे म्हटलेलें आहे. त्यात रागावयाचे काय आहे? तूं तसा सशक्त व तेजस्वी हो म्हणजे झालें. आणि तुझा जन्म देखील गणेशाच्या भक्तीनेच झाला आहे!"

नंतर आईने मला माझ्या जन्माची गोष्ट सांगितली. तीच मी तुम्हाला सांगतों. आईनें सांगितली म्हणूनच ती हकीकत मला कळली.

ती गोष्ट समजण्याकरिता आमच्या घरची व गावची जुनी माहिती तुम्हाला थोडी कळली पाहिजे. ती प्रथम सांगतों:—

आपलें आताचे गाव तुम्हा सर्वांनीं पाहिलें आहे. तेथले मोठमोठाले वाडे पडलेले आहेत. पन्नास वर्षांपूर्वी ते चांगले धड होते. आमच्या गांवीं तेव्हा पांढरपेशा सुखवस्तू लोकांची वस्ती बरीच होती. त्यांच्या ताब्यात पुष्कळ जमिनी होत्या. कांहींची सावकारी पण चांगली चालत होती.

गावातील मराठा समाज शेतीभाती करीत होता. लोकांमध्यें धार्मिक वृत्ति जागृत होती. लोक खाऊन पिऊन साधारण सुखी होते. आमच्या देवगावापासून एका कोसावर जी वाडी आहे, तीमध्ये सारी वस्ती शेती कसणाराचीच होती.

गावचा मुख्य देव म्हणजे महादेव. तो गांवापासून सुमारें एक मैल अंतरावर डोंगरांच्या बेचक्यांत आहे. तो तुम्ही पाहिला आहे. सध्याचे मुख्य देऊळ पूर्वींप्रमाणेंच आहे. पण त्याचें आवार पूर्वी फार स्वच्छ ठेवीत असत. मोठ्या देवळाजवळील जिवंत पाण्याचीं कुंडे आजही पूर्वींचीच आहेत. पण आमच्या वेळीं गांवचे लहान थोर लोक तीं एक दोन महिन्यांनीं उपसून स्वच्छ ठेवीत. आतांसारखा पालापाचोळा पडून तीं घाण होऊं देत नसत. मुख्य देवालयाभोंवतीं पूर्वीं बेल, आंबे, बकुळी, सीताफळें, चिंचा, आवळी, चाफा, संकेश्वर इत्यादि वृक्षांची रेलचेल

असे. उन्हाळ्यांत ह्या गर्द झाडांच्या सावलींत विसावा घेणारांना महाबळेश्वराच्या थंड हवेचें सुख प्राप्त होई ! पण आतां तेथें फार थोडी झाडी राहिली आहे. त्यामुळें तेथील पूर्वींच्या सृष्टिसौंदर्याचा मागमूस फारसा दिसत नाहीं !

आम्ही गावचे जोशी. त्या वेळीं आमच्या वाट्यास वाडीचे जोशीपण आलें होतें. माझे वडील बापू गांवीं राहून जोशीपणा आणि शेतवाडी यांवर निर्वाह चालवीत असत. आमचे चुलते अण्णा हे तिकडे बेळगांवीं सरकारी नोकरी करीत होते.

आमचें जुनें घर डागडुजी करून कसेंबसे राहिलेलें आहे. आमच्या घरचा जिवत व गोड पाण्याचा आड अद्यापि पूर्वीप्रमाणेच लोकांच्या उपयोगीं पडत आहे. पण आमच्या गोठ्यांतील त्या बाळसेदार गाई आणि आमच्या घरचें ते इमानी घोडें यांची आतां फक्त आठवणच राहिली आहे !

ह्या वेळीं माझ्या दृष्टीसमोर माझें ते जुने घर मूर्तिमंत उभें राहिलें होतें. माझी आई व ताई यांच्याजवळ मी लडिवाळपणें खेळत बसलो आहे, असें मला वाटत होते. माझ्या पूर्वींच्या जीवनांतील प्रसंगाचा चित्रपट माझ्यासमोर हळू हळू येत होता. मी रंगांत येऊन मागील आठवणी सांगणार, इतक्यात सुलभा बोलली,

" भाऊ ! तुम्ही आपल्या जन्माची गोष्ट आम्हांला सांगत आहांत ना ? "

मी लगेच भानांवर आलों व म्हणालों,

" खरंच ! तेंच मी सांगणार आहे. ऐका तर तुम्ही ! "

माझ्या आईचें नांव आनंदी. खरोखरच ती तशी आनंदमयच होती. तिचें लग्न दहाव्या वर्षीं झालेलें होतें. लहानपणीं ती सुलभासारखीच चुणचुणीत होती, असें आमच्या कानांवर आलें होतें. तिचे वडील शास्त्री होते. त्यामुळें त्यांनीं तिच्याकडून लहानपणीं पुष्कळ पाठ करून घेतलें होतें. तिच्या लग्नाच्यावेळीं माझे वडील तिच्यापेक्षां दहाबारा वर्षांनीं वडील होतें.

" तर मग ! आपल्या ब्राह्मणांत देखील त्या काळांत लग्नाच्यावेळीं

मुलींचें वय फारच लहान असे! बारा वर्षांच अंतर म्हणजे किती अंतर हे बाई ! " सुलभाची आई मध्येच म्हणाली.

" होय ! हें खरेंच होतें. आठव्या वर्षींच मुलींचीं लग्नें उरकीत असत. तेव्हां आतां सारख्या कांहीं घोडनवऱ्या नसत ! "

मी असें म्हटल्या बरोबर सगळेच हसू लागले, पण सदानंद म्हणाला, " सांगा भाऊ ! प्रगति कांहीं जुन्या चालीरीतींच्या बांधांना जुमानीत नाहीं ! "

मग मी पुढे सांगू लागलों. " आमचे आजोबा, आजी यांची मला फारशी माहिती नाहीं. ते माझ्या लहानपणीं हयात नव्हते. माझ्या आईला प्रथम एक मुलगा झाला होता. पण तो अकालीं देवाघरीं गेला. नंतर बारा वर्षे मूल नव्हतें. पुढे सातानवसानीं आमची ताई झाली. तेव्हां माझ्या वडिलांनीं चाळिशी गाठली होती ! "

" अगबाई ! " ती म्हणाली, " मग तर सासूबाईंना आणि मामंजींना ते दिवस कसेसेच गेले असतील, नाही ? "

" होय ! तें खरं आहे. " मी म्हटलें आणि गोष्ट पुढें सांगू लागलों.

बापूंना आतां मुलगा होणार नाहीं, असे जो तो म्हणू लागला. पुढें सुमारें तीन वर्षें तर आईला मूल होण्याचेंही चिन्ह दिसेना. त्याचा एक परिणाम असा झाला कीं, आमचे चुलते अण्णा बापूवरच जास्त प्रेम करू लागले. शेतीभातीची सर्व व्यवस्था अगदीं बापूच्या मनाप्रमाणें होऊं लागली. मुलगा नसला म्हणजे सारी शेतभाती आपल्याच मालकीची होणार, असें अण्णांना वाटूं लागलें होतें. बापूच्यापेक्षां अण्णा दहा वर्षांनीं लहान असल्यामुळें बापूही अण्णाना मुलगाच समजू लागले. पण त्या प्रेमाच्या कुशींत लोभरूपी भुजंग दडला आहे, हें आई पुरेपूर जाणून होती !

बायकांच्या समजुतीप्रमाणें मुलांकरितां व्रतें उद्यापनें आई करूं लागली; आणि बापूंनींही लिंगार्चन सुरू केलें. त्याच वेळीं एक चमत्कार घडून आला.

मी असें म्हणतांच सुलभा म्हणाली,

" अरे ! आता ऐका रे ऐका ! आताच भाऊंच्या गोष्टीला रंग आलेला दिसतोय. "

मी एकदा सर्वांकडे नजर टाकली, आणि गोष्ट सांगू लागलों—

त्या वर्षाचा तो गणेशचतुर्थीचा दिवस उजाडला. बापूंनीं स्वत:च सुंदर गणपति तयार केला होता. त्याची पूजाअर्चाहि त्यांनीं त्या वर्षी अत्यंत भक्तिभावानें केली होती.

त्यादिवशीं अगदीं वैश्वदेवाच्या वेळींच एक अत्यंत तेजस्वी संन्यासी घरीं आला. तो संन्यासी भिक्षेकरिता म्हणजे भोजनाकरिता आला होता. बापूंनीं आदरानें त्याचें स्वागत केलें. भोजन झाल्यानंतर तो संतुष्ट झाला. जातेवेळीं सर्वांनीं त्याला नमस्कार केला. त्यावेळीं बापूंना पुत्र नसल्याचें त्या संन्याशाच्या लक्षांत आलें व मंगलमूर्तीकडे बोट दाखवून तो म्हणाला,

" ह्या गजाननाला ह्या वर्षीं पोंचवूं नका ! ह्या कोनाड्यातच ह्याला कोंडून ठेवा ! गणपतीची आराधनाहि चालू राहू द्या. एका वर्षाच्या आंत तुमच्या मनकामना सफल होतील ! "

आई व बापूंनीं सद्गदित होऊन त्या संन्याशास नमस्कार केला. बापूंना त्या स्वामींना कांहीं प्रश्न विचारावेसे वाटत होते. पण ते स्वामी तेथें थांबले नाहींत ! ते द्रुतगतीनें घरांतून बाहेर पडले ! त्यांच्या पायांतील खडावांचा आवाज सर्वांच्या कानांत घुमत होता. त्यांची मूर्ति डोळ्यांसमोर येत होती.

आईला तो परमेश्वरी आदेश वाटला. बापूंना तो एकप्रकारचा साक्षात्कार दिसला ! त्यांना तसें कां वाटूं नये बरें ? कारण, पुढें नऊ दहा महिन्यांनीं त्या संन्याशाच्या आशीर्वादाप्रमाणें आमच्या घरीं आईच्या पोटीं मी जन्माला आलों.

आमच्या आईची दळपीण गजाई तेव्हांपासून दळतांना पुढील ओंव्या म्हणत असल्याचें मला चांगलें आठवतें.

**माजी आनंदी मावली । समंद्याची ग सावली ।**
**तिच्या पोटी देव आला । गजानन ।**
**जरी कांठी त्येला कुंची । आनली कीं सोन्याची ।**
**बाळाच्या मावलेची । हौस फिटली ॥**

माझे नाव गजानन ठेविले. अण्णाना बारशाकरितां बापूनीं आग्रहानें बोलावलें होतें. पण ते येऊ शकले नाहींत. त्यांनीं कांहीं तरी कारणें पत्रात लिहिलीं होतीं !

* * *

त्या रात्रीं त्यानतर केशरी गोड गोड दूध पीत असतां सुलभा म्हणाली, " भाऊ ! तुम्ही गजानन ना ? तुम्हांलाच खूप दूध प्याल पाहिजे. गणपतीच्या पोटात भरपूर जागा असते नाहीं ? "

इतक्यांत तिच्या आईने तिला बोटानें दाबीत म्हटलें, " अस कांहीं तरी बोलू नये सुलभा ! "

" आई ! ईश्वरी चमत्कारावर तर आमचा विश्वास बेताचा ! पण भाऊच्या जन्माच उदाहरण तर फार गमतीच दिसते ! " सदानद बोलला.

" योगायोग म्हणता येईल याला ! " शिवानदाने म्हटलें. " पण भाऊच्या लहानपणच्या पुढील गोष्टी देखील मजेमजेच्या असणार खास ! "

## प्रकरण तिसरें

दुसरे दिवशीं गुरुवार होता. सुलेभींची आई श्रद्धाळू होती. त्या दिवशीं आरती करून प्रसाद वाटण्याची तिची नेहमींची वहिवाट असे. पूर्वीं खडीसाखर आणि नारळातील खोबरें याचा प्रसाद असे. पण खडीसाखर मिळेनाशी झाल्यामुळें गूळ खोबऱ्यावर आता भागवीत असत !

आम्ही गच्चीवर बसलों होतों. तेथें सुलभा हातात नारळ घेऊन आली आणि ती म्हणाली,

" शिवा ! सदा ! कोणी तरी नारळ फोडून द्या कीं ! आईनं सांगितलं आहे तुम्हाला. "

" जा ! जा ! " दोघेही म्हणाले, " बायकांनीं नारळ फोडला तर काय बिघडते ? फोड जा तूं ! "

इतक्यात मीं म्हटलें, " आरती व्हावयाची आहे ना ? आम्ही सारे देवघरात येतो. तिथंच मी नारळ फोडून देतों, म्हणजे झालें ! "

माझ्या त्या बोलण्याने सदा व शिवा लाजल्यासारखे झाले. मीच देवघरात गेल्यानें माझे दोघे मुलगेही तेथे आले, तेव्हां ती हसून म्हणाली,

" आज कपिलाषष्ठीचा योग दिसतोय ! आमच्या आरतीला सारेच आलात कीं ! "

आरती झाली. देवापुढेंच नारळ फोडण्याचें मी ठरविलें. तेथील फरशीवर तो नारळ जरा वर उचलून त्याच्यावर मी जोरानें बुक्की मारली ! लागलींच नारळाचीं दोन भकलें झालीं !

सुलभा म्हणाली, " नारळाचं पाणी सांडलें कीं ! "

सुलभाची आई म्हणाली, " हाताला लागलं बिगलं नाहीं ना? आतां ह्या वयात बुक्कीनं नारळ कशाला फोडावा ? "

" भाऊ ! " सदा आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " इतकी शक्ति ह्या वयात आहे तुम्हाला ! आमच्या सारख्या तरुणालाही इतक सामर्थ्य असूं शकत नाहीं ! जुनी पिढी बळकट खरी ! "

" होय ! हा माझ्या खेडेगावच्या नियमित राहाणीचा प्रभाव आहे, सदा ! " मी म्हटले. " आज मी लहानपणीं पाहिलेल्या शेतकऱ्याच्या मनगटातील बळाची आणि आमच्या गावच्या एका जुन्या चालीरीतीचीच गोष्ट सागतो म्हणजे झालें ! "

मग आम्ही नेहमींच्या ठरलेल्या ठिकाणीं जाऊन बसलों. मी गोष्ट सांगूं लागलो—

आमच्या वाडींत आमचा एक मळा होता. माझ्या बारशाला बापूंनीं फार खर्च केला, पण तो खर्च हा मळा गहाण टाकूनच त्यांनीं केला होता ! पुष्कळ वर्षांनीं मुलगा झाला, तेव्हा गावजेवण घातलें पाहिजे, असा आमच्या वाडीच्या लोकाचा आग्रह पडला. बापूंनींही यथासांग धार्मिक कृत्य करून गावातील स्नेही मंडळींना आणि वाडींतील शेतकऱ्याना सुग्रास जेवण घातले. त्यामुळें सारे लोक बापूच्या उदारपणाची स्तुति करू लागले ! पण हा सारा प्रकार मळा गहाण पडून झालेला असल्याने '**ऋणं कृत्वा घृतं पिबेत्**' असाच झाला !

घरात एकदा कर्जानें प्रवेश केला, म्हणजे ते कर्ज व्याजाव्याजानें फुगत फुगत जाऊन ऋणकोस मेटाकुटीस आणतें. ही गोष्ट माझ्या वडिलांना माहीत नव्हती, असें नाहीं. पण साता नवसानीं पुत्र झाला, ह्या आनंदाचा पगडा त्याच्यावर बसून त्यांनीं कर्ज काढलें आणि सावकारानींही तें मोठ्या आनंदानें दिलें ! मात्र हा चागल्या उत्पन्नाचा मळा सावकाराला कब्जेगहाण द्यावा लागला !

सावकाराकडे मळा गहाण पडण्यापूर्वीं माझी आई दरसाल त्या मळ्यांतील उसाच्या गुऱ्हाळाला देवगावातील ओळखीच्या बायकाना नेत असे.

पण मळा सावकाराच्या ताब्यात गेल्यामुळें गेल्या कांहीं वर्षांत तसा योग घडून आला नव्हता ! लवकरच कर्ज फेडू व मळा ताब्यांत घेऊ, असें बापू म्हणत असत. पण प्रपचाच्या ओढीमुळें ती गोष्ट जमून आली नव्हती. त्यामुळे त्या मळ्यात जाणें आईलाही अपमानकारक वाटत होते.

पण त्या मळ्याचे वाटेकरी जानोजीबाबा ह्यानीं फार आग्रहानें सागितलें कीं, "बापू, तुमचा वाटा सावकार नेतुया, पन माजा वाटा मला मिळतो ना ? आमी तुमचेच, माझा वाटा म्हजे तुमचाच, तरी पूर्वींसारकं तुमी समद्यानीं गुऱ्हाळांत आल पाइजे !"

त्यावेळीं कूळ आणि मालक याचे सबध फार घरोब्याचे असत. जानोजीरावांचे प्रेम आमच्या घरावर फार होतें. त्याचे वय निदान साठी उलटून गेलेले होते. पण त्याचा जोम पाहून त्याना कोणी वृद्ध म्हणणे शक्य नव्हते.

मी त्यावेळीं पांच वर्षांचा असलो, तरी मला जानोबांच्या बोलण्यातील मतलब समजला होता, मळ्यात गुऱ्हाळ सुरू झाले होते. दुसरे दिवशीं सकाळीं गुऱ्हाळास जाण्याचे ठरले होतें. तेव्हा तेथे मजाच मजा दिसणार, अशा आनदात मी होतों.

सकाळीं लवकर निघावयाचें होतें, पण बायका जमता जमतां दिवस बराच वर आला ! सात आठ मुलें आणि दहापधरा बायका नेहमींप्रमाणे पायींच जाण्यास निघाल्या. बापू घोडयावरून भल्या सकाळींच मळ्यात गेले होते.

तो माघ महिना चालू होता. कांहीं कांहीं शेतांतील हरभरा अद्यापि निघालेला नव्हता ! शेतांतले कोवळे दिसणारे डहाळे उपटून आम्ही बोकणे भरीत होतों. मधून मधून दुसऱ्यांच्या मळयांतील गुऱ्हाळाची धादल आम्हाला दिसत होती. कांहीं ठिकाणीं शाळूचें व तुरीचें पीक काढण्याचे काम चालू होतें. वाटेंतील बऱ्याच आंब्यानी मोहोर आलेला असून, त्याचा सुगंध चोहोंकडे दरवळलेला होता !

वाटेंत एक ओढा लागला. त्याचें पाणी खळखळ वाहात होतें. आम्हां मुलांनीं पाण्यांतून जातांना एकमेकांच्या आंगावर पाणी उडविण्याची मौज

चालविली होती ! पण बऱ्याच जणांच्या आयाचे रपाटे पाठीवर बसल्याने सैन्यांतील पळपुट्या शिपायांप्रमाणे आम्ही तेथून धूम ठोकीत होतो !

आम्ही मळ्यात पोहोंचलों, तेव्हां दहा वाजून गेले होते. आमच्या आईने दशम्याच्या चवडीच्या चवडी करून आणल्या होत्या ! आम्हांला भूक लागल्यामुळें आम्ही चळवळ चालविली. आमच्या जानोबांनीं उसाच्या मोळ्या आमच्यापुढे टाकून त्यांचे तुकडे करून दिले. आम्ही ते ऊस खाण्याचा सपाटा चालविला !

बायका ओढ्यावर धुणे धुण्यास गेल्या होत्या. आम्हां मुलांना जानोबांनीं गुऱ्हाळ दाखविले. काहिलींत तयार झालेला गूळ नुकताच वाफ्यात ओतला होता. गुऱ्हाळघरात पिवळयाजर्द गुळाच्या ढेपींच्या थडी लावलेल्या होत्या. आमचा सावकार गाडया भरून तो गूळ बाजारांत नेत असल्याचें दिसत होते

आमच्या लहानपणीं उसाचा चरक लाकडी असे. आम्ही उशीरां मळ्यांत गेलो होतो, त्यावेळी घाणा बद झालेला होता. तिसरे प्रहरीं तो पुन्हा सुरू होणार होता, त्यावेळीं ताजा रस आम्हाला मिळणार होता !

ऊस, गुळाची साय, शेगा, डाहाळे यथेच्छ खाल्ल्यानंतर आमचे वाटेकरी, त्यांचीं बायकामुले असे सर्वजण जेवण्यास बसलो. आमच्या आईने आणलेले पदार्थ सर्वांना वाढले. त्या आम्रवृक्षाच्या छायेत आम्ही सर्व बाल-गोपाल हसतखेळत कितीतरी वेळ जेवत होतों. आमच्या आईनें तयार करून आणलेल्या दशम्या-कालवणांची रुची ते शेतकरी गोडीने घेऊन आईची स्तुति करीत होते.

बापूंनीं स्नान करून पार्थिव पूजा उरकली त्यानतर बापू आणि जानोबा जुन्या गोष्टी बोलत बोलत एका बाजूला शात जागीं फराळ करीत होते.

मी त्यांच्याकडे धावत गेलो, आणि म्हटले,

" बापू ! ऊस, गूळ खूप मिळाला, पण रस आतां केव्हां मिळणार ? "

" मालक ! तिसरा पार होऊ द्या तरी ! " जानोबा म्हणाले, " घाणा संपल्यावर घागरीच्या घागरी रस आणून देतो तुमास्नी ! "

" पण मला आताच रस पाहिजे " असा हट्ट मीं धरला. त्यावेळीं बापू मला म्हणाले,

" गजू ! बाळ ! हट्ट धरू नये असा ! आपल्या जानोबांना उगीच त्रास देऊं नये. ते आतां म्हातारे झाले आहेत. नाहींतर, तुला त्यांनीं हातांनीं कांडीं पिळून रस काढून दिला असता ! "

बापूच्या बोलण्यानें जानोबानाही स्फूर्ति आली. जानोबा काय किंवा दुसरे शेतकरी काय, तेव्हा चागलेच धट्टेकट्टे असत. शेतातील मोकळी हवा, साधेच पण भरपूर अन्न, मुबलक भाजीपाला आणि सततचे कष्ट, ह्यांचा परिणाम त्याच्या जीवनावर फार उत्कृष्ट होई. जानोबाचें हाडपेर मूळचेंच मजबूत होतें. त्यानीं लहानपणापासून कमावलेली ताकद अद्यापि टिकून होती. अगात चांगलाच दम असल्यानें बापूच्या बोलण्याने त्यांना चेव आला. आणि झटकन् जाऊन त्यानीं आपल्याला पाहिजे असलेली उसाची कांडीं आणलीं ! आणि काय सागावे ? त्यांनीं ती कांडीं नेट देऊन अत्यत जोरानें पिरगाळलीं. रसाच्या धारा खालीं ठेविलेल्या पितळींत पडू लागल्या ! मी आनदानें बेहोष होऊन रस ! रस ! म्हणून उड्या मारूं लागलों !

त्यावेळीं बापू जानोबास म्हणाले, " जानोजीराव ! पुरे झाला रस ! शेतकऱ्याची ताकद कशी असते, हे मला गजूला दाखवावयाचें होतें. गजूनें शरीर कमावले तर, त्यालाही अशी ताकद येणार नाहीं, असें नाहीं."

बापूंच्या ह्या बोलण्यानें मी चढून गेलों. आणि उसाचें कांडें घेऊन तें पिळूं लागलों. माझ्या ह्या बाललीलेमुळे ते दोघे मनमुराद हसूं लागले. त्यावेळीं जानोबा म्हणाले,

" बापू ! कांहींबी म्हना ! गजाभाऊंचं पानी न्यारं दिसतंय ! नाईंतर, तुमचीं बामनं खाऊनशान उगा बसतात ! फुकाट खाल्लेलं जिरतं कुठं ? श्रम केलं कीं, कायबी खाक होतं ! "

जानोबांच्या बोलण्याला बापूंनीं मान डोलावली. मलाही फार उत्साह वाटला. पितळींतील रस आम्हा मुलांनीं चट्ट करून टाकला !

मला आता त्या आमच्या लहानपणच्या निसर्गरमणीय जीवनाची फार

आठवण होते. त्यांत स्वाभाविक आनंद होता. आतांसारखीं कृत्रिम सुखें तेव्हां फारशीं नव्हतीं. पण मनाच्या मोकळेपणाचें सुख, शेताच्या आणि त्यांत कष्ट करणाऱ्या शेतकऱ्याच्या जीवनाशीं जिव्हाळयाचा संबंध ठेवणाराना भरपूर लाभत असे.

दुसरीकडे माझ्या आईनें वाटेकऱ्यांच्या बायका-मुलांची चौकशी आपुलकीने चालविली होती. सगळया बायका-मुलांत आनद ओसडून गेला होता ! तिसरे प्रहरीं तो लाकडी घाणा टुर्र् टुरर् करीत आपला जागता आवाज काढू लागला बैलाची व शेतकऱ्यांची धांदल सुरू झाली. जानोबांनीं खापरी घागरी भरून आणून साऱ्या मंडळींना आग्रहाने यथेच्छ रस पाजला.

इतक्यात मध्येच सुलभा म्हणाली,

" भाऊ ! हें तुमच्या शेतातील लहानसें संमेलनच नव्हे का ? अशा संमेलनाने समाजात आपलेपणा उत्पन्न होत असेल, नाहीं ? "

" हो ! " मी म्हटले, " अगदीं खरे बोललीस तू ! शेतकऱ्यांत आम्ही मिळून मिसळून वागत होतो, त्यामुळे त्यांचा आणि आमचा जिव्हाळ्याचा संबंध राहात होता."

" पण मालक व मजूर असा लढा त्यावेळींही असेलच कीं नाहीं ? " शिवानंद बोलला.

" हो ! तसा कांहीं ठिकाणीं दिसे खरा ! " मीं म्हटलें. " चढेल मालकावर शेतकरी नाखूष असत. पण तेव्हां जमिनीची टंचाई नव्हती. आताच्या सुमारें निम्मी लोकसख्या त्यावेळी होती ! जमिनीची मशागत करा म्हणून शेतकऱ्याची मनधरणी करण्याची पाळी बऱ्याच ठिकाणीं येत होती ! "

" पण भाऊ ! " सदानंद म्हणाला, " शरिरांत जोम, उत्साह, सपादन होण्यास निसर्गाचा सबध सतत राहिला पाहिजे ना ? आम्हा शहरी लोकांना आतां असा संबंध कसा ठेवितां येणार ? "

" मी आपल्या जुन्या आठवणी सागतों आहे." मी म्हटलें. " त्यांतून तुम्हांला घेता येण्यासारखे सापडल्यास तें घ्या ! "

" लहानपणापासूनच शक्ति कमावली पाहिजे. हे साठी उलटलेल्या जानोबानीं उसांचीं कार्डी हाताने पिळलीं, त्यावरून आमच्या लक्षात आले. पण तशीं उदाहरणें क्वचितच असतील नाहीं ? " शिवानंद म्हणाला.

" पुरे आता ! " सुलभाच्या आईने समारोप केला. " त्याच्या लहानपणच्या साऱ्या गोष्टी तरी ऐकू द्या ! मग काय अनुमान काढावयाचें तें तुम्ही काढा. आता सारे झोपा पाहू ! "

---

## प्रकरण चौथें

बंगलीच्या गच्चीवर रात्रीं साडेनवाच्या सुमारास जमण्याचा आमचा कार्यक्रम ठरून गेला होता. त्या दिवशीं प्रथमच सुलभाची आई म्हणाली,

" सासूबाईना पाहाण्याच आमच्या नशिबीं नव्हतें. इकडच्यांच नेहमीं म्हणणं असतं कीं, आमची आई सतत कामात रमून जात असे. दोनतीन माणसाचा काय तो स्वयपाक ! असं कितीस काम असणार तें ! "

" बरं विचारलत ! " मी म्हटले, " आपल्यावरून माणूस जग ओळखत हेच खर ! तरी बरं घरीं आचारी आहे. तरी कामानं दमून जातां तुम्ही ! सारखं हुश् हुश् चाललेल असत ! "

" भाऊ ! तें असू दे. " सुलभानें विचारले, " आजोबाआजींचा एकादा फोटो आहे का तुमच्याजवळ ? तो मोठा करून दिवाणखान्यांत ठेवूं कीं ! "

" सांगा भाऊ ! " शिवानंद बोलला. " दोन्ही प्रश्न फार महत्त्वाचे आहेत. तुम्ही सांगा माहिती ? आम्हाला हा इतिहास तरी तुम्ही सागितल्याशिवाय कसा समजणार ? "

मी म्हटले, " बरं तर ! " हा इतिहास म्हणजे कांहीं बडा इतिहास नव्हे. पण त्यात माझ्या आईवडिलाचे गुण साठविले आहेत. ही माहिती सांगताना माझे वडील व मातुश्री मूर्तिमत माझ्या डोळ्यापुढें येतात.

माझ्या आईवडिलांचा फोटो मजजवळ नाहीं. तो कधीं काढलेलाच नव्हता. तर तो आमच्याकडे कसा असणार ? त्यावेळीं फोटो काढणें खेडयापाडयापर्यंत जाऊन पोहोंचलें नव्हतें. शिवाय फोटो काढणें हें श्रीमंतीचे चोचले होत, असें त्यावेळीं समजत असत. पण खरी गोष्ट अशी कीं, खेडयांतील लोकांच्या हातीं फारच थोडा पैसा येत असे. मीठ-

मसाला घ्यावयाचा झाला, तर दुकानदारास घरचें धान्य घालीत असत. कादे, रताळीं ह्यासारखे जिन्नस इतके स्वस्त असत कीं, 'पैशापासरी' ही म्हण केव्हां केव्हा त्यावेळीं ततोतंत प्रत्ययास येई ! मग पैसा नाहीं, तर फोटोकरिता चैनीचा खर्च कोण करणार ?

माझ्या आईच्या तोंडावळ्याची कल्पना तुम्हांला माझ्यावरून येईल. मी मातृमुखी आहे, असें जो तो म्हणत असे ! आईचा सावळा वर्ण, सरळ नाक, तेजस्वी नेत्र, भव्य कपाळ आणि तिची गोड मृदुवाणी ह्यामुळे माझ्या आईचें बोलणें कोणालाही रुचत असे. शिवाय ऐकणाराला असें वाटे कीं, कोणीतरी आपल्याशीं प्रेमाचें व जिव्हाळ्याचेच माणूस बोलत आहे !

आईचे वडील वैद्य होते. आईने त्यांच्याकडून ती विद्या थोडीबहुत सपादन करून घेतली होती. लहान मुलाच्या व बायकाच्या रोगांवर तिच्या औषधाचा सुपरिणाम दिसून येई ! फावल्या वेळात ती कसले तरी चूर्ण नाहींतर गोळ्या करीत बसे. आवळे, हिरडे व इतर वनस्पति याचा सग्रह तिच्याजवळ असे. ती गरजू लोकाना औषधें देई ! आमचे घर म्हणजे गोरगरीब लोकांचा मोफत दवाखानाच होता म्हणा ना ?

माझ्या वडिलाची शरीरयष्टी उंच होती. त्यांचा वर्ण गौर असून त्याच्या नेत्रांत बुद्धीची चमक दिसून येई. त्याचें मोडी अक्षर म्हणजे मोत्याची ओळच असे लोक म्हणत असत ! लहानपणीं शिक्षण संपादण्याची चांगलीशी सधि त्याना मिळाली नव्हती. तरी त्यांची गणना साधारणपणें भटजी व शास्त्री ह्यांच्यांत होऊ शकत असे.

भगवद्गीता व दासबोध हे त्याचे आवडते ग्रथ होते. त्यांच्या उपदेशांतील मुख्य सूत्र पुढील रामदासांच्या वचनांत साठविलेले असे.

**राखावीं बहुतांचीं अंतरें । भाग्य येतें तदनंतरें ।**

ह्या सूत्रामुळें बापू सर्वांशीं गोड बोलत व वागत असत. पण घरांत मात्र त्याचा दरारा फार असे !

"पण माझा मुख्य प्रश्न राहिलाच कीं !" ती मध्येंच म्हणाली. "घरात इतकीं दिवसभर कामे तरी काय असत त्यावेळीं ? त्यावेळच्या

अडाणी बायकांना वाचन ब्रिचन नसेल मग मोकळया वेळाचा उपयोग एकमेकांच्या कुटाळक्या करण्यांत जात असेल, नाही ? ”

“ तुम्ही कुठंतरी अशी टीका वाचली असेल, झालें ! ” मी म्हणालो. “ जुन्या परंपरेची चेष्टा करण्याची प्रथा पडली आहे, अशीच ! पण त्यांतील चागला भाग शोधून त्याच अनुकरण करण्याची तयारी कोणी दाखवीत मात्र नाहीं ! ”

मी थोडावेळ थांबलों. ती ओशाळली आहे, असे मला दिसले. पण आम्ही मजेत बसलो होतो, कोणाच्याही मनाला त्रास देण्याचा माझा हेतु नव्हता. तेव्हां मी त्या विषयाला थोडी कलाटणी देऊन सांगू लागलों—

“ आमच्या घरचा माझ्या आईचा दिनक्रम पाहा, म्हणजे तिच्या कष्टांची तुम्हाला कल्पना येईल. कामे करीत असतां ईश्वराचें नामस्मरण चालू ठेवण्याची तिची सवय होती. त्यामुळें कितीही श्रम पडले, तरी तिच्या वृत्तींतील समाधान थोडें देखील कमी होत नसे !

कोंबडा आरवला कीं, आई जागी होई. घरचें पारोसें काम उरकीत असता पुढील भूपाळी प्रथम तिच्या तोंडी असे.

ऊठि गोपाळजी । जाई धेनूं कडे ।
पाहाती सौंगडे वाट तूझी ॥ ध्रु० ॥

ही भूपाळी तिच्या आवडीची होती. त्यानतर दुसऱ्या काहीं भूपाळ्या म्हणत म्हणत, शेवटीं पुढील भूपाळी ती म्हणत असे.

घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठि लवकरि वनमाळी उदयाचळी मित्र आला ॥ ध्रु० ॥

अगदीं परसापासून आंगणापर्यंत झाडलोट उरकीत असता अभंग म्हणा, नाहींतर रामदासाचे मनाचे श्लोक म्हणा, तिच्या तोंडी असत. सारें घर आणि आवार झाडण्यास अर्धा पाऊण तास सहज लागे ! दळपीण काहीं रोजची नसे, दररोज शेर अर्धाशेर दळण आई पाहाटे दळीत असे. त्यावेळीं लहानपणीं आम्ही तिच्या मांडीवर डोके ठेवून निजत असू ! तिच्या त्या मधुर ओव्यांत आणि जात्याच्या घरघरींत आमची समाधि तेव्हांच लागे !

त्या काळचा तो आनद ब्रह्मानदाच्या तोडीचा असावा, असें आता ती आठवण झाली की वाटते!

बापूही लवकर उठत असत,

कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।
करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम् ॥

हा श्लोक ते म्हणू लागले कीं, आमची ताईही जागी होत असे. तिला ऐकून ऐकून प्रात.कालची प्रार्थना पाठ झाली होती. तिचा गोड आवाज कानी पडल्यानतर आमचीही स्वारी जागी होत असे! लहानपणचे संस्कार जन्मभर टिकतात, याचा अनुभव मला प्रत्यक्ष आहे. मी नेहमीं पाहाटे उठतो, व प्रार्थना म्हणत असतों, हें तुम्ही पाहातां, हा लहानपणच्या उत्कृष्ट सवईचा परिणाम होय.

आईची झाडलोट झाली कीं, ती पूजेची तयारी करीत असे. माझी ताई व मी परसांतील फुले तोडून आणीत असूं. आमच्या घरीं चार पाच गाई असत. त्यांचा शेणगोठा आईच करीत असे. बापू फक्त घोड्याचा खरारा करीत.

बापूंची पूजाअर्चा तास दीड तास चाले. इतक्यात आई गाईची धार काढी. बापूंना व आम्हांला धारोष्ण दूध रोजच्या रोज मिळत असे. स्नान करून नमस्कार घालून मी शाळेला जाई. ताई ताक करूं लागे.

त्यावेळचें सरपण म्हणजे मुख्यत: गाईच्या शेणाच्या शेणी हेंच आमच्या घरीं असे. शेणी लावण्याचें काम आईच करी. मध्येंच कोणीं अजारी मूल दाखवावयास आणलें, तर त्याची सारी विचारपूस करून आई त्यास औषधही देई !

मी सकाळीं शाळेंत जाई, त्यावेळीं बापू घोड्यावर बसून वाडीकडील शेतवाडींत जात असत. ते दुपारी पडशींत भाजीपाला, शेंगा, कणसे वगैरे कांहीं तरी घेऊन येत असत.

आमची शाळा सुटण्याची वेळ आणि सकाळची गुराख्यांची गुरें सोडण्याची वेळ जवळ जवळ एकच येई. आमच्या घरीं मधून मधून

घरकामास येणाऱ्या गजाईचे मुलगे रामू, सदू हेच आमचीं गुरें वळण्याचें काम करीत असत.

मी घरीं आल्याबरोबर आई मला जोधळयाच्या पिठाची छानशी चादकी करून देई. ती तळहाताएवढीच असे. तिचा पापोडा फुगलेला असून त्याला भोक पाडून त्यात आई घरचे घट्ट कणीदार तूप घाली. मी आणि ताई एक एक चादकी मिटक्या मारीत मट्ट करीत असूं! तिची चव कसल्याही पक्कान्नाला लाजवील, अशीच आम्हाला वाटे.

त्याच वेळीं गुराखी आलेले दिसले, तर त्यानाही आई चादक्या करून देई. एकादेवेळीं गजाईच्या नजरेस ही गोष्ट येई, तेंव्हा ती गहिंवरून म्हणत असे.

" आनंदी काकू! गजूसारखे रामू सदूबी तुमच्या चादक्या खात्यात! तुमच्या सारकी जगाची माय म्या देखली नाई! गुराक्याच्या पोराना फार तर शिळी भाकर देत्याल, पन आपल्या पोरासारकं कुनीबी करनार नाई! काकू तुला उदड आऊख हाय की!"

" गजाऊ!" आई म्हणत असे. " आपलं पोर आणि गुराख्याचं पोर ह्यात फरक कसलाग गजाऊ! साऱ्याची भूक सारखीच ना? तुझीं मुलें गाईना चागली चारून आणतात, म्हणून तर दूधदुभत्याची रेलचेल माझ्या घरीं होते ना? मग दूधात केलेली चादकी व गाईच तूप ह्यात त्याचा वाटा आहेच कीं!"

सर्वांना सारखे वागविणें हा माझ्या आईचा देहस्वभाव असे. पण आमच्या शेजारीं असणाऱ्या ब्राह्मण मंडळींना आईचे हे वागणें पसंत पडत नसे.

आमचे शेजारी नाना खरे नावाचे श्रीमंत गृहस्थ होते. त्यांचा वाडा मोठा व इतमामही मोठा होता. सावकारी, जमीनदारी ह्या दोन्ही बाबतींत त्याच्या तोडीचा गावात कोणी नव्हता! त्यांचीही गुरे रामू व सदू राखीत असत. पण त्यांच्या घरीं हात ओले होण्याचा प्रसंग रामू सदूंना केव्हांही येत नसे; रानावरें परत नेण्यास व आणण्यास थोडा उशीर झाला, म्हणजे मात्र शब्दांचे

प्रहार नानाकडून त्या गुराखी मुलांना भरपूर मिळत असत ! पण तीं गरीब मुलें तोंडातून ब्रही काढीत नसत !

एकदा आमच्या घरचें आडावरचे अळू मागण्याकरितां नाना गडबडीने स्वतःच आले होते. आमच्या आडाचें घाण पाणी आम्ही त्या अळूच्या खड्यात सोडले होते. तेथें बाराही महिने तजेलदार अळूचीं पाने पाहून तीं वड्या करण्याकरिता मागून न्यावीत, असा कोणालाही मोह होत असे. आमची आई मागणारांच्या गरजेप्रमाणें अळूच्या देठ्या काढून देई. श्रीमत असो किंवा गरीब असो, जो अळू मागावयास येईल, त्याला ते मिळत असे.

पण नानासारखे लोक अळूं मागावयास येण्याचा कमीपणा मानीत. श्रीमताच्या घरीं अळूं किंवा दुसरी परसातील भाजी नेऊन देण्याचा प्रघात कांहीं लोकांच्या येथे होता. पण बापूंना ती गोष्ट पसत नव्हती. आमच्या घरचीं अळूचीं पानें उत्तम असतात, हे नानाना माहीत होते. एकदा त्याना अळूची फार गरज लागली, म्हणून ते स्वतःच आले.

त्यावेळीं आईच्या चांदक्या मी आणि आमचे गुराखी मित्र खात बसलो होतो. तेव्हां आमच्या आईकडे रागानें पाहात नाना म्हणाले,

" आनदीबाई ! तुम्ही ह्या गुराख्याना अस सोकवलय ! त्यामुळ हीं पोरं चढून गेलींत ! आमचीं गुर वेळेवर नेत नाहींत ! तुमच्या घरीं अस्सा खाण्यापिण्यांत त्याचा वेळ जातो. अशान हे लोक डोईजड होतात ! तुम्ही ब्राह्मण अशान आपली किंमत घालविता ! "

नानाचा क्रोध त्यांच्या शब्दातून बाहेर पडत होता, तेव्हां आई मला बोलली,

" गजू ! हात धू. आणि नानाना बैठकीवर नेऊन बसीव ! "

ती नानांकडे पाहात म्हणाली, " आणते ह नाना अळू मी ! गुराखी मुलें आपलींच कीं ! गजूबरोबर एकाद्या वेळीं देते मी त्यांना ताज्या चांदक्या ! दिवसभर तीं मुलें उन्हातान्हांत गाई वळतातच कीं ! त्यांना खायला दिल तर, त्यांच्या हातनं चागली गोसेवा होईल, नाहीं का ! "

आईचें हें बोलणें नानांना पटलें नाहीं पण आई अळू काढण्यास

चालली आहे, असें पाहून रामू व सदू हात धुवून पुढें झाले आणि त्यांनीं अळू काढून आणून ते नानांच्यापुढे नम्रपणें ठेविलें.

आईला काम पडूं नये, म्हणून ही चलाखी त्या मुलांनीं केली, पण नानांनीं त्या अळूवर माझ्याकडून पाणी घालवून घेतले. आणि रागानें त्यांच्याकडे पाहात ते अळू घेऊन गेले !

आमच्या घरांतली रीत गांवांतल्या श्रीमंत मंडळींना कशी आवडत नसे, एवढ्यापुरती मी ही गोष्ट तुम्हाला मध्येंच सांगितली आहे.

इतक्यात सुलभा म्हणाली,

" भाऊ ! तुमच्या वेळीं चहा नव्हता का ? तुमच्या घरांतल्या इतक्या दुधाचा उपयोग तरी कसा होत होता ? "

" बर विचारलस ! " मी म्हटले. " दुधाचा उपयोग खाण्या-पिण्यांतच होत असे. दहीं करून त्याचं डेराभर ताकही होई ! जो कोणी गरीब माणूस ताक मागावयास येई, त्याला आम्ही ताक देत असू ! ब्राह्मण माणसे त्यावेळीं गोरस विकीत नसत ! दूध विकणे हे पाप समजत असत ! "

" छान चालरीत होती त्यावेळीं ! " सदानंद बोलला. " तुमच्या पिढीला दूध, तूप, खाणेपिणे सकस मिळालें, म्हणून कणखरपणा आलाय तुमच्यांत ! नाहीं का ? "

मी सांगूं लागलों, " तेव्हांही गरीबांना दूधतूप बेताचेच मिळे आमच्या घरीं गाई पाळण्याची परंपरा होती, म्हणून त्यावेळीं तें मुबलक होतें, इतकेंच. दुपारच्या आईच्या स्वयंपाकात भाकरी, आमटी, भाजी आणि फार तर वैश्वदेवापुरताच भात असावयाचा ! आमच्याकडे तांदूळ कमी, पण ताक, दूध मुबलक ! "

" ते बरोबर आहे " शिवानंद बोलला. " कोंकणांत भात आणि देशावर भाकरी हें ठरलेलेंच आहे."

मी म्हणालों, " तेंच खरें आणि कामाचा प्रकारही तसाच निरनिराळा. कोंकणांत पोहे तर देशावर हुरडा. त्याचीच उसळ मधल्या खाण्याकरितां

करीत. बाजरीचीं व ज्वारीचीं कणसें कुटून दळणाकरितां धान्य तयार करण्याचें प्रसग आमच्या घरीं येत असत. हीं सर्व कामे आईच करी!

औषधें कुटण्यास ताईची व गजाईची मदत होत असे. साराश काय कीं, दिवसभर कसल्या ना कसल्या कामांत आई गुंतलेली असे. इतकीं कामें उल्हासानें करण्यांत एक प्रकारची तपश्चर्या आहे, असे बापू नेहमीं म्हणत असत, त्यात भरपूर सत्यता होती, हें मलाच काय, कोणालाही पटण्या-सारखे आहे."

सुलभा जांभई देऊ लागली, म्हणून माझें निवेदन मीं लागलीच आटोपतें घेतलें.

——

## प्रकरण पाचवे

माझीं मुले आणि सौभाग्यवती माझी वाट पाहात बसली होती, मी येताच माझ्या गोष्टीला मी एकदम आरंभ केला, मी सांगू लागलो,—

पाचव्या वर्षी मला शाळेत घातलें होते शाळेतील हुशार विद्यार्थी अशी माझी प्रसिद्धि होती. सारी उजळणी पाठ करणे आणि लहानसे बालबोध वाचनाचें पुस्तक खडाखड वाचता येणे, हीच हुशारीची कसोटी होती. बापूनीं अकरकी एकोत्रीसुद्धा सारी उजळणी माझ्याकडून घरीं पाठ करून घेतली होती. त्यामुळे शाळेत मला फारसें शिकावे लागत नसे.

सातवे वर्ष लागण्याच्या सुमारास मी दुसरी इयत्ता गाठली. बेरीज, वजाबाकी वगैरे नवीन विषय गुरुजी शिकवू लागले. खर्डेही लिहिण्यास सुरवात झाली. बापू मला आपल्याच अक्षराचे वळण काढून देत असत. घरच्या शिकविण्यामुळे माझे अक्षर लहानपणापासूनच सुबक आणि वळण-दार झालें होते.

शाळेत जेमतेम दोघे गुरुजी होते. त्यामुळे प्रत्येकास दोन तीन वर्ग शिकवावे लागत. एखाद्या हुशार मुलाला एकाद्या वर्गावर पाठवीत. त्या वर्गाचा अभ्यास तो मुलगा करवून घेत असे !

माझ्याकडे तेच काम गुरुजी देत. माझ्या वर्गात माझ्यापेक्षां वयानें मोठीं मुले होतीं. नाना खऱ्यांचा बाळू, इगळ्याचा विष्णु हीं मुले चांगलीं नऊ दहा वर्षांचीं झालीं होतीं, तरी दुसरीचा उंबरठा त्यांनीं ओलांडला नव्हता !

माझ्या हुशारीची गुरुजी तारीफ करीत, ती त्या मुलांना खपत नसे, खोटे बोलणे मला माहीत नव्हतें. एखाद्या मुलानें काहीं अपराध केला

आणि गुरुजींनी त्याची चौकशी चालविली, तर त्यांनीं विचारल्यास मला खरें सांगावें लागे. मुलाच्या मोहब्बतीकरिता त्यांनीं कितीही गळ घातली तरी, मी खोटें बोलत नसे. त्यामुळें उडाणटप्पू मुलात मी अप्रिय होऊ लागलो.

मुलांच्या क्षुल्लक वर्दळीचा परिणाम खेडयापाडयांतील पालकांवर ताबडतोब होतो, ह्याचा अनुभव आमच्या घराला लवकरच आला!

मला पक्के आठवत आहे कीं, चैत्र महिन्यातील सोमवारच होता तो! ती तिसऱ्या प्रहरची वेळ होती. मी त्या दिवशीं एकटाच डोंगरांतील महादेवास चाललों होतों. नाहींतर, मी, ताई आणि आई असें सर्वजण एकत्र जात असू, पण त्या वेळीं आई फार अवघडलेली असल्यामुळें तिला डोंगर चढून जाणें, योग्य नव्हतें. कामाधामाकरिता ताईलाही आईनें घरींच ठेवून घेतलें. देवाचा अगारा आणण्याकरिता जरा जवळच्या वाटेनें मी चाललो होतो.

त्या वाटेत आंब्याचीं, चिंचाचीं झाडे होतीं. आंब्याच्या कैऱ्या बऱ्याच मोठ्या झालेल्या असून त्या वाऱ्याच्या हेलकाव्यानें डोलत होत्या. क्वचित् पाड लागल्यामुळें पोपटासारखे पक्षी त्याचा स्वाद घेण्याकरिता इकडून तिकडे उडत होते. त्यामुळें तिकडून जाणारांना कैऱ्या पाडण्याचा मोह अनावर होई. माझ्या वर्गातील खरे, इगळे वगैरे मुलें तेच काम करीत होतीं. तेथील राखणदार मुलांना अडवीत होता. पण हीं श्रीमताचीं मुलें त्याला दाद देत नव्हती!

मी तेथें थोडावेळ थांबलो. मला राखणदाराचे बोलणे वाजवी दिसलें. म्हणून मीं माझ्या मित्राना म्हटलें,

" गडयांनो, दुसऱ्याच्या कैऱ्या कशाला पाडता? या नोकरावर त्याचा मालक रागावणार नाहीं का? तुम्ही फुकटचे आंबे खाल, पण त्याची चाकरी जाईल! मालकाच्या परवानगीशिवाय आंबे पाडणें, ही एक प्रकारची चोरीच नाहीं का?"

" गजा! गजा!" एक जण डोळे वटारीत मला म्हणाला, " मोठा आलाय शाहाणा आम्हांला न्याय शिकवायला? पुस्तकी बोलतोय पोपटासारखं झाल! गुरुजींनी चढवून ठेवलाय! खाण्याकरितां कैऱ्या पाडण्यांत

चोरी रे कसली ? आम्ही कांहीं खिसे भरून नेत नाहीं, घरीं त्या ! तू तरी आम्हाला सागतोस कशाला ? तुझ्या बापाचीं हीं झाडें नाहींत ना ? ''

मला ह्या बोलण्याचा राग आला व मी उसळून म्हटले, “ चोरी करितां अन् दुसऱ्याचा बाप काढतां ? चोर तो चोर अन् शिरजोर !”

मी असे म्हणताच सारीं मुले चेवलीं आणि मलाच चोर चोर म्हणत तीं माझ्या पाठीमागे लागलीं. मी त्याच्या हातीं लागलो, तर तीं दाडगट मुलें मला बडवतील, असे वाटताच मी तेथून जोराने धूम ठोकली ! मी पुढें आणि मुलांचा घोळका मागे अशी ती शर्यतच लागली !

इतक्यात सुलभा घाबरून म्हणाली, “ अगबाई ! भाऊ तुम्हांला पोरांनीं धरून बडविलें कीं काय ? सागा लवकर ! ”

सुलभाच्या बोलण्यानें साऱ्याना हसू आले.

नतर मी सागू लागलो—“ त्या दिवशीं माझ्या पायांत इतकी शक्ति कशी आली, हें माझे मलाच समजत नाहीं ! पळता पळता मी महादेवाचें माळ गाठलें. माझे पाय थकले. मी प्रतिकार करीत असतांही मला मार बसूं लागला. मी मोठयानें ओरडलों.

जवळच गुराखी गुरें चारीत होते. त्यांत रामू व सदू होतेच. आणखीही गोटया खेळण्यातील माझे मित्र होते. ते एकदम धावत आले. त्यांनीं कांहीं चौकशी न करिताच त्या मुलांना यथेच्छ झोडपलें. तीं मुलें मार खात सैरावैरा पळालीं !

मी देवळांत जाऊन अंगारा घेऊन रामू-सदू बरोबर घरीं आलों. त्या कृत्याचा गवगवा गावात फार झाला. गजूच्या चिथावणीनें गुराख्यांनीं आमच्या मुलाना मारलें. नाहीं तर, असें करण्याची त्यांची काय छाती होती ? असें नाना खरे गर्जू लागले !

गुराख्याचीं पोटें श्रीमंतांच्या जनावरावर चाललेलीं होतीं. मार खाल्लेल्या मुलाच्या पालकांनीं गुराख्याच्या आईवडिलाकडे कागाळ्या नेल्या. नाना आमच्या घरीं येऊन बापूंवरही तणतणले. दिसते एवढीशी वामनमूर्ति पण चागली आगलावी आहे, अशी माझी हजेरीही त्यांनीं घेतली; आणि

आईलाही ते म्हणाले, गुराखी पोटर्‍यांना तुम्ही चढवून ठेविले, त्यामुळें त्यांनीं आमच्या मुलावर हात टाकला!

गुराख्याच्या पालकांनीं आपल्या मुलांनाच झोडपले गयावया करून नाना वगैरेंची त्यांनीं मनधरणी केली, तरी नानांच्या क्रोधाचा पारा चढांतच होता!

हा सारा प्रकार पाहिल्यानतर आई मला शांतपणें म्हणाली, "गजू! त्या मुलाच्या वाटेस कशाला गेलास? तू नव्हते काहीं दुसऱ्यांचे आंबे पाडलेस? मग नसती कटकट आपल्यासारख्या गरिबांनीं कशाला करायची?"

"मी कांहीं वाईट सांगत होतो का त्या मुलांना?" मी आपली बाजू मांडूं लागलो. "शाळेत गुरुजी मला वाखाणतात, ते त्या मुलांना पटत नसावे, म्हणून त्यांनीं असा माझा सूड घेतलेला दिसतोय! प्रथम मलाच त्यांनीं मारले, हे कोणीच विचारांत घेत नाहींत कस?"

पण आईला एकदरींत झालेला प्रकार' पसत पडला नाहीं. ती माझ्या तोंडावरून हात फिरवून म्हणाली,

"गजू! तीं मुले मोठीं आहेत. दाडगट आहेत. तूं फार लहान पडतोस. जळात राहून माशाशीं वैर कशाला? तू त्या मुलांच्या वाटेस जाऊ नकोस. माझें ऐकशील का?"

माझ्या आईला वाईट वाटू नये म्हणून मी "होय!" असे म्हटलें. पण बापूनीं हे आमचें बोलणे दुरून ऐकिलें होते, ते पुढे येऊन म्हणाले,

"गजूला असा मिळमिळीत का करायचा आहे? त्याने अपराध तरी असा काय केला? रामदासांनीं म्हटले आहे कीं—

**खटासी असावें खट। उद्धटासी असावें उद्धट।**

व्यवहारात अस वागल्याशिवाय चालायचें कसे? गजू अगदींच लहान आहे. त्याने आवाका पाहून वागावें, असें पाहिजे तर त्याला सांग. पण त्याच्याकरितां त्याचे अडाणी सवगडी धावून आले, याचे कौतुक करावयास पाहिजे. गजाऊ आणि तिचीं मुलें यांची मात्र चांगली विचारपूस कर."

वडिलांचें हे म्हणणें आईला पटलें. तिनें दुसऱ्याच दिवशीं रामू, सदू वगैरेंना गोड गोड साजा करून घातला.

मुलांमुलांतील हा वाद दोन चार दिवसांतच संपला. बाळू खरे, विष्णु वगैरे आम्ही सारे एकत्र खेळू लागलो. पण नानांच्या मनांत ह्या क्षुल्लक प्रकारावरून कायमची अढी बसली. ते मला सोडून माझ्या वडील-मातुश्रींच्या पाठीस लागले.

आमच्या घरातील कच्चा दुवा म्हणजे आमचे चुलते अण्णा हे होत. माझ्या जन्मापासून ते बापूशीं तुटकपणें वागू लागले होते. पण त्यांनीं देवगांवच्या शेताकडे पाहिलें नव्हते. आमचा प्रपंच त्याच शेतीवर चाललेला होता. नाना खऱ्यांना या गोष्टी उघड उघड दिसत होत्या.

नाना म्हणजे गावचे मुत्सद्दी अशी त्यांची ख्याती होती. त्यांचें वय बापूंच्यापेक्षा पांच दहा वर्षांनीं अधिक होते. अण्णांशीं संधान बाधून आमच्या घराचा खेळखंडोबा करण्याची तयारी त्यांनीं आंखली होती.

पण त्यापूर्वीं बापूकडून त्याना एक काम करवून घ्यावयाचें होतें. तें काम बापू सहजासहजीं करणार नाहींत, असे त्यांना वाटत होतें, म्हणून " अण्णा शेतांची वाटणी करू इच्छित आहेत, पण त्यांना मीच तसे करू देत नाहीं, तुमच्या घरात कच्चींबच्चीं आहेत. त्याचा निर्वाह शेतांची वाटणी झाली म्हणजे होणार नाहीं, शिवाय अण्णांना नोकरींत पैसे भरपूर मिळत आहेत, तेव्हां त्यांनीं वाटणीचा आग्रह धरूं नये, असें मी कळविलें आहे " असे ते घरीं येऊन आईवाडिलाना सांगत असत. या सांगण्यांत नानांचा काहींतरी कावा असावा, हे आमची आई व वडील समजून होते.

तो कावा नानांना फार दिवस छपवून ठेवितां आला नाहीं. त्यांची एक भावजय होती. तिने नानांच्यावर कोर्टात दावा लाविला होता. त्यांत नानांच्या वतीनें बापूंनीं साक्ष द्यावी, अर्थात् खोटी साक्ष द्यावी, आणि तिचा गळा कापावा, अशी दुष्ट इच्छा नानांची होती. पण त्याला

गोजीरवाणें रूप देऊन नाना बापूंचें मन वळवीत होते. मधूनमधून अण्णाच्या वाटणीचा धाकही ते घालीत होते !

कोणत्याही गांवांत पैसे दिले म्हणजे साक्ष देणारे बिलंदर लोक सर्व जातींत आढळतात. त्याचा एक तो धदाच असतो, आणि त्यावरून न्याय-निवाडा ठरत असतो !

पण माझे वडील अशा पापी मार्गांतले नव्हते. ते सात्त्विक आहेत, असें अख्खे गाव समजत होते. त्यांनींच जर साक्ष दिली, तर आपली बाजू बळकट होईल, अशी नानाची खात्री होती. असल्या किचकट गोष्टी मला त्या वयांत समजणें शक्य नव्हते. पण पुढें आई व ताई ह्यानीं सागितलेल्या माहितीवरून ती सारी वस्तुस्थिति मी जाणली.

बापूंनीं खोटी साक्ष द्यावी, ह्या करितां एकदा नाना आमचे घरीं आले आणि लाघवी भाषेंत बोलले—

" बापू ! साक्ष देण्यानं माझाही फायदा होतोय आणि तुमचाही होतोय ! माझ्या धाकट्या भावाची सपत्ति मलाच मिळणें वाजवी नाहीं का ? विधवेच्या हातीं ती गेली, तर केवढा अनर्थ होईल ? आम्ही बंधु एकत्रात होतो, अशी साक्ष द्या म्हणजे झाले ! त्यांत कसलें पाप आहे ?" " नानासाहेब ! " बापू म्हणाले, " वस्तुस्थिति तशी नव्हती, हें मला माहीत आहे, तर म्या ब्राह्मणानें तशी खोटी साक्ष कशी द्यावी बरें ? "

" त्यांत एवढें भिण्यासारखें काय आहे ? " नानासाहेब बोलले. " एवढा सत्यप्रतिज्ञ धर्मराज देखील वेळ प्रसंग जाणून अर्धवट असत्य बोललाच ना ? श्रीकृष्णाच्या सागण्यावरून 'नरो वा कुंजरो वा' असें त्यानें खोटें सागितलें ना ? श्रीकृष्ण म्हणजे धर्मराजाचा स्नेही. तेव्हा वेळप्रसंगीं सत्याला बगल द्यावी लागते. मी तुमचा शेजारी व मित्र आहे. मग मित्राकरिता तुम्हांला साक्ष दिलीच पाहिजे " " मी साक्ष देईन. " बापू म्हणाले, " पण खोटी साक्ष देणार नाहीं. असत्य बोलून मी जीभ विटाळणार नाहीं ! पाप करणार नाही ! "

नानासाहेब भरपूर आमिष दाखवीत होते. भावाची गडप केलेली

संपत्ति त्यांना तसें वदवीत होती. बापू खोटें बोलण्यास तयार होत नव्हते. शेवटीं नानासाहेब रागारागानें उठले व जातांना हातवारे करीत म्हणाले,

" पाहा बरें बापू ! याचा परिणाम चांगला होणार नाहीं ! गांवची सारी ब्राह्मण मंडळी तुमच्या वाईटावर आहेत. मीच काय तो तुमची बाजू घेत असतो. तेव्हां माझें ऐका. नाहींतर माझ्याशीं गांठ आहे बरें!"

खरे निघून गेल्यावर आई बापूंना निक्षून बोलली—

" ऐकलंत का ? नानांचं म्हणणं मुळींच ऐकायचं नाहीं. खोटी साक्ष द्यायची नाहीं. काय त्यांचा ढोंगीपणा ! देवापुढं नाक धरून घटकान् घटका बसतात ! अन् दुसऱ्याला पाप करायला सांगतात ! पण एवढं कशाला आपल्याला ? काय व्हायचं तें होईल ! भाऊजींचे कान त्यांनींच भरविले असावेत. घराचा खेळखंडोबा ते करतील. करीनात का ? देवाला सगळं दिसतंय ! "

त्या वेळीं आईच्या डोळ्यांत विलक्षण करारीपणा दिसत होता. मी आणि ताई कोपऱ्यांत गुपचूप बसून होतो. थोडा वेळ घर अगदीं शांत होतें.

कांहीं वेळानें बापूच हसत हसत म्हणाले—

" दोन पैसे मिळतात तर कां सोडा ? आतां मुंज आहे, लग्न आहे. पैशाची गरज लागणारच. काय पुढच्या जन्मीं व्हायचं तें होईल. पण आतां मिळतें त्याला लाथ कां द्या ? "

बापू आईला असें चिडवीत होते. पण आईला असलेही उद्गार ऐकवत नव्हते ती म्हणाली,

" मग मनाचे श्लोक उगाच का रोज म्हणायचे ! देवावर श्रद्धा असल्यावर असले लुंगेसुंगे आपलं काय बरं वाईट करणार ? मनाचा एक श्लोक आपण म्हणतोंच कीं—

महासंकटीं सोडिले देव जेणें ।
प्रतापें बळें आगळा सर्व गूणें ॥
जयातें स्मरे शैलजा शूळपाणी ।
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

आईच्या बोलण्याकडे बापूचे लक्ष होते. मनांतल्या मनांत हसत ते म्हणाले, "हो! खरं आहे तें! पण तुझा राम आपल्या मदतीस कसा येणार? आपली आजची गरज का तो भागविणार आहे?"

"असलं दुटप्पी नको बोलायला!" आई म्हणाली. "पैसा काय आज येईल उद्या जाईल! एकदां सत्त्व गेलं म्हणजे सर्वस्व गेलं म्हणून समजाव. मी अगदीं निक्षून सांगते. गजूची शपथ आहे तुम्हाला. खोटी साक्ष देऊं नका. लबाडीच्या पैशाला शिवूं नका—"

बापू गहिंवरले व ते मजजवळ आले. मला कुरवाळीत ते आईला बोलले-"अग! मी उगीच बोललों. गजूची शपथ मला घालू नकोस. हाच पुढें आपल्या घराण्याचे नांव काढणार आहे बरें! सुखामागून दुःख येतें, असे आपल्या प्रपचांत होऊं लागले आहे. व्यास महर्षींनीं म्हटलं आहे कीं—

सुखस्यानन्तरं दुःखं दुःखस्यानन्तरं सुखम्।
न नित्यं लभते दुःखं न नित्यं लभते सुखम्॥

"मला असलं कांहीं अवघड कळत नाहीं!" आई बोलली. "पण मला सांगा, तुम्ही खोटी साक्ष देणार नाहीं ना!"

"नाहीं! नाहीं! नाहीं!" बापू म्हणाले. "त्रिवार नाहीं!"

त्यावेळीं आईच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. बापूही गहिंवरले! आम्ही मुलेही रडूं लागलो. नंतर आम्हा मुलांना बापू देवाला घेऊन गेले.

* * *

इतके सांगून मी थांबलो, त्यावेळीं माझ्या पत्नीकडे व सुलभाकडे मीं पाहिलें. दोघींचे डोळे ओले झाले होते. सुलभाची आई म्हणाली,

"आजची गोष्ट पुरे झाली गडे! सासूबाईंच्या धैर्याची श्रेष्ठता आमच्या मनांत रात्रभर चांगली मुरू द्या!"

## प्रकरण सहावें

ठरल्याप्रमाणें आम्ही सारे जमल्यावर शिवानंद म्हणाला, "भाऊ! आजोबाच्या त्रासाला सुरवात झाली, ती अगदीं क्षुल्लक कारणानें? पण बेळगांवचे अण्णा चागले शिक्षित तर होते, ते नाना खऱ्याच्या कापट्याला बळी पडले कीं काय?"

मी माहिती सागू लागलों—

"माझ्या जन्मामुळे सबंध हिश्शाचे वारसदार होण्याची अण्णांची अंतस्थ इच्छा विफल झाली. मग बापूंच्याकडून आपला निम्मा हिस्सा घेण्याची संधि ते कसे दवडणार? गावातील वजनदार लोक सामील असले, म्हणजे त्याच्या दडपणाने वाटणीचे काम सोपे होतें. नानामुळें ही संधि तात्याना लाभली आणि थोड्याच दिवसांत त्यांच्याकडून बापूंना पत्र आले.

बेळगांव

ती. रा. रा. बापूंना,

बालकें अण्णाचा कृ. सा. न. वि. वि.—

आपले शेजारी नाना यांचीं पत्रे मला नेहमीं येतात. आपल्या शेतीवर तुम्ही कर्जाचा बोजा फार करून ठेवीत आहांत, असें त्याच्याकडून समजलें. तुमचा योगक्षेम घरीं चांगला चालावा, म्हणून मी आपल्या भागाचें उत्पन्न आणीत नव्हतों. पण ऋणामुळें सर्व जमीन झुमला खलास होईल. तेवढ्याकरिता आपण आतां सरळ वाटणी करून घेऊं. तुम्ही आपल्या कर्जाच्या डोंगराचें ओझें

सहन केलें पाहिजे. त्याला मी जबाबदार नाहीं. माझ्यातर्फे तेथें ती. नाना खरे सारा व्यवहार पाहातील. मी सवड करून लवकर येईन. तोपर्यंत नानांच्या समतीने काय करावयाचे तें ठरवा.

श्रुत होय ही विज्ञापना.

बालक

अण्णा

अण्णांचें पत्र नानांच्या चिथावणीनें आले होतें, हें उघड होतें. त्यामुळें नाना आतां बापूंना तुसडेपणानें आणि डाफरून वाटणीसंबंधीं विचारूं लागले.

अद्यापि बापूंना असें वाटत होते कीं, अण्णा आपला धाकटा बधु आहे, त्याची भेट झाली, म्हणजे त्याला सारी परिस्थिति समजाऊन देऊं. म्हणजे तो वेडावाकडा हट्ट धरणार नाहीं. नानाचें कारस्थान त्याचे आंगावर उलटवूं !

बापूंनीं अण्णांना पत्र लिहून मी बेळगांवास येत आहे, असें कळविलें. घरचा व्यवहार आपण आपसात ठरवूं, असेंही त्या पत्रांत लिहिले होतें.

अण्णांनाही ती गोष्ट पटली होती. पण बापूंना बेळगांवीं लवकर जातां आलें नाहीं. कारण त्याचवेळीं आई बाळतीण होऊन मला भाऊ झाला. गरोदरपणीं एक महिना नवस करून महादेवाची उपासना तिने कडक रीतीनें केली होती, म्हणून त्याचें नांव शंभु असें ठेविलें.

ह्या गोष्टीस दोन तीन महिने झाले नाहींत, तोंच बापूही आजारी पडले. तो मुदतीचा ताप होता. त्यामुळें आम्हा सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें.

त्यावेळीं नानांनीं पत्र घातल्यामुळे अण्णा मात्र ताबडतोब आले. आई नुकतीच बाळतपणांतून उठली होती. बापूंची शुश्रूषा करीत होती. अण्णांची बडदास्त तिलाच ठेवावी लागत होती. आपली वाटणी त्याच वेळीं करून घेण्याची घाई अण्णांना सुटली होती ! अशा स्थितींत आईची मनःस्थिति कशी झाली असेल, ह्याची कल्पनाच केलेली बरी ! पण ह्या साऱ्या प्रतिकूल परिस्थितीचा परिणाम मनावर यत्किंचितही होऊं न देतां धीर गंभीरपणें ताईच्या मदतीनें ती

आपलीं कर्तव्यें पार पाडीत होती ! परमेश्वरावर तिची नि.सीम श्रद्धा असल्यामुळें त्याच्या सतत चिंतनामुळेच बापूची शुश्रूषा हसतमुखानें करता येत होती तिचे ते कष्ट पाहून बापू एकदा म्हणाले--

" कोण हे तुझे परिश्रम ! सकटें एकदम आलीं तरी तुझ वज्रासारखें हृदय तीं सारीं सहन करिते ! परमेश्वरी योगायोग काय असेल तें असो ! पण गजू नि शभु तुझे सारे पाग फेडतील, अशी माझी श्रद्धा आहे ! " बापूना आणखी कांहीं बोलावयाचें होते पण त्यांचा कठ दाटून आला, त्यांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहू लागले.

त्यावेळीं सौम्यपणें आई म्हणाली--" अस काय बोलायच बरं ! मी औषध देत आहे ना ? बर होणारच अशी खात्री आहे ! भाऊजींना काय पाहिजे असेल ते घेऊ द्या ! आमच नशीब तर ते नेत नाहींत ना ? "

बापूचें बरें वाईट झाले, तर बायका मुलाशीं कटकट नको, म्हणून अण्णांनीं वाटणीची घाई चालविलेली होती ! त्यानीं थोडें मन उदार केलें होतें. सर्वस्वीं नाना खऱ्यांच्या अधीन ते झाले नव्हते.

अण्णांनीं शेताची रीतभर वाटणी करून कर्जाचा बोजा फिटेपर्यंत दोघांचेही भाग सावकाराच्या ताब्यात दिले. व बापूना एक शेत चरितार्थासाठीं ठेविलें. बापूंनीं मुकाट्याने त्या कागदावर सही केली. नाना खऱ्यांनीं त्यावेळीं कुत्सितपणे आईकडे पाहिले. व साक्ष घातली ! त्यावेळीं हलकेच आई बोलली,

" नाना ! तुम्ही वडील माणसं ! आम्हीं काय बोलायचं ! पण वेळ काळ पाहून शाहाणे लोक वागत असतात ! भीक मागू पण कोणाच मिंधं राहून जगायचं नाहीं, असा आमच्या घरचा निर्धार आहे ! तो चालविल्याशिवाय श्रीहरी राहाणार नाहीं ! "

नानानींच काय पण अण्णांनींही खालीं मान घातली. माझ्या साध्वी मातेपुढे बोलण्यास त्यांना आतां तोंडच राहिलें नव्हतें !

बापूंची सेवाचाकरी आतां अण्णाही करूं लागले. बापू त्या आजारांतून उठले. अण्णांनीं रजा वाढवून घेतली होती. दोघे बंधु प्रेमानें वागतात असें जगाला दिसत होतें. वाण्याकडील सामान उधार आणून आमच्या

घरचा खर्च चालला होता. आई खर्चाच्या पायीं अगदीं मेटाकुटीस आली होती.

पण नानाच्या सागण्यावरून अण्णानीं तेथें आणखी मुक्काम वाढविला होता. स्वार्थापुढें प्रेमाची मात्रा फारशी चालत नाहीं. अण्णाना आणखी थोडा स्वार्थ साधून घ्यावयाचा होता. वस्तुत: इतकी घाई त्यानीं करावयास नको होती. पण तवा तापलेला आहे, तोपर्यंत पोळी भाजून घ्यावी, असली संधिसाधुवृत्ति त्याना तसें करावयास लावीत होती. बरींच वर्षे नोकरींत गेल्यामुळे ही वृत्ति त्याच्यात मुरलेली होती. त्याचा मुक्काम बंधु-प्रेमामुळे वाढलेला आहे, असे आम्हाला वाटत होतें, पण आमच्या विचाराचा तो बुडबुडा एक दिवस अचानकपणें फुटलेला माझ्या दृष्टीस पडला.

बेळगावास जाण्याच्या एक दोन दिवस अगोदर बापूंशीं अण्णाच्या कसल्या तरी वाटाघाटी चालल्या होत्या. बापूंनीं त्या आईच्या कानावर घातल्या असाव्या, असे आईच्या बोलण्यावरून आमच्या लक्षात आले. त्या दिवशीं सायंकाळीं अण्णा नानाच्या घरीं फराळास गेले होते. आम्ही मुलें जेवावयास बसलों होतों. बापूंचे पथ्याचें खाणें त्याच वेळीं चालले होते. तेव्हा बापू आईला म्हणाले,

" अण्णा म्हणतों, तसें करायचें का ? का आजचे मरण उद्यांवर ढकलावयाचें ! तू सागशील तसे मला करावयाचें आहे. मी या आजारांतून उठलों खरा. पण अंगांत त्राण राहिलेला नाहीं ! काय व्हावयाचे तें डोळ्यादेखत झालेलें बरें ! "

" एवढा कसला विचार करायचा ? " आई निश्चयी स्वरात म्हणाली. " केव्हा तरी एक घाव दोन तुकडे व्हावयाचेच. मग आत्तांच का होईना? त्याना न्यायचं तें नेऊं द्या कीं ! मग उगीच मागं कटकट तरी राहाणार नाहीं ! आणि अस आहे तरी काय ? चार भाडींकुंडी जातील झालं ! गाडग्ीं मडकीं तरी मिळतील ना आपल्याला ! मनाच्या समाधानांत सुख साठविलेलं असतं. सोन्यारुप्यांत तें नसतं ! आणखी असं पाहा कीं,

आपलीं मुलें हीच मला त्रिभुवनाच्या संपत्तीपेक्षा अधिक वाटतात. दैव अनुकूल असेल, तर लाथ मारतील तिथं पाणी काढतील कीं ! ”

आईच्या ह्या बोलण्यानें बापू सर्दच झाले. ते तिच्याकडे समाधानी नेत्रानें पाहूं लागले व म्हणाले,

“ काय तुझें मन हें ! किती मोठेपणा त्यांत भरलेला आहे हा ! बायकाचें मन ससारातल्या बारीकसारीक जिन्नसातून निघत नाहींत म्हणतात. पण तुझें सारें औरच ! तुझ्या मनात कुढेपणाला थाराच नाहीं. सर्व खरा नि मोकळा कारभार ! ”

ह्यापुढें बापूंना बोलवेना आणि आईच्याही तोंडातून शब्द बाहेर पडेना. बापू हात धुण्याच्या निमित्तानें पानावरून उठले. मी ताईकडे पाहिलें. तिला बिचारीला रडूं येत होते. मला त्याचें कारण चागलेंसे कळत नव्हतें.

पण इतक्यात शंभू पाळण्यात हातपाय जोराने हलवीत हुंकार देऊं लागला. ताई पानावरून चटकन् उठली व मीही माझें जेवण आखडतें घेतले.

दुसऱ्या दिवशीं अण्णानी बेळगावीं जाण्याची तयारी चालविलेली होती. मी शाळेतून आलों, त्यावेळीं भाड्याकुंड्याचीं दोन तीन पोतीं अण्णा सोप्यावर शिवीत असल्याचे माझ्या नजरेस आलें होतें. त्या दिवशीं जेवणही लवकर व्हावयाचें होते.

बापूंची पार्थिव पूजा कधीं चुकत नसे. त्यानीं मातीचें लिंग करून तें हातात घेतलें होते. त्याला गंधपुष्प त्यानीं वाहिले होते. इतक्यात अण्णा पुढें आले आणि बापूंना म्हणाले, “ बापू, शंकराचे लिंग तुमच्या हातांत आहे. त्याची शपथ घेऊन, वाटणी करण्यासारखा पैसाअडका, सोनेंनाणें वगैरे मजजवळ नाहीं, असे मला सागा. असेल तर त्याची वाटणी करितों असें म्हणा. ”

“ अण्णा ! माझ्यावर तुझा विश्वास नाहीं का ? ही बघ आता लंकेची पार्वती झालेली आहे. एक एक जिन्नस मोडीत मोडीत आता काहीं मजजवळ राहिलें नाहीं. दुखण्याच्या वेळचें देणेंच कितीतरी झालें आहे. बघ बाबा ! एक घोडें आहे वाटावयाचे, तें पाहिजे तर तूं ने ! आणि दोन

गाईही घेऊन जा! तुला शपथच पाहिजे असेल, तर तीही मी आतां निःशंकपणें देण्यास तयार आहें."

बापूंच्या बोलण्यानें अण्णांची शंका फिटली. नानांच्या सांगण्यावरून अण्णांनीं हा अतिप्रसंग केला होता. बापूंनीं अण्णांना भांडीं वाटून दिलींच होतीं. आतां गाई न्याव्या कीं नाहीं, ह्या विचारांत अण्णा होते.

इतक्यांत तेथें नाना आले, त्यांनीं एका बाजूस नेऊन पुन्हा अण्णांचे कान फुंकले.

अण्णानी घोडे बापूकरितां ठेवून दोन दुभत्या गाई आपल्या वाटयास घेतल्या. त्याही पण कांहीं दिवस सांभाळण्याकरितां त्यांनीं नानांच्या घरींच ठेविल्या!

आम्हां मुलांचें अशा रीतीनें दूध गेले. त्यावेळीं मात्र आई थोडी हिरमुसलेली दिसली. पण बापूंच्या पुढें ब्र काढावयाचा नाहीं, असा तिचा निश्चय होता. भाऊबदकी म्हणतात, तिचा असा अनुभव आमच्या घरीं आला!"

* * *

माझें सांगणें संपतांच सुलभा म्हणाली,

"काय बाई! सख्खे बंधु इतके कठोर कसे होतात भाऊ? शिवा, सदा तुम्ही ह्यापासून धडा घेतला पाहिजे हो!"

सुलभाच्या बोलण्यानें आम्ही सारेच खो खो हसूं लागलों. नंतर थोडयाच वेळांत झोपण्यास गेलो.

---

## प्रकरण सातवें

नेहमींप्रमाणे आम्ही सारे गच्चीवर जमावयाचें, पण त्या दिवशीं शिवानद नव्हता, तो त्याच्या मित्राबरोबर त्याची शेती पाहाण्यास गेला होता. ही गोष्ट सुलभास समजल्यावर तीच म्हणाली,

" भाऊ ! शेतांत काय काय लावतात हो ! मला बाई सगळं बघायचं आहे, तुम्ही नेतच नाहीं, शेतांत आम्हाला ! "

" हो ! तें खरच आहे सुलभा !" मी म्हटल "आता खेडयापाडयांत कुणाला राहायला नकोच झालेल आहे ! तुला आतां एकदां नेईन आपल्या गांवी. तिथ तर केवढी शेती आहे आपली ! मला लहापणींच शेतांची चांगली माहिती झालेली आहे !"

" ती कशी हो भाऊ !" सुलभा म्हणाली. " तुम्ही काय स्वतः शेती करीत होता ? कीं रानावनांतून भटकत होता ? "

सुलभाच्या बोलण्याने आमच्या सौभाग्यवतीला विशेष हसूं आलें. तिनें सुलभाला दाबलें. इतक्यांत सदा बोलला,

" भाऊ ! सांगा तुमची पुढची हकीकत ?"

" हो ! आतां मी सांगतों, त्यांत थोडासा शेतीचा संबंधही आहे. खेडयांतील शेतापासून तों अगदीं गरीब शेतकऱ्यांचे खोपटांपर्यंत देखील आम्ही वावरलों आहों !"

" त्याचें असें झालें !" मी सांगूं लागलों, " अण्णा निघून गेले तेव्हां घरांत थोडी शांतता पसरली. दोन्ही दुभत्या गाई गेल्यामुळें आईचेंही

काम कमी झालें. पण दोन तीन दिवसांनीं अवेंळीनें दिलेली गाय मिनत वारीनें आम्ही ती परत आणिली. त्यामुळें आमच्या दूधदुभत्याची पुन्हा सोय झाली. शेती सावकाराकडे गेली. फक्त एक शेत घरीं राहिलें. त्यानें निर्वाह होणार नव्हता. तेव्हां कोठें तरी नोकरी करावी, किंवा गावोगांवीं जाऊन पुराण सांगून काय मिळेल तें आणावें, असे विचार बापू बोलून दाखवूं लागले.

गावच्या उचापती करून दोन पैसे मिळविण्याची बुद्धिमत्ता बापूंत होती. कायद्याचें जुजबी ज्ञानही त्यांना होतें. कुळांना चिथाऊन देऊन नानाप्रकारच्या सावकारांना तोंडघशींही पाडून त्यांना दोन पैसे मिळवितां आले नसते, असें नव्हतें, पण माझे वडील सात्त्विक वृत्तीचे होते. त्यांना लबाडी, खोटेपणा, असत्यता ह्या दुर्गुणांची मनापासून चीड होती. आणि आई तर काय धुतल्या तांदुळाची शुद्धता तिच्या पुढें फिकी पडेल अशीच होती! अशाही माणसांना विरोधी हितसंबंधामुळे पाण्यांत पाहाणारे जसे लोक भेटत, तसे त्यांचे गुण जाणणारेही सज्जन त्या वेळच्या समाजांत असतच.

आमचें आडनांव जोशी होतें. आमची जोशीपणाची वृत्ति वाडीची होती. तींत आमचा आठ आण्याचा हिस्सा होता. पण प्रत्यक्ष जोशीपण आतापर्यंत बापूंनीं केलें नव्हतें. आमचे उपाध्ये भटजी यांनाच तें काम आम्ही सांगत असूं.

कोठें तरी पुराण सांगण्याकरितां परगावीं जावें असा विचार अनेक कारणामुळें पक्का होईना. काय करावें तेंही ठरेना. अशा प्रसंगीं निश्चित मत होण्यासाठीं बापू ' ॐ **नमः शिवाय** ' असा जप करीत बसत असत. पण जपाकडेही त्यांचें लक्ष लागेना.

दुसरे दिवशीं एकादशी होती. बापू प्रातःकालीं उठून डोंगरांतील महादेवास जाण्याच्या तयारींत होते. निर्जळी एकादशी करून दिवसभर महादेवास अभिषेक करीत बसण्याचा त्यांचा विचार होता. पण काय असेल तें असो, अभिषेक करण्यापूर्वींच परमेश्वरास त्यांची दया आली!

बापू घरांतून बाहेर पडणार, इतक्यात वाडीचे पोक्त खेडूत आमच्या घरीं आले. त्यानीं रताळीं, भुइमुगाच्या शेंगा असले फराळाचे पदार्थ बरोबर आणिले होते.

त्या काळीं ब्राह्मणावर खेड्यातील लोकांची श्रद्धा होती. आपलीं धार्मिक कृत्ये ब्राह्मणाकडून करवून घेण्याची त्याची पूर्वापार वहिवाट होती. बापूचे विशुद्ध आचरण वाडीच्या लोकाना माहीत होते. शिवाय त्या वाडीचें जोशीपण त्यावर्षी आमच्याकडेच आलेले होतें.

त्या मंडळीचा आग्रह बापूनींच त्या सालचें आपले वाडीचे जोशीपण स्वत:च करावे असा होता. थोडीशी वाटाघाट झाल्यानतर बापू म्हणाले—"आमची वृत्ति जोशीपणाची आहे, तेव्हां तुमची आज्ञा मला मानलीच पाहिजे. मी कोठेतरी हातपाय हलविण्याचा विचार चालविला आहे. तसें केल्याशिवाय प्रपच चालणार नाहीं, अशी सध्यां आमची स्थिति झालेली आहे. पण मला घरचाही विचार घेतला पाहिजे." स्वयपाक घरांत जाऊन बापूनीं आईला सर्व गोष्टी समजाऊन सांगितल्या. देवाचा नैवेद्य किंवा सत्यनारायण करण्यासाठीं त्या लोकांच्या घरीं जाऊन स्वयपाक करावा लागतो, ही गोष्ट त्यांनीं मुद्दाम तिच्या लक्षांत आणून दिली. तेव्हां आई म्हणाली,

"लोकांची श्रद्धा आहे ना? तर आपण त्यांची सेवा करूं या! मला त्यांत कसलाही सकोच वाटणार नाहीं! देवानच संधि आणली आहे, मनाच्या श्लोकांत कुठसं आहे की,

जगीं पाहातां देव हा अन्नदाता।
तया लागली तत्त्वता सार चिंता॥

हेंच खरं आहे. सांगा त्या मडळींना जोशीपण करतो म्हणून!"

लोक खूष होऊन परत गेले पण आमचे उपाध्ये रामभटजी यांना मात्र मनस्वी राग आला. असलीं कामें आम्ही त्यांनाच आतांपर्यंत सांगत होतो. आम्हीच जोशीपण करण्याचें ठरविल्यामुळें त्यांची मिळकत बुडाली! आमचा सूड घेण्याकरितां ते आमच्या विरोधी कपूत सामील झाले!

त्या वाडींत बागाईत शेती बरीच होती. पंचांग सांगण्याच्या निमित्तानें बापूंना शेतींतील वस्तीवर जावें लागे. बापूंचें घोडें दिसलें कीं, लोक त्याना सामोरे जात. ते घोडयावरून उतरताच घोडयास चारा घालीत. बापू कोणत्या तिथीस किंवा सणास काय करावें, तो कोणत्या दिवशीं हें जें सांगत, तें ते लोक काळजीपूर्वक ऐकत. बापू शिवारातून चक्कर मारूनही येत, तोंपर्यंत त्याच्या पडशींत मळेकरी ताजा भाजीपाला किंवा नवें धान्य धून्य भरून ठेवीत. लोकाच्या ह्या श्रद्धेमुळें बापूंना कित्येक वेळां गहिंवरून येई !

ताजी भाजी, मक्याचीं कणसें, ऊस, रताळी, वेळीं इत्यादि जिनसांची आमच्या घरीं रेलचेल होई. माझी आई गुराखी, किंवा दुसरे गरीब लोक ह्यांना ते जिन्नस वाटल्याशिवाय राहात नसे. ती आमचीच आई नसून गरीब समाजाची आई असे, असेंच केव्हां केव्हां मला वाटल्याशिवाय राहात नसे.

इतक्यात सदानदानें विचारलें,

" भाऊ ! तुम्ही तर तेव्हां लहान होतां. घरांतून शाळेंत आणि शाळेंतून घर, असाच तुमचा कार्यक्रम असेल, नाहीं ! मग तुम्हाला शेतीची माहिती कशी झाली म्हणता ! "

" हो ! बरं विचारलेंस सदा ! " मी म्हटलें. " आतां तेंच तर मला सागायचं आहे. वडील वाडीकडे चालले, म्हणजे मीही त्यांच्याबरोबर कधीं कधीं शिवारांतून हिंडण्याकरिता जात असे.

शेताभातांतून फिरल्यानें आणि शेतकऱ्यात आपुलकीने मिसळल्यानें सृष्टीचें व समाजाचे खरेखुरें सामान्य ज्ञान मिळतें, यात शंका नाहीं.

मृगाचा पाऊस पडल्यानंतर जमिनींत पेरणी कशी करितात, हें मी पाहात असे आणि बीं रुजू लागल्यापासून कणसें येईपर्यंत त्या रोपट्यांचें निरीक्षण मी करीत असे. कोरडवाहू जमिनींत बाजरीचीं कणसें आलीं कीं, आम्ही तो लिंबोर आणून भाजून खात असूं. शेतांतील चवळीच्या, मुगाच्या व पावट्याच्या शेंगा आणि आंबाडयाची भाजी मी स्वतः तोडून आणीत असे.

बागाईत जमिनींत मक्याची वाढ जलद होत असे. मक्याचीं कणसें म्हणजे आमचा फार आवडीचा मेवा होता. आताच्या सारखा विलायती भुईमूग त्या वेळीं नव्हता. देशी भुईमूग कुदळीने खणून काढल्याशिवाय भरपूर शेंगा सापडत नसत. जमिनीच्या पोटांतील तो शेंगाचा ठेवा म्हणजे एक ईश्वरी अजब करामत आहे, असें मला वाटे. आंबट आंब असलेला हरभरा, हिरव्या चिचा व कैऱ्या स्वतः काढून त्याचा आस्वाद घेण्यात मला मजा वाटे. आजदेखील त्या जुन्या गोष्टींची आठवण झाल्याबरोबर तोंडास पाणी सुटल्याशिवाय राहात नाहीं !

बापूंच्या बरोबर असल्यानें मला आणखी कितीतरी गोष्टी समजत. ते खेडूतात मिसळून त्यांच्या सुखदुःखांशीं, समरस होत. कोणाचीं पत्रें लिहून देत असत. लग्नकार्यांच्या, वाटाघाटींत भाग घेत. ह्या गोष्टी पाहून मला तेथील समाजाच्या चालीरीतीचें ज्ञान होई. लग्नकार्यांत मी मंगलाष्टकें म्हणत असे. त्यामुळें माझें कौतुकही होई. त्या लोकाचा प्रेमळपणा माझ्या अनुभवास नेहमीं ठळकपणे येई.

कोणाच्या घरीं सत्यनारायण किंवा देवास नैवेद्य करण्याचे ठरले म्हणजे घरीं ब्राह्मणांकडूनच स्वयंपाक करवून ते लोक हीं कृत्यें यथासांग करीत. त्यावेळीं आई समाधानी वृत्तीने सर्व कामें करी. मी आणि ताई तिला पाणी आणण्यास किंवा वाढण्यास मदत करीत असू. ताई फार सुंदर असल्यामुळें ह्या खेडूतांना ती त्यांच्या घरीं देवीच वावरत आहे, असें वाटे ! लोकांची धार्मिक कृत्ये निरलसपणे यथासांग आम्ही करीत असूं. अशा वेळीं आई वाडींत आली, म्हणजे खेडूतांच्या बायकात मिसळून त्यांची विचारपूस करी. मुलाबाळांच्या किरकोळ आजारावर औषधे देई. ती नेहमीं म्हणत असे, लोकांचें कधीं फुकटचें खाऊं नये. त्याच्यासाठीं काहींना कांहीं कष्ट किंवा त्याग आपण केलाच पाहिजे. एक विशेष गोष्ट येथे सांगावयाची म्हणजे माझ्या आईच्या हातची पुरणपोळी त्या खेडूतांना अमृततुल्य वाटे. आईनें त्या गांवांतील यच्चयावत लोकांना थोड्याच दिवसांत आपलेसें करून घेतलें होतें. तेव्हां मला आठवें वर्ष होतें, म्हणून बापूंनीं माझ्या व्रतबंधाचा निश्चय ठरविला. अण्णांना बरेच

दिवस आगाऊ कळविलें होतें. पण आयत्यावेळीं आजारी असल्याचें त्यांचें पत्र आलें.

वाडीच्या लोकांनीं मात्र उत्साहानें आम्हांस फार मदत केली ! धान्यधुन्य, दूध, तूप, भाजीपाला वगैरेची कमतरता त्यांनीं आम्हांस मुळींच भासू दिली नाहीं. इतर खर्चास बरीच रोकड रक्कम लागणार होती. वाटणीच्या वेळीं आमच्या चरितार्थास दिलेल्या शेतावरच कर्ज काढून बापूंनीं ती रक्कम उभी केली. मुजींचा थाटमाट गावात श्रीमतासारखा गाजला !

पण याही कार्यांत छिद्रान्वेषी लोकांना एक मोठा दोष सापडला, आणि त्यांनीं त्याचा फार मोठा गवगवा केला !

मुंजीच्या दिवशीं वाडीचे खड्डत वाजत गाजत अहेर घेऊन आले होते ! हा झालेला बडेजाव आमच्या शेजाऱ्या पाजाऱ्यांच्या दृष्टींत खुपला ! मुंजीस आलेल्या वाडीच्या लोकांच्या जेवणाची सर्व तयारी आईच्या देखरेखेखालीं गजाईनें केली होती ! कढईत खीर शिजत होती. पुरणाच्या गोड पोळ्या मराठ्यांच्या बायका चढाओढीनें लाटीत होत्या ! भाताचीं व आमटीचीं भांडीं चुलीवर चढलेलीं होतीं.

दुपार उलटून बराच वेळ झाला होता. मुंजीस आलेले वाडीचे लोक जेवणाकरितां तिष्ठत बसले होते. मोठ्या मडपात त्याच्या करितां पत्रावळीही टाकल्या होत्या.

आमच्या घरांतील सोप्यांत व माजघरांत ब्राह्मण मंडळींचीं पाने वाढलीं होतीं. गांवांतील निमंत्रित लोक आले होते. फक्त नाना खरे व इगळे यांना दोन तीन बोलावणीं गेलीं, तरी ते आले नव्हते. शेवटीं बापूच सोवळ्यानें त्यांना बोलावण्यास गेले. तेव्हां ते दोघे आले ! ब्राह्मणांची पगत सुरू झाली. बापू प्रेमानें सर्वांचा समाचार घेऊ लागले.

ताई नवी साडी नेसली होती. ती नवरी सारखी शोभत होती. अत्यत व्यवस्थितपणें ती तूप वाढीत होती. तिची स्तुति सर्वजण करीत होते !

इकडे ब्राह्मण जेवूं लागल्यावर आईचे लक्ष त्या वाडीच्या लोकांकडे गेलें. त्या भुकेल्या लोकांना पाहून आईला कळवळा आला आणि त्यांचेही

वाढप तिनें सुरू केले, ब्राह्मणांची पंगत उठण्याच्या आंत तिकडे आईच्याच सूचनेवरून हरहरमहादेव म्हणत, मंडपांत लोक जेवावयास बसले !

ती गर्जना ऐकल्या बरोबर बापूच्या मनांत चर्र् झालें. घरात जाऊन ते आईला काहीं बोलणार, इतक्यात रामभटजींनीं त्यांना हाक मारली व ते गुरगुरले !

" बापू ! हा काय भ्रष्टाकार ! आमची पंगत उठल्याखेरीज अब्राह्मण जेवावयास बसतात कसे ?"

सर्व लोक भटजींकडे पाहू लागले.

नाना खरे म्हणाले, " ह्या घरात असाच भ्रष्टाकार चालला आहे ! खेडयात जाऊन बायकांत शिवाशीव होते ! म्हणूनच मी भोजनास येत नव्हतो, बापूच बोलवायला आला, म्हणून आलो !"

" नाना ! तुमचा काहीं तरी गैरसमज झालाय !" दासोपंत कुळकर्णी म्हणाले. " आनदी काकू म्हणजे आपल्या गांवच्या भूषण आहेत. त्या साध्वी आहेत ! आपले जेवण सपत आल्यावरच त्यांनीं तिकडे पगत बसविली, ह्यांत धर्मभ्रष्टता कसली ? "

पण कोणाचे काहीं न ऐकता रामभटजी व नाना खरे पंक्तीतून उठून गेले ! कुळकर्ण्यांच्या वजनामुळे बाकीचे लोक शांतपणे जेवले.

आईच्या दयाशीलपणाचे कौतुक तर राहिलेच, पण असा गोंधळ रामभटजी व नाना खरे ह्यांनीं केला !

दुसऱ्या दिवसापासून आमच्या घरावर बहिष्कार घालण्याची भाषा सुरू झाली !

वाडीचे जोशीपण दोन सालचें आमच्याकडे आले होते. पण अण्णांनीं रोख पैसे घेऊन पुढचे साल रामभटजीस द्यावें, कारण त्यांच्याच वाट्याचें तें साल आहे, अशीं पत्रें नानांनीं त्यांना पाठविलीं. अण्णा मात्र बंधुत्वास जागले. त्यांनीं त्यासबंधीं कांहींच हालचाल केली नाहीं !

पण शंकराचार्यांकडून आमचें घर वाळीत टाकण्याची आज्ञा आणावी, असा टाहो रामभटजी फोडीतच होते ! नाना खरे त्याला साथ देत होते !

---

## प्रकरण आठवे

नेहमींप्रमाणें आम्ही सारे गच्चीवर जमल्यानंतर मी एकदमच पुढील हकीगत सागण्यास आरभ केला.

" माझी मुंज थाटांत झाल्यामुळे आमच्या घरांतील सर्वांना फार आनंद वाटला. चागल्या कृत्याला गालबोट लागल्याशिवाय ते कृत्य उठावून दिसत नाहीं, तसेंच नाना खरे वगैरेंच्या विरोधाचें झाले. दासोपंत कुळकर्ण्यांचा अनपेक्षित पाठिंबा आम्हाला मिळाल्यामुळे नाना वगैरेंना उघड कारवाई जोरांत करितां येईना. कारण त्यावेळीं दासोपंत हे एक देवगावात मोठें प्रस्थ होतें.

आमचें घर ब्राह्मण आळींत होते. त्या आळींतील सारीं घरें ब्राह्मण समाजाचीं होतीं. ही सारी वस्ती पेशवाईनंतरच्या सुखवस्तु लोकाची होती. आमचेच घर काय तें तेथे जुन्यापैकीं होतें. आमच्या आळीपासून गावच्या दुसऱ्या टोकाला गावची पाढर होती. तेथे मूळची पाटील कुलकर्ण्यांची वस्ती होती. कुलकर्ण्यांचा भाऊपणा फारसा नव्हता. त्यावेळीं दासोपंत याच्याकडे कुलकर्ण्यांचें काम होते.

दासोपंत हे मराठा आणि उदमी मंडळी यांची मर्जी राखून होते. दासोपंताच्या विचारानें ते लोक वागत असत. नाना खरे हे इकडे ब्राह्मणांत पुढारी असत, तसे तिकडे दासोपत बहुजन समाजाचे मार्गदर्शक असत. आम्हाला दासोपंतांनीं पाठीशीं घातलें, इतकेंच नव्हे तर, पुढें त्यांचे व त्यांच्या वृद्ध मातुश्रींचें आमच्या घरीं येणे जाणें पुष्कळच वाढलें !

मला मुंजीचे केळवण आमच्या आळींतील ब्राह्मण मंडळीनी बेताबेताने केले होतें. त्यावेळीं दासोपताच्या बंधूचे कुटुंब वारून थोडेच दिवस झाले असल्यामुळे त्यांनीं ते केले नव्हते. ज्याच्या येथे मुंज किंवा लग्नकार्य असेल, त्याना केळवण किंवा गडगनेर म्हणून जेवणास बोलावून सन्मान करण्याची तेव्हाची पद्धति असे.

माझी मुंज झाल्यावर एका महिन्याने दासोपतानी आम्हा सर्वांना भोजनास बोलाविले. त्या जेवणाचा थाटही दरबारी होता. आम्हाला चांदीचीं ताटे दिलीं असून पक्तींत उदबत्त्याचा घमघमाट सुटलेला होता.

जेवणात मुख्य पक्वान्न लाडूचें होते. आग्रह करून आम्हाला वाढण्यांत येत होते. माझी व आमची ताई याची स्तुति दासोपंताची आई विशेष करीत होती. आमच्या पक्तीच्या समोरच्या ओळींत रामभटजी जेवत होते. बापूची नजर त्याच्याकडे गेल्याबरोबर त्यानीं खालीं मान घातली ! त्यानतर बापूच्या तोंडून सहज पुढील चरण बाहेर पडले.

पोटासाठीं अवघे सोंग। तेथें कैचा पांडुरंग ॥

तुकाराम महाराजाचे हे अनुभवाचे बोल ऐकतांच रामभटजी बरेच कावरे बावरे झाले.

माझ्या आईला व ताईला खण नारळ मिळाले आणि मला तर चादीची पळी पचपात्री कुलकर्ण्यांच्या मातुश्रींनी बहाल केली !

दासोपतानी अशाप्रकारे केलेल्या विशेष सत्काराचा उद्देश काय असावा, ह्याची अटकळ बापूंना असली, तरी तितकी आईला उमगली नव्हती.

पण थोड्याच दिवसात त्यांचा हेतु उघडकीस आला ! दासोपंतांचे बंधु श्रीधरपत याचे कुटुंब वारून दोन महिने झालेले होते. पताचें वय तिशीच्या सुमारचे होतें. आमची ताई त्याना द्यावी, यासाठीं पतांच्या मातुश्रींनी जोराची खटपट चालविली होती. दासोपंतांच्या अलीकडील आमच्यावरील विशेष लोभाचें मूळ कारण, असें स्वार्थी होते !

त्यावेळीं ताईवएढी मोठी आणि सुंदर मुलगी श्रीधरपंतांसारख्या बिजवराला मिळणे दुरापास्त होतें. कारण त्याकाळीं मुलगी आठ नऊ

वर्षांची झाली कीं, तिच्या लग्नाची धडपड सुरू होई! बारा तेरा वर्षांची लग्नाची मुलगी फार क्वचित् आढळे! अशी मुलगी वाढली कीं, तो एक गावातील लोकांचा टीकेचा विषय होई. आमच्यावर असा टीकेचा गहजब चालूच होता. त्यामुळे ताईचे लग्न लवकर उरकावें, अशी निकड आईने बापूच्या मागे पुष्कळ दिवसांपासून लाविलेली होती.

पण अद्यापि मनाजोगे स्थळ बापूंना आढळले नव्हते. त्याचें कारण आमचें दारिद्र्यही जेथे तेथे बरेच आडवे येत असे!

ताईला कुळकर्ण्यांची मागणी आल्याचे मला कळले, तेव्हा मी आनंदाने उड्या मारू लागलो! कारण कुळकर्ण्यांच्या घरची श्रीमंती मी पाहिलेली होती!

ताईनें ही गोष्ट माझ्यापूर्वी जाणलेली होती. पण मी तिला कुळकर्ण्यांची म्हणून चिडवू लागलो, तेव्हां ती हिरमुसली होऊन म्हणाली,

" गजू! तुला कांहीं कळत नाहीं! असं भलत सलत कांहीं तरी बोलूं नये!"

ताईच्या या उद्गाराचा अर्थ मला कळत नव्हता. पण तिला माझी चेष्टा रुचत नाहीं, हें ओळखून मी माझेंच तोंड बंद केलें.

आमच्या घरात ताईच्या लग्नाच्या असल्याच वाटाघाटी सतत चालू लागल्या. एके दिवशीं रात्रीं मी, ताई आणि माझा धाकटा भाऊ शंभू माजघरात झोपलो होतों,

मला व शंभूला तेव्हाच झोंप लागली, पण मध्यरात्रीच्या सुमारास ताईच्या हालचालीने मी जागा झालों. ताई हुंदके देऊन मुळू मुळू रडत असल्याचे माझ्या नजरेस आले!

पलीकडील सोप्यात समई तेवत होती. तेथें आई व बापू हळू हळू बोलत होते. तिकडे आम्हा दोघांचेही लक्ष गेले.

" बिजवराला द्यायची नाहीं, ताई!" आई बोलत होती. "कुणीकडे माझी नाजूक पोर व कुणीकडे तो जुनवट पंत! कांहीं तरी जोडा शोभला पाहिजे ना!"

" अग खरं !" बापू म्हणाले. " पंताचें वय तिशीचें आहे, पण या वयात त्यांना कुणीतरी मुलगी देईलच कीं ! गावांतल्या गांवांत गजूला आधार होईल, असे नाहीं का तुला वाटत ? खरेंच सांगू ? भलतें सलतें वाटून घेऊ नकोस ! अण्णाने वाटणी करून घेतल्यापासून माझें शरीर खचलंय ! आगात जसा पाहिजे तसा दम राहिला नाहीं माझ्या !"

" असं काय बोलायचं तें ! " आई गहिंवरून म्हणाली. " असलं काहीं वेडवांकडं बोलू नये गडे. प्रपंचात धैर्य सोडून चालतं का ? आपण मला उपदेश करायचा कीं, मी असं आपल्याला सांगायचं ? आपल्याला काहीं होत नाहीं, नी होणार नाहीं. आहेवपणे मीच डोळे मिटायची. "

" पण काहीं का असेना ?" बापू गंभीरपणे बोलू लागले " मी जिथ स्थळ शोधायला जावं तिथ तो रामभट मोडता घालतो. काय दुष्टावा आरंभला आहे त्यान ? "

" हो ! ते तर खरंच ! " आई म्हणाली, " भटजी नानांच्या इथं म्हणत होते खरें, आपली ताई बसू लागली आहे ! मीच चोरून ठेविते ! बहिष्कार घालू या बापूच्या घरावर ! भटजीचं सारं खोटं ! पण सगळ्याना त्याच खरच वाटतं ना ? आतां काहींही करा पण महिन्याभरात ताईला उजवा ! आपली अब्रू तरी जायला नको !"

" मी त्याच विचारात आहे." बापू घोगऱ्या आवाजात म्हणाले. "जिवाघाड या महिन्यात जोडे फाडतो ! जमीनही विकू, पण ताईला मनगटाला मनगट जुळेल, असें खाते पिते घर पाहूं. पण कदाचित् तसे जमले नाहीं तर ? "

" तर त्रिर काहीं नको ! " आई झटकन् बोलली. " प्रयत्नांती परमेश्वर ! आतां लागा हिंडायला. मी गजूला घेऊन वाडीचं जोसपण पाहाते. त्याची नको काळजी !"

" अग ! तें सारं खर !" बापू चिडक्या स्वरात म्हणाले. " पण लोक बडबडतात बायकोला डोम्यावर बसविली म्हणून ! मुंजींत तूंच सारं बघितलंस ना ?

" समजलं तें !" आई करारी स्वरांत बोलली, " लोकांचं का आम्ण ऐकणार ? आपल्या ब्राह्मणांपेक्षांही वाडीच्या खेडुतांचं केवढं मन मोठं

आहे, तरी ! आपण अनुभव घेत आहोतच ! ढोंग नाहीं लबाडी नाहीं. व्यसन नाहीं देवां ब्राह्मणावर केवढी त्याची श्रद्धा ! आपणच कुटीलपणा करून त्यांना भिकेस लावतो, पण अजून त्यांच्या मनांत पाप शिरल नाही. त्याच्यात मिसळण, त्यांची सेवाचाकरी करण, मला आवडत. आपल्याच ब्राह्मणात निरुद्योगी किळसवाणे लोक फार ! बडवड्ड देत त्याना ? खेडूतांच्या जिवावरच आपल आज पोट चाललय ना ? त्याच कामधाम करणं म्हणजे कांहीं त्याच्यावर उपकार करण नव्हे ! आपला धर्मच आहे तो !"

" केवढे तुझे थोर मन हें ! " बाप् बोलले, " जे व्हायचे ते होईल. करू लग्नाची खटपट गजूची आई इतक्या थोर मनाची, सुविचाराची आहे, हाच गुण देवाने गजूतही आणावा, हेच त्याच्या जवळ माझें मागणे ! "

" कांहीं तरी बोलायच झाल " आई हसत बोलली.

इतक्यात शंभू रडत उठला ताई त्याला थोपटू लागली. पण त्याचें रडे थाबेना, त्यामुळे आई व वडील याचे बोलणे थाबले.

ताई जागी आहे, असे पाहून आईला खरी चागली कल्पना आली. तिच्या तोंडावरून तिनें हात फिरविला, तिचे डोळे ओले झाले आहेत, हें लक्षांत आल्याबरोबर तिनें ताईला पोटाशीं धरले. दोघींच्या डोळयातून आसवे वाहू लागलीं. शंभू रडत होताच. मलाही उगीचच्या उगीच रडे कोसळले !

त्यानतर मध्येंच सुलभाची आई म्हणाली, " पोरीच जिण असच कष्टाचं असत ! आतां पुढं सुलभाचा अनुभव यायचाच आहे कीं, आपल्याला ! "

" तिची काळजी कशाला ? " शिवानद बोलला, " खूप खूप शिकेल ती ! आपला पति तीच शोधील कीं ! "

" खूप शिकेल खर आहे तें ! " माझी पत्नी म्हणाली, " पण असल्या घोडनवऱ्या आतां पटेनाशा झाल्या आहेत तरुण मुलांना ! मग कुठल्या तरी बिजवरांच्या गळयांत पडण्याचा त्यांना प्रसग येतो की ! "

" भाऊ चालूं दे तुमची गोष्ट ! " सुलभा म्हणाली, " पुढ काय झाल, तर तें समजू द्या आम्हांला ! उगाच दुसऱ्या गप्पा मध्ये नकोत, शिवा ! "

" सांगा भाऊ पुढें ! " सदानें अनुमोदन दिले. " भाऊ तुम्ही नऊ वर्षांचे होता, तेव्हा तुम्हाला कसल जोशीपणा करता येणार ? "

" सदा, अरे, बापूचा लकडा माझ्या मागे फार ! " मी सांगू लागलो, " बापू शिकवितील ते माझ्या स्मरणात राहात होतें हे खरे आहे. पण सध्या, पुरुषसूक्त, पूजा वगैरे सारे त्यांनीं माझ्याकडून त्या वयांत पाठ करवून घेतले होते. त्यांनीं पुराणोक्त काय काय करायचें, तेही सांगितले होते ! मला पंचांगही पाहायला येत होते ! "

" भाऊ ! म्हणूनच तुमचें धार्मिक अध्ययन जिवंत आहे आतां ! " सदानंद म्हणाला, ' तुमचा पाठ करण्याचा लकडा आमच्या मागे लहानपणीं का होता, हे समजले आतां ! "

पुढे माझी गोष्ट चालू झाली——बापूंनीं दुसऱ्या दिवसापासून मनावर घेतलें आणि स्थळे शोधण्यास ते बाहेर पडले. घोडे घरींच होते. मी घोड्यावरून वाडीला जाऊं लागलो. माझी आंगकाठी बळकट होती. मी जोरानें उडी मारून घोड्याच्या उघड्या पाठीवर बसे, मी . घोडे तार्णी. मला मुळीं भीतिच वाटत नसे. एकदा दोनदा पडलो देखील ! पण पुढें घोड्यावर बसण्याचा मला चांगला सराव झाला.

वाडींतील लोक मला छोटा बामन आला, असे म्हणत असत. खेडूतांकडील दूध मला नेहमी पिण्यास मिळे. मोठ्या लोकांनीं माझा आदरसत्कार केलेला पाहून मला लाजल्यासारखे होई !

पंधरावीस दिवसांनीं बापू घरीं आले. ते अगदीं थकून गेले होते. त्यांनीं एक चांगले स्थळ शोधले होते. नंतर मुलाच्या वडिलांनीं मुलगी पाहून ती पसंतही केली. सगळ्यांना आनंद वाटला.

पण रामभटजींनीं त्या लोकांचे कान फुंकले व ते स्थळ फिसकटविलें. स्थळ हातचें गेले. बापूंना मनस्वी दुःख झालें. त्यांची कंबर खचल्यासारखी झाली.

बापूंना प्रवासाची फार दगदग झाली होती. अंगांत थोडी कसरही येत

होती. निराशा झाल्यामुळें ते चांगलेच आजारी पडले. तें त्याचे दुखणें नवज्वरावर गेलें. सर्वांच्या तोंडचे पाणी पळालें !

आईनें जिवापाड शुश्रूषा चालविली. कुलकर्ण्यांच्या आईची तिला फार मदत झाली. ती बिचारी कोणत्या का हेतूनें होईना, बापूंची सेवा मनापासून करीत होती. रामभट, नाना खरे, मधून मधून उगीच डोकावून जात असत ! दासोपंतांनीं वैद्यकीय मदतीकरिता फार झीज सोसली. नववे दिवशीं बापूंना घाम येऊ लागला. आम्ही सारेजण तो घाम पुसूं लागलो. कुलकर्ण्यांच्या आईला असले आजार माहीत होते. पाहाटेच्या वेळीं ती माझ्या आईला म्हणाली,

"आनंदी ! तुझं कुंकू बळकट ! काळजी गेली ! देवाचं देव सांभाळ करणार !"

आईचे डोळे घळघळ वाहू लागले.

आता ह्यापुढे मी जास्त कांहीं सांगत नाहीं. ताईचा लागाबांधाच कुलकर्ण्यांच्या येथे ठरलेला होता. बापू दुखण्यातून उठल्यानंतर नाइलाजानें आईने त्या लग्नाला संमति दिली ! आणि श्रीधरपंत बापूंचे जावई ठरले.

लग्न थाटांत झाले. रामभटच लग्न लावण्यास उपाध्याय होते! लग्नाकरितां काढलेल्या कर्जाच्या पायीं आमची जमीन सावकाराला विकावी लागली !

पण ह्या संबंधामुळें आमच्या वाईटावर असणारांना थोडा वचक बसला. नाना खरे जरा बेतानें वागू लागले.

* * *

त्या दिवशींची गोष्ट संपली. हुश् करून माझी पत्नी लगेच उठली. मग तिला काय वाटलें कोण जाणे !

———

## प्रकरण नववें

नित्याप्रमाणें रात्रींच्या वेळीं आम्ही गच्चीवर जमल्यानंतर सुलभाची आई म्हणाली,

" वन्सच लग्न सासूबाईच्या मर्जीविरुद्ध झालं, असं दिसलं आम्हांला! मग पुढ काहीं भांडणतंटा तर झाला नाहीं ना ? "

" छे ! छे ! तसे मुळींच झालें नाहीं ! " मी म्हटलें, " माझी आई आणि बापू याच्यात काहीं मतभेद झाला, तर तो तेवढ्या पुरताच! आई नेहमीं म्हणत असे, जें व्हायचं तें कांहीं टळत नाहीं. माणसांनीं आपल्या परी विचार करावा. यत्न करावा. मग जें जे घडून येईल, त्याला शांतपणे पाठ द्यावी. ताईच्या लग्नानतर असेच झालें. सर्व गाडे सुरळीत चालू झालें. जावयाचे कौतुक तिने आपल्या परी पुष्कळ केलें

" भाऊ !" सुलभा म्हणाली. "आत्याबाई सासरीं गेल्यानतर तुम्हाला करमले नसेल, नाहीं ? "

" हो ! तें अगदीं खरं आहे. " मीं म्हटले. " शंभूला ताई बरोबर नेई ! मीही पण तिच्याकडे मधून मधून जात असे. तिकडच्या आळींतील बाबू मोरे, सदू गुरव आणि ज्ञानू मुसळे याची ओळख मला तिकडेच गोट्या खेळतांना झाली !"

" भाऊ ! तुम्ही गोट्या खेळत होता ? " सदानंद म्हणाला,

" हो !" मी कबूल केले. " गोट्याच काय, पण चेंडूलगोऱ्या आणि विटीदांडू हे माझे त्यावेळचे आवडीचे खेळ होते त्यांत माझा हात

धरणारा क्वचितच आटळे. पण या बाबतीत मी बापूंना फार भीत असे. खेळण्यांत माझा वेळ जाणें त्याना फारसे आवडत नसे !"

"भाऊ ! हे तर अगदीं ठरलेलच आहे !" शिवानंद म्हणाला, "तुम्ही देखील आम्हांला लहानपणीं क्रिकेट, फुटबॉल हे खेळ फारसे कुठे खेळू देत होता ? रोज नमस्कार घालण्याचा लकडा मात्र आमच्या मागे तुमचा होता ! वडील माणसाची अशी परंपरागत स्वभावाची मजा आहे ही !"

"शिवा ! जे मला पटलें होते, ते मी तुम्हाला सांगत होतो !" मी निश्चयपूर्वक म्हटले. "आज माझ्या आगांत बळ, उत्साह दिसत आहे, त्याच पुष्कळसे कारण नियमित सूर्यनमस्कार होत. बापूंनी मला लहानपणीं सवय लाविली, ती अद्यापि टिकून आहे. सूर्यनमस्कार जर दररोज शास्त्रशुद्ध घातले, गायत्री मंत्रद्वारां जर आदित्याची उपासना निष्ठापूर्वक चालविली, तर बापू म्हणत असत कीं, "सूर्यनमस्काराच्या शेवटीं जे दोन श्लोक म्हणतात, त्यांतील अर्थाची प्रचीति आल्याशिवाय राहाणार नाहीं. माझी म्हणजे ( बापूंची ) उपासना दृढ नाहीं, म्हणून आजार माझी पाठ सोडीत नाहीं !"

"ते पुढील दोन श्लोक तुम्हांलाही पाठ आहेतच.

आदित्यस्य नमस्कारान् ये कुर्वन्ति दिने दिने ।
जन्मान्तरसहस्रेषु दारिद्र्यं नोपजायते ॥ १ ॥
अकालमृत्युहरणं सर्वव्याधिविनाशनम् ।
सूर्यपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम् ॥ २ ॥

पहिल्या श्लोकांतील भावार्थ सूर्यनमस्कार दारिद्र्य उत्पन्न होऊं देणार नाहीं, असा आहे, आणि दुसरा श्लोक मृत्यु अकालीं येणार नाहीं. व सर्व रोग नाहींसे होतील, असा सूर्याच्या तीर्थाचा महिमा वर्णन करीत आहे.

माझा अनुभवच काय सांगतो पाहा. माझे दारिद्र्य गेलें, हें तुम्ही जाणतांच आणि आजपर्यंत मी कधींच आजारी पडलों नाहीं, हे तुम्हाला

टाऊक आहे. अगदीं काटेकोरपणे ह्या गोष्टीकडे पाहावयाचे नसते. पण सतत पवित्रपणे केलेल्या उपासनेचे व व्यायामाचे फळ काहीं तरी चांगलें पदरात पडतेच एवढ्या अर्थाने तरी तुमच्या आजोबाचे म्हणणे खरे आहे, हें तुम्ही मानाल कीं नाहीं ?

" भाऊ ! आम्ही काहीं तसे म्हणत नाहीं. " सदानद म्हणाला. " पण आळसाने किंवा मोहाने आमचा निश्चय सतत पार पडत नाहीं. इतकेंच ! "

" बरोबर आहे ! " मी म्हटले " माणसाला मोह पडला, तर तो त्याला टाळता आला पाहिजे. मोहाचा परिणाम त्रासांतही होतो, हे आईने मला एकदा चागले लक्षात आणून दिले ती एक माझ्या लहानपणची शाळेत घडलेली गोष्ट तुम्हाला सांगू का ? "

" हो ! हो ! सागाच कीं भाऊ ! " सुलभा जोराने म्हणाली. " तुमच्या त्यावेळच्या शिक्षणाची यथायोग्य माहिती तरी आम्हाला समजेल. "

मी सागू लागलो, " आमच्या घरातल्या शिक्षणाचा मुख्य भर पाठ करून घेण्याकडे असे. बापूनीं माझ्याकडून रूपावली, समासचक्र तयार करून घेतले. नतर अमरकोशास सुरवात केली. रामदास, वामन पडित, मोरोपत यांच्या किवीतरी कविता त्यानीं माझ्याकडून पाठ करून घेतल्या होत्या. तोंडी हिशेब, रेघी उजळणी, बिघा, एकर, गुठा वगैरे माहिती त्यांनींच मला करून दिली होती

हे झाले माझे घरातलें शिक्षण ! शाळेत देखील हींच तऱ्हा असे. इतिहास, भूगोल पाट करून घेत असत. माझे अक्षर वळणदार होतेच. मोडी, बालबोध लेखन व हिशेब उत्तम असले कीं, त्या मुलाची कोणीही वाखाणणी करीत असत.

इतक्यात सुलभा म्हणाली,

" भाऊ ! गोष्ट सांगावयाची राहिलीच कीं ! "

हो ! मी आता जी गोष्ट सांगत आहे, ती मी चवथ्या इयत्तेत असताना घडलेली आहे. त्या वर्गात मी दहावे वर्षीं गेलो. बाळू खरे, विष्णु इंगळे, लोंढे, वगैरे मुले दोन तीन वर्षे त्याच इयत्तेंत रखडत होतीं ! मोरे,

गुरव, मुसळे हेही त्याच इयत्तेंत होते. माझे सर्वच विषय चागले तयार असत. अंकगणित तर माझा हातखंडा विषय होता. इतरांचा तो विषय कच्चा असे. मी पुष्कळांना उदाहरणें समजाऊन देत असे. त्यामुळें माझे त्या इयत्तेंत बरेच चहाते विद्यार्थी होते.

त्या वेळचे आमच्या वर्गावरील गुरुजी फार कडक होते. त्यानीं उदाहरण सागावें, मुलानीं तें पाटीवर सोडवावे. ज्याचे चुकेल त्याना छडयाचा प्रसाद द्यावा, असा त्याचा खाक्या असे. त्यामुळें दररोज कोणाला एक, कोणाला दोन, कोणाला तर तीन किंवा चार छडयाहि हातावर मिळत असत! छडयाच्या मारानें एकादा दुसरा मुलगा रडला नाही, असा एकही दिवस जात नसे! तसल्या विद्यार्थ्यांचे पालकही गुरुजीविरुद्ध तक्रार करीत नसत! ‘छडी लागे छमछम! विद्या येई घमघम’ असले रानटी सूत्र तेव्हाच्या लोकाच्या तोंडी असे. पण मला मात्र असा केव्हाही छडीचा प्रसाद मिळाला नव्हता.

मला शिक्षा होत नव्हती, याचें काहींना वैषम्य वाटत असे. एक दिवस त्यानीं माझ्यावर एक मोहनास्त्र फेकलें. मी त्या जाळ्यात सापडलो!

त्या दिवशीं उदाहरण सागून गुरुजी कांहीं कामाकरितां मुख्य गुरुजींकडे गेले होते. मी उदाहरण सोडवून खालीं पाटी टाकली व इकडे तिकडे पाहात बसलों.

इतक्यात बाळू खरे याने आपल्या खिशातले दोन पेरू मला हळूच दाखविले. ते पिवळेजर्द पेरू पाहून माझ्या तोंडास पाणी सुटलें. कांहीतरी निमित्त काढून आम्ही दोघे बाहेर पडलो.

बाळूनें दिलेला पेरू मी मिटक्या मारीत मारीत खाल्ला. तो त्याच्या मळ्यातला पेरू खरोखरच उत्कृष्ट जातीचा होता. दुसऱ्याही पेरूतला अर्धा भाग त्यानें मला आग्रहानें दिला. मी बाळूवर खूष झालो. मित्र असावा तर असाच, असेंही मी मनांत म्हटलें देखील!

मला माणसाची पारख नव्हती. एकाद्याच्या अकारण प्रेमाच्या मागें काहीं तरी कुटिल डाव असतो, असली कल्पना माझ्या मनांत त्यावेळीं आली नव्हती!

आम्ही वर्गांत येऊन बसलो, इतक्यात गुरुजी आले. मी पहिल्याच क्रमांकाचा असल्यामुळे मी झटकन् पालथी ठेविलेली पाटी तशीच गुरुजींपुढें धरली ! आणि काय सांगावे ! त्यांनीं माझ्याकडे वाघासारखे डोळे वटारून पाहिले ! माझी पाटी हिसकून घेऊन ती त्यानीं मेजावर ठेवून दिली ! आणि मला बाकावर उभे राहाण्याची शिक्षा फर्मांविली !

नंतर सर्वांच्या पाट्या त्यानीं पाहिल्या आणि उदाहरणाचे उत्तर सांगितले पुष्कळांचे उत्तर चुकले होते. इतक्यात मी जोराने म्हटलें, " माझेहीं उत्तर तेच आहे, मग मला शिक्षा कशाकरिता ? "

" गजा ! " गुरुजी कठोर आवाजात बोलले, " आजपर्यंत मी तुला प्रामाणिक समजत होतो, पण तू आमचीही चेष्टा करू लागलास ? तूं उदाहरण पाटीवर सोडविलेंस का ? खरे सांग पाहू ? "

" मी नक्की उदाहरण सोडविल आहे. " मी डोळे चोळीत चोळीत म्हटले. " सत्यं वद धर्मं चर असं वडिलानीं मला शिकविले आहे. मी खोटं मुळींच बोलत नाहीं ! "

" पण आज तु खोटें बोलतोस ?" गुरुजी बोलेले. " पाहा बरे ही तुझी पाटी ! ती अगदीं कोरी आहे. आणि तूं उदाहरण सोडविले म्हणतोस ? "

मी ती पाटी पाहिली. खरोखरच ती कोरी होती ! मी सोडविलेलें उदाहरण कोणीतरी पुसून टाकलें असावे, असे मला वाटले. माझ्या वाकूडपणा करणारा बाळू तर माझ्याबरोबर बाहेर होता. मग माझी पाटी कोणी पुसली असावी, ते मला सांगता येईना. मी गप्प उभा आहे, असें पाहून गुरुजी गरजले——

" गजा, तुला हुशारीचा कैफ आला, म्हणून तू कोरी पाटी दाखवून खट्याळपणा केलास ! आतांपर्यंत मी तुला सच्चा समजत होतो, पण अशी लबाडीची हुकी तुला कशी बरे आली ? "

गुरुजींचे कडक शब्द ऐकून माझ्या डोळ्यात अश्रु उभे राहिले. खरे, इंगळे, लोढे हीं मुले खालीं मान घालून फिदीफिदी हसूं लागली ! माझे

मराठा मित्र माझ्याकडे सहानुभूतीने पाहू लागले. गुरुजी माझ्या उत्तराची अपेक्षा करीत होते. मी लवकर बोलेना, तेव्हा गुरुजींनीं छडी उचलून मला हात पुढें करण्यास सांगितलें. त्यावेळीं मी हुदके देत म्हणालों,

" माझी पाटी कुणीतरी पुसली ! मी लबाड नाहीं ! मी छडीला भीत नाहीं ! पण मी चूक मुळींच केलेली नाहीं ! "

इतक्या धीटपणानें बोलणारा मुलगा गुरुजींना त्यापूर्वी आढळला नव्हता. त्यामुळें ते मलाच दरडावून म्हणाले--

" गजा ! तोंड आवर ! तुझी पाटी कोणी पुसली सांग मला ! त्यालाही बडवून काढतो. मला लबाडी खपायची नाहीं. "

मला कोणाचेंच नांव सांगता येईना मीच पेरूच्या मोहानें गुरुजींना न विचारतां वर्गाच्या बाहेर गेलों होतों. गुरुजींनीं सान्या मुलांना विचारलें, पण त्यांना पाटी पुसणारा मुलगा सांपडला नाहीं. मीच लबाड ठरलों.

शेवटीं गुरुजींच्या दोन जोराच्या छड्या मला मिळाल्या ! माझ्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. मला छड्या मिळाल्याचें दुःख झालें नव्हतें. लबाडीच्या आरोपामुळे मी मनस्वी दुःखी झालों होतों.

इतरांनाही उदाहरण चुकल्याबद्दल छड्या बसल्याच होत्या. शेवटीं " फळ्यावर कोण उदाहरण समजाऊन देतो, " असें गुरुजींनीं वर्गाला विचारल्याबरोबर मीच पुढें झालों. मी तें उदाहरण छानदार रीतीनें सोडवून दाखविलें. सान्या वर्गाचीही समजूत झाली. गुरुजींचा चेहरा मला ओशाळलासा दिसला ! त्यांनीं मला ' शाबास ' म्हटलें. पण माझ्यावरील लबाडीचा आरोप परत घेतला नाहीं !

घंटा झाली. शाळा सुटली. माझें अंतःकरण व्यथित झालें होतें. शाळेच्या बाहेर पडल्यानंतर खरे मजजवळ येऊन म्हणाला,

" गजा, फार ऐट मिरवतोस ना ? आज तरी तुला छड्या बसल्या ना ? "

इतक्यांत इंगळे बोलला-- " बाळू ! तुझे पेरु गजाला गोड लागले, तेव्हां त्याला बरें वाटलें ! मग छड्या खाल्ल्यावर मित्री भागूबाई रडली कीं ! अस्मादिक कधीं रडतात का ? चार चार छड्या मिळतात आम्हांला ! "

मी खालीं मान घालून चाललों होतो. घरीं जाण्याची वाट तळ्याच्या पाळीवरून होती. त्यावेळीं पाऊस पडून पाळीवर निसरडें झालें होते. माझे कपडे असे तसेच होते. मी धावत जाऊन आपलें घर गाठलें.

पण खरे व इंगळे तळयाच्या पाळीवरून जात असता पायात पाय घालून कोणीं तरी त्याना पाडलें. त्याचे कपडे चिखलाने भरले. अंगही खराब झाले ! माझ्या मराठा मित्राचे नाव घेण्याची त्यांची छाती नव्हती. तसे त्यानीं केले असते तर, त्याना आणखी गुद्देच मिळाले असते. "गजाने आम्हाला पाडले." असेंच ओरडत ओरडत ते घरीं गेले. त्याच्या तक्रारी माझ्या घरी येऊन पोहोचल्या.

पण त्यापूर्वीं मी वडील मातुश्रींना शाळेतील घडलेली हकीकत सागितली होती. त्याचा विश्वास माझ्यावर होता. त्यामुळें कागाळया करणाराची डाळ माझ्या घरीं शिजली नाहीं. त्याना अपमानास्पदरीतीनें आपल्या घरीं परतावें लागले. माझ्या मनात मात्र गुरुजींच्या शिक्षेचें शल्य राहून गेले. माझ्या जिवाची एकसारखी तळमळ चालू होती.

मी तसाच रात्रीं झोपीं गेलों. पण मला गाढ झोप लागली नव्हती. मी झोपेत बरळूं लागलो "मी खोटे बोलत नाहीं. कधींही बोलणार नाहीं. मला उगीचच्या उगीच शिक्षा नको !"

आईने माझें बरळणें स्पष्टपणे ऐकले व मला जागें केले. माझें डोकें आपल्या माडीवर घेत ती म्हणाली,

"गजू ! तुझ्या मनाला स्वस्थपणा नाहीं. शाळेंत झालेलं सारं तुझ्या डोक्यात घुमतंय ! झोपेत तेच बरळतोयस. तुला शिक्षा झालीं, ती कां झाली, याचा विचार कर ना थोडा ? पेरूच्या लोभानं तूं वर्गांतून उठून गेलास ना ? त्यामुळच पुढचा सारा प्रकार घडला. आपल्या जिभेवर तुझा ताबा नव्हता, हे खर ना ? मग यात दोष कोणाचा ?"

"होय आई !" मी म्हटले. "दोष माझाच. खरें आहे तें. पण इंगळ्याने माझी पाटी का पुसावी ? तुझी चागली जिरली, असे त्यांनीं कां म्हणावें ? मी काहीं त्यांची कुरापत काढली नव्हती, मग मला असा त्रास का व्हावा ?"

" गजू ! जगाची रीतच ही बाळ ! " आई माझ्या तोंडावरून हात फिरवीत बोलली " पुष्कळांना बरच पाहावत नाहीं ! तू हुषार आहेस तुला शिक्षा होत नाहीं, हें त्यांना पाहावेना ! जगांत असल्या वाईट वृत्तीचे लोक असतात. साधु त्यांना तामस वृत्तीचे म्हणतात. असल्या माणसातून आपल्याला मार्ग काढावा लागतो, याची थोडीशी चुणक तुला समजली. पण आणखी अस पाहा, तुला वाईट मुले दिसलीं, तशीं तुझी बाजू खरी आहे अशीं म्हणणारी चांगलीं मुलें पण दिसली कीं ! त्यांनीं खोडकर मुलांना हात दाखविला ! गजू, जगांतील सर्व प्रकारचे लोक ओळखतां आले पाहिजेत. एखाद्या वेळीं घरांत विंचू निघतात, म्हणून घराला का दोष द्यावयाचा ! सावधानता ठेवून वागावे, करारीपणा असावा, सत्याचरण सोडू नये म्हणजे झाले. आणि एक गोष्ट लक्षात ठेवावी कीं, झाली गेली गोष्ट विसरून जाण्याचा स्वभाव बनवावा. म्हणजे तुझ्या मनाला यातना होणार नाहींत. "

आईचा हा उपदेश आतां देखील माझ्या कानात घुमत आहे. मला थोपटीत ती म्हणूं लागली—

दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा

हा मुलातील वाद तेवढ्यातच थांबला नाहीं. मोठ्यातही तो पसरला. नाना खरे शाळेचे पंच होते. त्यांनीं शाळेत जाऊन गुरुजीस दमदाटीही देण्यास कमी केले नाहीं.

———

## प्रकरण दहावे

माझी शाळेतील गोष्ट सुलभाला फार आवडली. दहावे दिवशीं आम्ही सारे जमल्यावर ती उल्हासाने म्हणाली,

" भाऊ कालची तुमची गोष्ट छान होती. आणखी कांहीं शाळेंतील आठवणी सागतां का ? फार गमत असते, असल्या गोष्टींत !"

तिचे ते बोल ऐकून सारेजण हसूं लागले. माझी पत्नी म्हणाली,

" सुलभा ! आता शाळेत मारीत बिरीत नाहींत बाई ! तुला त्याना मार बसल्याच आणखी ऐकायच आहे, वाटत ? "

" हें ग काय आई ! " सुलभा लाडिकवाण्या आवाजांत बोलली. " अग ! शिक्षेबद्दल मी का विचारतें आहे ? मुलाच्या स्वभावांची गमत दिसते त्या गोष्टींत तेव्हांची काय, नि आतांची काय मुले तीं सारखींच कीं ! "

" सुलभा ! " मी म्हटलें, " मी सांगतो, शाळेतील आणखी थोडी गंमत. पण आमच्या जुन्या शिक्षणाला हसू नकोस तू ? "

" सागा भाऊ ! " सुलभाने घाई चालविली.

मी म्हटले, " आमच्या वेळच्या शाळेच्या परीक्षेची गोष्ट सांगतों मी तुम्हांला. तेव्हा वर्षांतून एकदां परीक्षक अधिकारी शाळेची परीक्षा घ्यावयास यायचे. त्यावेळीं मुलांची व गुरुजींची फार धादल उडून जायची ! आमच्या शाळेची परीक्षा दोन चार तासांत आटोपत असे. पण

त्याकरितां गुरुजींचा कोण आटापिटा चालत असे ! मुलांनीं नवे पोषाख घालावे, स्नान करून यावें. कपाळास गंध लावावें. पाट्या घासून आणाव्यात. लेखण्या तयार ठेवाव्या इत्यादि हुकमाची गर्दी होऊन जाई !

मुलांचे क्रमांक गुरुजी मोठ्या युक्तीनें बदलून ठेवीत ! माझीच गोष्ट घ्या. चौथ्या इयत्तेत माझा क्रमांक नेहमीं पहिला असे. पण परिक्षेच्यावेळीं बाळूचा क्रमांक पहिला, ज्ञानूचा दुसरा व माझा तिसरा असे क्रमांक बदलले ! पहिल्या क्रमांकाचा विद्यार्थी सहसा नापास करीत नसत. त्याकरिता ही युक्ति होती ! बाळू, ज्ञानू हीं जुनीं मुले तरी एकदाचीं पास होऊन वरच्या इयत्तेंत जावीं, असा गुरुजींच्या मनांतला हेतु असावा !

मी कांहीं आता परिक्षेच्या हकीकतीची लांबड लावीत बसत नाहीं. परिक्षेच्या दिवशीं गणित विषय घाईघाईने आवरला. नंतर भाषा विषयास सुरवात झाली. भाषेत व्याकरण आलेंच. गुरुजींनीं व्याकरणाकडे लक्ष दिलें नव्हतें, असे म्हणण्यापेक्षा आम्हालाच त्यातले कांहीं कळत नसे, हेंच खरें !

प्रयोगाची माहिती मला तरी फारशी नव्हती. मग बाकीच्या मुलांना कितीशी असेल, याची तुम्हीच कल्पना करा.

परीक्षकानीं बाळूला विचारलें.

" बाळूने पुस्तक वाचलें " या वाक्याचा प्रयोग कोणता ?

बाळू विचारात पडला. तो गुरुजींच्या तोंडाकडे पाहू लागला.

अधिकारी म्हणाले--सांग लवकर ? हा प्रयोग तर सोपा आहे. गुरुजींनीं हसत हसत मान डोलावली. उत्तर नकारार्थी असावें, असें वाटून बाळूनें उत्तर दिलें. ' अकर्मक कर्तरि प्रयोग ! '

परीक्षक हसले. गुरुजी हिरमुसले.

दुसऱ्या क्रमांकास तोच प्रश्न विचारण्यांत आला. पहिले उत्तर चुकलें असावें, हें ज्ञानूने जाणलें आणि त्यानें उत्तर दिलें. ' बाळूनें पुस्तक वाचलें ' हा सकर्मक कर्तरि प्रयोग होय !

आतां मलाही तोच प्रश्न विचारण्यांत आला. आमच्या कानांवर तीन

प्रयोग होते. त्यांतले दोन पहिल्या दोन विद्यार्थ्यांनीं सांगितले होते. आतां राहिला एकच प्रयोग तो म्हणजे कर्मणि प्रयोग होय.

मी झटकन शांतपणें उत्तर दिलें कीं, बाळूने पुस्तक वाचले, या वाक्याचा कर्मणि प्रयोग होय.

परीक्षक खूष झाले मलाही आनंद वाटला.

काय झाले असेल ते असो, तोंडी हिशोबाच्या परिक्षेच्या वेळीं गुरुजींनीं काहीं खुणा केल्याचा संशय अधिकाऱ्यांना आला होता ! त्यामुळे त्यांचा रोष आमच्या गुरुजींवर झाला होता. मुलांची तयारीही फार कच्ची होती. ' चक्कू ताउऱ्या घोड्या ' या पद्धतीचा अभ्यास तोंडी परिक्षेच्या वेळीं उपयोगीं पडला नाहीं. त्यामुळे आमच्या वर्गातील पंधरा मुलांपैकीं फक्त मी एकटाच पास झालो ! बाकीचे सगळे नापास झाले !

माझी वाहवा गावांत फार झाली. इंग्रजी शिकण्यास मला पाठविण्याचें बापूंचे बेत चालले. बेळगावच्या चुलत्यांनीं बापूंच्या पत्रास उत्तर लिहिलें कीं, दुष्काळास सुरवात झाली आहे. गजूस मजकडे इंग्रजी शिकावयास पाठवूं नये.

खरोखर सन १८९८ सालापासून पडलेल्या दुष्काळाने त्या वेळीं डोळे वटारले होते. आमची जोशीपणाची दोन वर्षे संपलीं होतीं. आमच्या भाऊबंदाशीं संधान बांधून रामभटजींनीं पुढच्या दोन वर्षांचें वाडींचें जोशीपण मिळविले होतें. त्यामुळें बापू आता बेकार झाले होते !

घरीं धान्य बेताबाताचे होते. कर्जबाजारीपणामुळे कोणाकडूनही पैशाची गरज होण्याची शक्यता दिसत नव्हती. तेव्हा इंग्रजी शिक्षणासाठीं मला परठिकाणीं पाठविण्याची कल्पनाच नष्ट झाली !

आता आमच्याच शाळेतील पांचव्या इयत्तेंत माझें नाव दाखल झालें. त्या इयत्तेंत बरींच जुनीं मुले होतीं. आणि परगांवचीही पाच सहा मुलें आलीं होतीं. त्या सर्व मुलांत मी छोटा मुलगा असल्यामुळें माझे लहान वय हाच त्या वर्गात टीकेचा विषय झाला ! मी कसा तरी वशिल्यानें पास झालो, असे खरे वगैरेंनीं उठविल्यामुळे मला त्या वर्गांत कोणीच जवळ करीनात ! शिवाय मोठया गुरुजींच्याकडे तो वर्ग होता. ते तर

नुकतेच बदलून आले होते. अर्थात् त्यांना गावच्या परिस्थितीची कल्पना नव्हती. माझी माहिती तर त्यांना नव्हतीच नव्हती !

महिना दोन महिने खर्डे लिहिणें व उदाहरणें करणें त्यांतच गेले ! नंतर कोठे खऱ्या अभ्यासास सुरवात झाली !

खरा अभ्यास म्हणजे तरी काय ? पुस्तकातील कविता, इतिहास, भूगोल पाठ करून येणे व तो गुरुजींनीं किंवा वर्गातील एकाद्या मुलानें म्हणवून घेणें हाच होय. तीन इयत्ता गुरुजींना शिकवाव्या लागत. त्यांना जेमतेम एकेका वर्गाचा फारतर सकाळ दुपार एकेक तास अभ्यास घेतां येई. बाकी राज्य मुलांचेच !

त्या वेळीं आमच्या घरची स्थिती फार चमत्कारिक झाली होती ! खर्चाची तोंडे 'आ' वासून उभी होती ! वडील मातुश्रींचा जीव अगदीं मत्यास आला होता. त्यांना पैशाचे दर्शनही दुर्मीळ होऊ लागले होते

साधीच गोष्ट पाहा. मी पांचव्या इयत्तेत गेलों, परंतु मला अभ्यासास लागणारीं पुस्तके त्यांना घेऊन देतां येईनात. मी पुस्तकाकरिता हट्ट धरावा. त्यांनीं मुदती सांगाव्या. माझ्या वर्गबंधूनीं सारीं पुस्तके संपादन केलीं होतीं. पण मला बालबोध वाचनपुस्तकही मिळणे अशक्य झालें. मी अगदीं रडकुंडीस येऊन गेलो.

माझा पोशाक म्हणजे एक खादीची बंडी, कानटोपी व लंगोटी एवढाच होता. आई तो स्वच्छ ठेवण्याचा प्रयत्न करी. पण खेळामध्ये तो वाण झाल्याशिवाय थोडाच राहाणार ? माझा असला वेष पाहून मला श्रीमंतांचीं मुले भिकारडा म्हणत ! पण मला त्याचें कांहीं वाटत नसे. अभ्यासांत तरी त्यांच्या वरचढ आपण सतत राहू, अशी माझी महत्त्वाकांक्षा होती.

माझी स्मरणशक्ति चांगली असल्यामुळें गुरुजी सांगत, ते माझ्या लक्षात राहात असे. गुरुजी मला शाबासकी देत. पण त्याचें वैषम्य इतरांना वाटे. मला वाचन पुस्तकही कोणी देत नसे !

एके दिवशीं वाचन पुस्तकांतील धेनुहरणाच्या धड्यातील पहिली कविता पाठ करून येण्यास गुरुजींनीं मुलांना सांगितलें. शुद्ध उच्चार करण्याकडे त्यांचा कटाक्ष होता. मी शेवटच्या क्रमांकास बसलों होतों. मला

ती मोरोपंताची आर्या पाठ येत नव्हती. चुकत माकत ओळीनें वर्गातील विद्यार्थी ती कविता पाठ म्हणूं लागले. मला आठवते कीं ती आर्या अशी होती—

**पार्थ म्हणे तो कोण ब्रह्मर्षि असे मनोरमहिस्यातें ।**
**तद्यश नसे परिसिलें सांग सख्या तूं तदीय महिम्यातें ॥**

चार पाच मुलानीं ही आर्या म्हटल्याबरोबर माझी ती कविता छान पाठ झाली. माझी पाळी आल्याबरोबर मी ती खणखणीतपणे म्हणून दाखविली.

जुन्या मुलाना माझा हेवा वाटला. दुसऱ्या दिवशीं पुढची आर्या पाठ म्हणावयाची होती. मुलानीं युक्ति केली. त्यानीं मला पहिल्या क्रमांकास मानानें बसविलें. माझ्या लक्षात त्याचा कावा आला नाहीं! थोड्या वेळानें मला दुसरी आर्या म्हणण्यास गुरुजींनीं सागितले. मी कावरा बावरा होऊन उभा राहिलो. मला कविता येईना. मला झणझणीत छडी बसली! मी मुळू मुळू रडूं लागलो.

इतरानीं ती आर्या म्हटली. शेवटीं गुरुजींना मी म्हटले, "गुरुजी मी म्हणून दाखऊ का?"

"म्हण पाहूं?" गुरुजी बोलले.

मी ती आर्या छान म्हणून दाखविली. गुरुजींचें समाधान झालें. मुलें मात्र कुजबुजू लागलीं 'गजा लुच्चा आहे.'

गुरुजींच्या लक्षात माझी खरी स्थिति आली. माझ्या स्मरणशक्तीची त्यानीं तारीफ केली, आणि सरकारी सारीं पुस्तके शाळेत वापरीत जा, असें त्यानीं मला सागितलें!

असा हा छडीचा मार मला दुसऱ्यावेळीं बसला! त्यानंतर मात्र मला शाळेंत छडीची शिक्षा मिळाली नाहीं.

"भाऊ! हा मार तुम्हाला नव्हता!" सदानंद म्हणाला "हा दारिद्र्याला होता. असंच नाहीं का? आम्ही किती भाग्याचे आहोत

नुकतेच बदलून आले होते. अर्थात् त्यांना गावच्या परिस्थितीची कल्पना नव्हती. माझी माहिती तर त्यांना नव्हतीच नव्हती !

महिना दोन महिने खर्डे लिहिणें व उदाहरणें करणें त्यांतच गेले ! नंतर कोठे खऱ्या अभ्यासास सुरवात झाली !

खरा अभ्यास म्हणजे तरी काय ? पुस्तकातील कविता, इतिहास, भूगोल पाठ करून येणे व तो गुरुजींनी किंवा वर्गातील एकाद्या मुलाने म्हणवून घेणें हाच होय. तीन इयत्ता गुरुजींना शिकवाव्या लागत. त्यांना जेमतेम एकेका वर्गाचा फारतर सकाळ दुपार एकेक तास अभ्यास घेतां येई. बाकी राज्य मुलांचेच !

त्या वेळीं आमच्या घरची स्थिती फार चमत्कारिक झाली होती ! खर्चाची तोंडे ' आ ' वासून उभी होती ! वडील मातुश्रींचा जीव अगदी मत्स्यास आला होता. त्यांना पैशाचे दर्शनही दुर्मीळ होऊ लागलें होते

साधीच गोष्ट पाहा. मी पांचव्या इयत्तेत गेलों, परतु मला अभ्यासास लागणारी पुस्तके त्याना घेऊन देता येईनात. मी पुस्तकाकरिता हट्ट धरावा. त्यांनीं मुदती सांगाव्या माझ्या वर्गबधूंनी सारीं पुस्तके सपादन केलीं होतीं. पण मला बालबोध वाचनपुस्तकही मिळणे अशक्य झालें, मी अगदीं रडकुंडीस येऊन गेलो.

माझा पोशाक म्हणजे एक खादीची बंडी, कानटोपी व लंगोटी एवढाच होता. आई तो स्वच्छ ठेवण्याचा प्रयत्न करी. पण खेळामध्यें तो घाण झाल्याशिवाय थोडाच राहाणार ? माझा असला वेष पाहून मला श्रीमंतांची मुले भिकारडा म्हणत ! पण मला त्याचें काहीं वाटत नसे. अभ्यासात तरी त्याच्या वरचढ आपण सतत राहू, अशी माझी महत्त्वाकांक्षा होती.

माझी स्मरणशक्ति चांगली असल्यामुळें गुरुजी सांगत, ते माझ्या लक्षात राहात असे. गुरुजी मला शाबासकी देत. पण त्याचें वैषम्य इतरांना वाटे. मला वाचन पुस्तकही कोणी देत नसे !

एके दिवशीं वाचन पुस्तकांतील धेनुहरणाच्या धड्यातील पहिली कविता पाठ करून येण्यास गुरुजींनीं मुलांना सांगितलें. शुद्ध उच्चार करण्याकडे त्यांचा कटाक्ष होता. मी शेवटच्या क्रमांकास बसलों होतों. मला

ती मोरोपंताची आर्या पाठ येत नव्हती. चुकत माकत ओळीनें वर्गांतील विद्यार्थी ती कविता पाठ म्हणूं लागले. मला आठवते कीं ती आर्या अशी होती—

**पार्थ म्हणे तो कोण ब्रह्मर्षि असे मनोरमहिस्यातें ।**
**तद्यश नसे परिसिलें सांग सख्या तूं तदीय महिम्यातें ॥**

चार पाच मुलांनीं ही आर्या म्हटल्याबरोबर माझी ती कविता छान पाठ झाली. माझी पाळी आल्याबरोबर मी ती खणखणीतपणे म्हणून दाखविली.

जुन्या मुलाना माझा हेवा वाटला. दुसऱ्या दिवशीं पुढची आर्या पाठ म्हणावयाची होती. मुलांनीं युक्ति केली. त्यांनीं मला पहिल्या क्रमांकास मानानें बसविलें. माझ्या लक्षात त्याचा कावा आला नाहीं! थोडया वेळानें मला दुसरी आर्या म्हणण्यास गुरुजींनीं सांगितले. मी कावरा बावरा होऊन उभा राहिलो. मला कविता येईना. मला झणझणीत छडी बसली! मी मुळू मुळू रडू लागलो.

इतरांनीं ती आर्या म्हटलीं. शेवटीं गुरुजींना मी म्हटले, " गुरुजी मी म्हणून दाखऊ का ? "

" म्हण पाहूं ? " गुरुजी बोलले.

मी ती आर्या छान म्हणून दाखविली. गुरुजींचे समाधान झालें. मुलें मात्र कुजबुजूं लागलीं ' गजा लुच्चा आहे. '

गुरुजींच्या लक्षात माझी खरी स्थिति आली. माझ्या स्मरणशक्तीची त्यांनीं तारीफ केली, आणि सरकारी सारीं पुस्तके शाळेत वापरीत जा, असें त्यांनीं मला सांगितलें !

असा हा छडीचा मार मला दुसऱ्यावेळीं बसला ! त्यानंतर मात्र मला शाळेंत छडीची शिक्षा मिळाली नाहीं.

" भाऊ ! हा मार तुम्हाला नव्हता ! " सदानंद म्हणाला " हा दारिद्र्याला होता. असंच नाहीं का ? आम्ही किती भाग्याचे आहोंत

बरें ? दारिद्र्याचे वारेही आम्हाला ठाऊक नाहीं. ” “ आधी कष्ट मग फळ ” अस कुठस म्हटल आहे कीं ! ”

सुलभाची आई घोगऱ्या आवाजांत म्हणाली “ इकडची तपश्चर्याच मोठी. तिचंच फळ आपण भोगतोय. ”

“ तपश्चर्या वगैरे कांहीं नाहीं ” मी म्हटलें. “ असले त्रासाचे कितीतरी प्रसग मला पुढ सांगावयाचे आहेत घट्ट मन करुन ते ऐका. नाहींतर, माझ सांगण येथेच पुरे केलेले बरें ! ”

“ तसं नको भाऊ ! ” सुलभा काकुळतीस येऊन बोलली. “ सागा सारं, जग कस होत व आहे हें तरी आम्हाला कळू द्या ना ? आई, तू आपली भाऊच्या गोष्टी ऐकताना वाईट वाटून घेऊ नकोस बर ? ”

सुलभाने आईजवळ जाऊन तिच्या गळ्यास मिठी मारली. त्यावेळीं मीं म्हटले,

“ थोडें ऐका ! त्या दिवशीं शाळेतून मी घरीं आलो, तेव्हां माझ्या आईला मी ही इत्थभूत हकीकत सांगितली. तेव्हां तिने मला प्रेमाने कुरवाळले. आणि माझ्या मस्तकावर आसवांतील मोत्यांचा अभिषेक केला, व तिने म्हटले——

सदा सर्वदा देव संनिध आहे ।
कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥
सुखानंद आनंद कैवल्यदानी
नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥

“ गजू ! दैवाचे असले किरकोळ तडाखे सहन केले पाहिजेत, दुःखाच्या मागून सुख हें यायचेच असें ते म्हणतात. त्यांत खरेपणा आहे. देवावर निष्ठा ठेव. ईश्वरच सर्व कांहीं बरें करील, यांत मात्र मला अंदेशा वाटत नाहीं. ”

———

## प्रकरण अकरावें

नित्याप्रमाणे आम्ही जमल्यानतर मी म्हटले—" आमच्या लहानपणच्या या गोष्टी तुम्हाला कटाळवाण्या तर नाहीं ना वाटत ? "

" भाऊ ! त्यात जीवनाचं सत्य दर्शन आहे. " सदानद बोलला. " नेहमीं नगरांतील कुद हवेत राहून गोड घास खाऊन कंटाळलेल्याना निसर्गरमणीय वातावरणातील ताज्या भाजी भाकरीची रुचि पंचपक्वान्नांनाही लाजविणारी अशीच वाटणार नाहीं का ? "

" सदा ! " मी म्हटले, " तूं तर काव्यच बोलूं लागलास ! माझी आपली ही आयुष्यांतील प्रातःकालची चटणी भाकरी तुम्ही गोड करून घेतां, एवढच मी समजतो ! "

सदाकडे पाहात, सारेजण तोंडांतल्या तोंडांत हसू लागले, नतर सुलभा म्हणाली, " सागा भाऊ ! तुमच्या त्या गमतीजमतीच्या गोष्टी !"

मी म्हटले, सुलभा म्हणते, तसल्याच गोष्टी मी सागतो, असे म्हणून मी सुरवात केली—

" आमच्या बापूंच जोशीपण गेले, तरी घोड्यावरून ते शेतांतून फेरफटका करून येत असत. त्यावेळीं कोणीना कोणी त्यांच्या पडशींत भाजीपाला, कणसेंबिणसे घालीतच ! कित्येक वेळा आपल्याच पण सावकाराच्या ताब्यांत असलेल्या शेतात जाऊन तेथें ते खड्डे काढीत; आणि त्यांत झाडें लावण्याचा आपला मनोदय आम्हांला सांगत. त्यावेळीं आई त्यांना म्हणे,

" आपली प्रकृति यथातथाच असते. मग असल कष्ट कशाला ? आपलं घरांत बसावं ! विसावा घ्यावा कीं ! "

" वा ! छानच सांगतेस ! " बापू म्हणत असत. " तू मात्र गोर-गरिबांना औषधपाणी देत गावभर हिंडतेस, त्यांत श्रम नाहींत का ? मी आपल स्वस्थ राहाव ? गजूला चागलाच धडा होईल की तो !

' उद्योगाच्या घरीं ऋद्धि सिद्धि पाणी भरी !

असं मी त्याला सांगतो. तो फुकाचा उपदेश होईल ना ? "

" मी आतां आपली वार्डीत गोरगरिबांच्या घरीं जातें खरी ! " आई म्हणत असे. " आपल्या परीं गरिबाच्या उपयोगी पडावं, हा छद आहे माझा. अलीकडे औषधाबद्दल पीठ मीठ कुणी दिलं, तर घेते मी ! चूक होत त्यांत ! पण देवानच कठीण दिवस आणलेत, तोच परीक्षा पाहातोय."

" समजल मला ! " बापू म्हणत. " लोक नावे ठेवतात आपल्याला, पण आळसात दिवस घालवून चकाट्या पिटीत बसण्याचा माझा देहस्वभावच नाहीं मुळीं ! शिवाय अकालीं निद्रा आणि आळस हे मी महाशत्रु समजतों. गजूला देखील मी हेच सागत असतों. कांहीं तरी उद्योग करीत जा. घरच किंवा जनावरांचें कसलेही काम करण्यास लाजू नकोस. "

माझ्या देखतच असे संवाद गोड वातावरणांत होत असल्यामुळे मला त्यापासून बोध घेण्यास पुष्कळ सापडे. त्याचा परिणाम एकदां असा झाला—

आमच्या मालकीचीं शेतें आता सावकारांच्या ताब्यात गेल्यामुळें घरांत गाईवासराना चारा कमी पडू लागला. त्यातून अवर्षण पडलेले होते. मात्र सन १८९८ सालच्या पावसाळ्यात थोडा पाऊस पडला. गुराना तात्पुरता चारा झाला.

आमच्या गाई अपुरा कडबा मिळाल्यानें खराब झाल्या होत्या. त्यातील एक खिलारी गाय तर माझ्या फार आवडीची होती. त्या गाई आता खूप चारा घालून गुबगुबीत कराव्या, असे विचार माझ्या मनात घोळूं लागले. गुराख्यांच्या मुलाना थोडे पैसे किंवा अन्न दिलें, म्हणजे गवताचा भारा ते आणून देत असत, पण आमच्या घरीं या दोन्हीही गोष्टींची वाण पडली होती !

आतां बाबू मोरे, मुसळे, गुरव, खरे वगैरे मुलगे चौथी इयत्ता ओलांडून

पांचवीत आले होते. मी नुकताच सहावीत गेलों होतों. पांचवी, सहावी या इयत्तातील मुलें कांहीं विषयास एकत्रच अभ्यासास बसत असत.

मला पांचवीच्या वर्गावर गुरुजी पाठवीत. मी त्या मुलांचा अभ्यास घेत असे! त्यामुळे बाबू वगैरेंचा आणि माझा लोभ वाढत गेला. मी बाबूच्या घरीं जाई, तेव्हा बाबू कसल्यातरी शेतकीच्या कामात असे. शाळा सुटली म्हणजे शेतात जाऊन तो गवतही काढून आणीत असे!

बाबूचें हें उदाहरण माझ्या मनावर चागलें बिंबले. त्यामुळें एका रविवारी मी गाईबरोबर डोंगरात गेलों. तेथील खोऱ्यातील चांगले हिरवेगार गवत मी कापून घेतले. त्या गवताचा भारा डोकीवर घेऊन मनातल्या मनांत मारुतीचे स्तोत्र म्हणत म्हणत, मी घरीं येत होतों. माझी प्रकृति चांगली धडधाकट असल्यामुळे मला गवताच्या भाऱ्याचे ओझे वाटत नव्हते!

गावाजवळच्या माळावर मी येऊन पोहोचलों. तेथें पांढरपेशाचीं मुलें विटीदांडू खेळत होतीं. त्यानीं मला चिडविण्यासाठीं म्हटले,—

"गवताचा भारा केवढ्याला रे देणार गजा? आमच्या घरच्या दोन भाकरी घेऊन जा; आणि टाक तो भारा!"

मी कांहीं न बोलता मुकाट्याने गाईच्या मागून पुढे चाललो.

"बोल कीं गजा!" विष्णु व बाळू ओरडले. "धंदा करतोस नि बोलायला रे का लाजतोस?"

"घरचं काम करायला रे लाज कसली?" मी शांतपणे म्हटलें, "गाईना चारा घातला, कीं त्या दूध देतात. ते अमृत आमच्याच धेनु आम्हाला देतात. तुम्ही शिकता त्या धेनुहरणांतील गाईसारख्या माझ्या गाई आहेत ह्या! उगीच वात्रटपणा करूं नका."

"वा रे वा!" पोरें ओरडली. व बाळू म्हणाला, "जणू हा वसिष्टच पडला कीं नाहीं? पाहूं बरे, याच्यात कांहीं सामर्थ्य आहे का?"

त्यांच्यापैकीं कोणीतरी माझ्या आवडत्या गाईला दांडूचे दोन रट्टे मारिले. ती गाय पुढें धावूं लागली, तशी तिच्या मागें मुलें लागलीं. तिनें त्या मुलाचे आणखीही चार पांच जोराचे तडाखे सहन केले नंतर तिची सहनशीलता संपली. आणि ती मुलांच्या अंगावर उलटली!

ती खिलारी गाय तापट होती. तिची शिंगे अणकुचीदार होतीं. अलीकडे ती बरीच तयार झाली होती ! विनाकारण मिळू लागलेला मार तिला सहन झाला नव्हता. ती एकदम मुलावर चालून गेली. ती पांढरपेशाचीं मुले गुराख्यासारखी जनावरांत सरावलेलीं नव्हतीं. त्यामुळे त्यांना धावतां भुई थोडी झाली ! दोघां तिघाना तिच्या शिंगानीं चांगल्याच जखमा झाल्या !

असा हा झालेला गोंधळ चिघळत असल्याचे पाहून मी 'हम्मा ! हम्मा' करून त्या गाईला हटकले. ती गाय धावत धावतच परत आली ! सगळ्या गाईबरोबर तिने झपाट्यानें आपले घर गाठले.

आता तीं जखमी मुले विव्हळत विव्हळत घरीं निघालीं सार्‍या मुलांचा माझ्यावर राग झाला. मलाच चोपण्याचा त्याचा बेत दिसला! मलाही राग आला होता. माझ्या आंगावर मुले दाडू उगारून धावून आल्याबरोबर मी गवताचा भारा जमिनीवर फेकला, आणि त्यांच्यातीलच एकाच्या हातचा दाडू हिसकावून घेऊन मीं त्या भित्रटाना प्रसाद देऊन पिटाळलें !

नतर गवताचा भारा घेऊन घरीं आलो. नित्याप्रमाणे संध्येच्या तयारीस लागलो.

पण तितक्यात जखमी झालेल्या मुलाच्या पालकाचा घोळका माझ्या घरापुढे आला. गावचे बघे लोकही तेथे जमा झाले. गजानेच सार्‍यांना मारले, असे ते क्रुद्ध पालक ओरडू लागले ! माझ्यावर मोठा गहजब सुरू झाला ! माझ्या शोधार्थ लोक घरात घुसू लागले. मी मात्र परसांतील तुळशीवृंदावनाजवळ शांतपणे संध्या करीत बसलो होतों !

इतक्यांत आई मजजवळ आली आणि तिनें घडलेली हकीकत मला विचारली. मी तिला थोडक्यांत काय काय झाले, तें सांगितले.

बापू त्या खवळलेल्या लोकांना आवरीत होते. त्या कांगावखोर लोकांचें म्हणणें त्यांनाही काहींसे खरें वाटलें. जखमी झालेली रक्तबंबाळ मुलें पाहून तर त्यांचा माझ्यावर विशेष राग झाला, आणि ते मला शोधण्यासाठीं थेट परसात आले !

माझा हात धरून त्यांनी मला जोराने ओढलें. ते मला बडाविणार, इतक्यांत आई धांवत आली. तिने मला झटकन पाठीशीं घातलें व ती म्हणाली--

" गजूचा कांहीं अपराध नाहीं यात ! त्याला उगीच चोपूं नका. त्या मुलांनीं गायत्रीला त्रास दिला ! तिला छळल ! मारल ! म्हणून तिने त्यांचा सूड घेतला ! पाहा त्या मुलांच्या जखमा शिंगांनीं ओरखटलेल्या आहेत की नाहींत ? "

इतक्यात काहीं चागले सज्जन तिऱ्हाइत लोकही तेथें जमले. गुराखी मुलेंही त्या ठिकाणीं आलीं. त्यानीं इत्थभूत घडलेली हकीकत आपापल्या परी सागितली. तक्रारी लोकाना आता बोलण्यास तोंड राहिले नाहीं. आपल्याच मुलाना रागे भरीत भरीतच ते लोक आपापल्या घरीं निघून गेले !

माझी आई, वडिलाच्या तोंडावर असे जोरदार व निश्चयी कधीं बोलत नसे. ती नेहमीं नम्रपणेच तोंडातून मृदु शब्द काढी पण त्यावेळीं तिला माझी बाजू पूर्ण सत्याची वाटली. म्हणून धाडस करूनच तिने माझ्यावरील माराचा प्रसग टाळला.

तिची ती धैर्याची वागणूक पाहून मी अगदीं चकितच होऊन गेलों. नतर मी आपली सध्या शातपणे केली आणि भक्तिभावाने रामरक्षाही म्हटली.

रात्रीं मी आईच्या कुशींत डोकें खुपसून निजलों. धैर्यशाली मातेचें हृदय म्हणजे सरक्षणाचा अभेद्य कोटच होय, असें मला त्यादिवशीं वाटलें. मी मनांतल्या मनांत स्तोत्रे म्हणत म्हणतच झोपीं गेलों."

मी थांबलों. सुलभा तिच्या आईकडे पाहात म्हणाली,

" कशी बर सुंदर गोष्ट भाऊनीं सागितली ही. " नंतर माझ्याकडे पाहून ती म्हणाली, " भाऊ ! आता उद्याची गोष्ट असलीच चांगली पाहिजे अं ! "

---

प्रकरण बारावें

दुसरे दिवशीं थोडे लवकर आम्ही जमलों. त्या दिवशीं एकादशी होती. सुलभाला घेऊन तिची आई सकाळीं गोदावरीच्या रामकुंडांत स्नानाला गेली होती. नंतर त्यांनीं पंचवटींतील रामाचे दर्शन घेतलें होतें. ती गोष्ट सुलभाच्या डोळयापुढे असल्यानें ती म्हणाली,

" भाऊ! आज आम्ही गोदावरींत स्नान केले. किती मजा वाटली आम्हाला. आज खरं म्हटलं, तर त्र्यंबकेश्वरासच जायला पाहिजे होतं, नाहीं ? "

" नको कुणी म्हटलं होतं ? " मीं म्हटले. " मला काहीं महत्त्वाचें काम होतें, नाहीं तर मीदेखील नेले असतें तुम्हाला. "

इतक्यात शिवानंद म्हणाला,

" भाऊ! खरें म्हटले तर, तीर्थांत स्नान करणे, नित्य नियमानं देवदर्शन घेणें, यात पुण्य वगैरे काहीं दिसत नाहीं. तो एक मनावर झालेला भोळा संस्कार नव्हे का? "

" बर बोललास शिवा! " मी म्हटलें. " वर वर पाहाताना तसें दिसतें खरें, पण जास्त खोल विचार केला, म्हणजे त्यातलें गांभीर्य नजरेला येतें. "

" भाऊ! " सदानंद बोलला. " तें कसं ते थोडें स्पष्ट करून सांगता का? "

" हो! तें सहज सांगता येईल! " मी गंभीरपणें म्हटलें व सांगूं लागलों—

आपल्या प्रभातकाळच्याच प्रार्थनेची गोष्ट घ्या. सर्व कामें, सर्व सुधारणा, सर्व कलाकौशल्य ह्याच्या मूळ कारणांत हाताला अत्यंत महत्त्व आहे ना ? पाहाटेस जागें झाल्याबरोबर हात चोळून व आंगांत उष्णता आणीत आणि आळस झिडकावून टाकीत आपण हाताचें दर्शन घेत म्हणत असतो—

" कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।
करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम् ॥ "

या म्हणण्यांत हाताच्या बोटात लक्ष्मी आहे. मध्यांत सरस्वती म्हणजे विद्या आहे. आणि हाताच्या खालील मूलभागी परमेश्वरस्वरूपी सामर्थ्य आहे, अशी ह्या प्रार्थनेत किती उदात्त कल्पना आहे. हें विचार केला कीं समजत नाहीं का ? आणखी दुसरे श्लोक पाहा—

मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्द माधवम् ॥
गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः ।
गुरुः साक्षात्परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥

यांतील पहिल्या श्लोकांत परमेश्वराच्या कृपेनें सर्व कांहीं होतें, असें ध्वनित करून त्याला आपण वंदन करतो. आणि दुसऱ्या श्लोकांत गुरु साक्षात् ब्रह्मस्वरूप आहे, असे म्हणून आपण त्याना नमन करितो.

याहीपेक्षा गांभीर्याची पराकाष्टा अन्नग्रहणाच्यावेळी म्हणत असलेल्या पुढील तात्त्विक विचारात किती तरी आहे.

अहं वैश्वानरोभूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥

हा गीतेतील श्लोक परमेश्वर सर्व अन्नाचे पचन करितो असें बजावतो.

सारांश, आपल्या नेहमींच्या साध्या जीवनात आपली संस्कृति ओतप्रोत भरलेली आहे, याचा पुरा अनुभव येतो. डोळ्यावरची झापड टाकून थोडा अधिक विचार केला कीं, ही संस्कृति सार्वत्रिक स्वरूपाची व मन उदात्त व पवित्र करणारी आहे, हे पटण्यास वेळ लागत नाहीं.

माझें हे गभीर विवेचन सुलभाच्या चांगलें लक्षात येईना, तेव्हां ती म्हणाली,

" भाऊ ! सदाला नि शिवाला मग आपलं अधिक सांगा. पण आतां आपली गोष्ट सांगा ना आम्हाला. "

" हो ! " मी म्हटलें, " माझी गोष्ट ही आता मी म्हणत होतों त्यालाच पोषक आहे. कसे ते पाहा—

आमच्या घरची झालेली हलाखी, तुम्ही ऐकत आला आहांत, पण एक दिवस असा प्रसग आला होता कीं, त्या दिवशीं खरोखरच घरात पुरेसे धान्यही नव्हते.

अनायासे त्या दिवशीं श्रावणी सोमवार होता. बापूंनीं कडकडीत उपोषण करून डोंगरातील महादेवास अभिषेक करण्याचे ठरविले. शंभूला ताईनें आपल्या घरीं नेले होते. मला सकाळीं आईने थोडें दूध दिलें आणि आम्ही सारेजण महादेवास गेलों.

महादेवाच्या परिसरात गेल्याबरोबर मनाला प्रसन्नता वाटली. तेथील जिवंत पाण्याचीं कुंडे तुडुंब भरलेलीं होतीं. सभोंवतालच्या दऱ्याखोऱ्यांत विविध रगाचा सकेश्वर आणि पाढराशुभ्र चाफा फुललेला होता. खोलगट भागातील सीताफळींना फळाचा बहर आलेला होता.

मी बेलवनातील बेल आणि देवाच्या उद्यानातील फुले जमा करून आणलीं. बापूंनीं स्नान करून महादेवाच्या अभिषेकास सुरवात केली. मीही घागरींनीं पाणी आणून भल्या मोठ्या अभिषेकपात्रांत ते ओतलें. त्यानंतर मीही बापूंच्याबरोबर खणखणीतपणें रुद्र म्हणूं लागलों.

रुद्र म्हणण्यात बापूंची पूर्ण तद्री लागली होती. भक्तियुक्त अंतःकरणानें त्यांचें एकामागून एक आवर्तन चाललें होतें. आई आपलें धुणें आटोपून स्नान करून देवळात चाललेलें अनुष्ठान ऐकत बसलेली होती. ॐ शंभो, हर, हर, म्हणत, म्हणत लोक पिंडीस पाणी घालून जात होते. सर्वत्र गंभीरता पसरली होती.

दुपार झाली. माझ्या पोटांत कावळे काव काव करूं लागले. तेथें खाण्याची कांहीं तजवीज नव्हती. मी जरा कावराबावरा झालो आणि देवळाच्या बाहेर आलो.

मी इकडे तिकडे भटकूं लागलो. सुंदर घोड्यावर बसून येत असलेला एक इसम मला दिसला. त्याच्या इतमामावरून तो कोणी तरी चागला धनिक असावा, असे मला वाटले. त्याने तो आपला घोडा तेथेंच आंब्याच्या झाडास बाधला आणि स्नान करण्याकरिता तो कुडाकडे चालला. मला पाहून त्यानें विचारले--

" कोणी भटजी देवळांत आहेत का? मला त्यांच्याकडून एक एकादशनी करवून घ्यावयाची आहे."

"हो! आमचे बापू आहेतच कीं!" मी उत्तर दिलें, "ते गाभाऱ्यांत अभिषेक करीत बसले आहेत!"

"बर, बाळ!" तो गृहस्थ म्हणाला. "त्याना सागशील का, मी स्नान करून गाभाऱ्यात येत आहे असे? मग मी त्याना काय बोलायचें तें बोलतों."

मी गाभाऱ्यांत जाऊन बापूंना त्या गृहस्थाचा निरोप सांगितला. आईलाही तो समजला. मी मात्र तेथे न थाबता बाहेर निसटलो.

मला आता कडकडून भूक लागली होती. कांहीं कोठें खाण्याजोगी वस्तु आढळेल कीं कसें, ह्याचा शोध मी करीत होतों. त्या दिवसांत डोंगरातील हिरवी कच्चीं शिताफळें तरी मिळतील, असा माझा कयास होता.

मी दऱ्यातून हिंडूं लागलों. कच्चींच का होईना, सिताफळें दगडांनीं फोडून दातानीं कुरतडून खात होतों. एके ठिकाणीं पिकलेलीं सिताफळें मला मिळालीं. आंबट आंबोण्याचे घोसही मला आढळले. मी त्यावर झडप घालून ते पोटांत रिचविले. चांगला तास दीड तास हिंडत हिंडत असें मी बोकणे भरीत होतों. त्यायोगे माझी क्षुधा बरीच शांत झाली. डोंगरातून झिरपत येणाऱ्या एका निर्झरातील गोड पाणीही मी दोन ओंझळी प्यालो व तेथेंच थोडा वेळ विश्रांति घेत बसलो.

इतक्यांत डोक्यावरून जाणारा घारींचा एक घोळका मला दिसला. एका घारीनें खालीं एकदम झडप घालून कांहींतरी उचलून नेलेंसे मला वाटले पण त्याच वेळीं तिच्या चोचींतून एक पांढरा पदार्थ खालीं पडलेला असावा, असें मला दिसलें. तें काय पडले असावें, या जिज्ञासेनें मी तिकडे धावत गेलों, तो तेथें पांढऱ्या फडक्यातील एक पुरचुंडी मला आढळली ! मी ती उचलून हातांत घेतली. तींत कांहीं खाण्याचा जिन्नस असेलही, असे मला वाटलें. पण ती फार हलकी होती !

लगेच मी गांठी सोडून फडकें मोकळे केलें. आंतील कागदी नोटा पाहून मी आश्चर्यचकित झालो !

मी ह्यापूर्वी इतक्या नोटा पाहिलेल्या नव्हत्या. पोस्टांतील एक दहा रुपयाची नोट गुरुजींनीं आम्हांला दाखविली होती. त्यामुळेच त्या नोटा आहेत, असे मी ओळखले. नाहीतर ते कसले तरी कागद आहेत, असें वाटून मी ते कदाचित् फेकूनही दिले असते !

मी आतां ती पुडी घेऊन देवळाकडे निघालो. मला आई हाका मारीतच होती. बापूंची पूजा आटोपली होती, ते घरीं जाण्याच्या तयारींत होते.

मी कोठेतरी दडी मारून बसलो. त्याचा राग बापूना आला होता. पण मी त्यांच्याजवळ आल्याबरोबर त्यांच्या हातीं ते फडक्यात बांधलेलें पुडकें दिले. व ते कसे हातीं लागले, ते थोडक्यात सांगितलें.

बापूंनीं माझी पाठ थोपटली व आईनें माझें कौतुक केलें. पण इतक्यात बापू उद्गारले,

" गजू ! पळ पळ ! अगदीं जोरानें पळ ! मघाचे गृहस्थ आल्या वाटेने रस्त्यात शोध करीत परत चालले आहेत ! त्यांचाच हा जिन्नस आहे त्याना गाठ व जिन्नस सापडला म्हणून सांग. अगदीं धूम ठोक बरें ! "

ते गृहस्थ आले ती वाट मला माहीत होती. तो उतरणीचा रस्ता होता. मी जोरानें पळत गेलों. अर्धाएक कोसाचें अंतर मीं तोडलें असेल, नसेल. इतक्यांत ते मला दिसले. हाक मारून मी त्यांना थांबविले.

घडलेली हकीकत सांगतांच त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. लागलीच ते परतले !

* * *

सायकाळीं त्या गृहस्थांचा मुक्काम आमच्या घरीं पडला होता. त्या दिवशीं त्यानीं आमच्याच घरीं नैवेद्याचा उत्कृष्ट बेत केला होता. त्यांनीं घोडयावरून भरपूर सामुग्री आणली होती आमच्या आईनें त्या दिवशीं स्वयपाकांतील सुग्रणपणाची शिकस्त केली होती.

जेवण झाल्यावर अत्यत समाधानानें त्या गृहस्थाने म्हटले, “बापूसाहेब, मी व्यापारी आहें, श्रीस नैवेद्य करून पुढ जाण्याचा माझा विचार होता. तो पुरा झाला. आपल्या कृपेच हें सारे फळ आहे.”

“यांत कृपा कसली ?” बापू म्हणाले “देवावर भार टाकून आम्ही आज होतो. आपण देवाच्या कृपानें तेथे आला, सुग्रास भोजन मिळालें. समाधान झाले.”

त्या गृहस्थाच्या डोळयात अश्रु उभे राहिले व तो म्हणाला, “या पुरचुडींत दहा रुपयांच्या नोटा आहेत. शभराच्या आहेत. हजाराची ही एक आहे. एवढी रक्कम माझी गेली होती ! मी स्नान करीत असतां एका बाजूस ठेविलेल्या कपडयांतील ही परचुडी, खाण्याचा जिन्नस होंत असेल अशा समजुतीनें घारीने पळविली असावी ! पण बापूसाहेब आश्चर्य याच्या पुढचे आहे. एवढी रकम सापडल्यावर कोणी ती परत केली नसती ! तुमचे व तुमच्या गजूचे ऋण मी कसें फेडू ?”

“नाहीं. नाहीं. ते कांहीं नाहीं !” बापू ताबडतोब उद्गारले. “आमचा त्या धनाला स्पर्श झाला, हेही पापच ! जें आमचे नाहीं, तें आमच्या हातांत कशाला ? म्हणूनच मी गजाला पळत पळत पाठविला. उपाशी पोटीं असताही तुम्हाला त्याने गाठलें, तुमची काळजी दूर झाली ! तुम्ही आमच्या जवळ काय झालें तें जाताना बोललांत, म्हणून आम्हाला कळलें. नाहींतर, या धनाचें काय करावे, याचीच पचाईत मला पडली असती !”

बापूंच्या मनाची थोरवी मला देखील या संभाषणानें कळली. आई सारें ऐकतच होती. तिनें मला जवळ बोलावून घेऊन म्हटलें,

" गजू ! ऐकलंस का ? दुसऱ्याचं धन म्हणजे विष आहे, हें लक्षांत ठेव. ज्याला नीति, न्याय म्हणतात, तो आपल्याच घरीं आहे कीं ! "

ते आईचे बोल माझ्या हृदयात खोल खोल जाऊन बसले. जन्मभर ते मी आचारांत आणलें. " शिवा ! आपली संस्कृति म्हणतात, ती अशी आहे. ती आचार–प्रधान आहे. प्रत्येक आचारात ईश्वराच्या अस्तित्वाची जाणीव ठेवण्याच्या योजना तींत आहेत."

" भाऊ ! तें बरोबर असेलही ! " सदानंद बोलला " पण तसे स्पष्ट करून कोणी सागतच नाहीं कीं ! त्यामुळे तसल्या आचाराची सनातनी अशी शाब्दिक टवाळी जिकडे तिकडे चालत असते ! "

" मला कांहीं तसली चिकित्सा येथे विशेष करावयाची नाहीं." मी म्हटलें, " पण तूं आरंभीं जें विचारलेंस, त्याचे स्पष्टीकरण कांहीं अशीं तरी झालें ना ? "

" झालं म्हणजे काय ? " शिवानंद म्हणाला, " भाऊ ! सोदाहरण त्याचें मूर्तिमंत दर्शनच तुमच्या गोष्टींत झालें कीं ! "

सुलभा म्हणाली " भाऊ ! गोष्ट छान होती. उद्यां पण अशीच छान छान गोष्ट सागा बरं का ? "

———

*

## प्रकरण तेरावें

वद्य पक्षांतील ती द्वादशी होती. काळोख द्वाडपणें शहरांतील गल्ल्या-गल्ल्यातून धिगाणा घालीत होता, हें आम्हांला आमच्या बंगल्याच्या गच्चीवरून दिसत होतें. हा त्याचा खेळ मधून मधून आश्चर्ययुक्त तेजस्वी नजरेनें दिवे न्याहाळीत होते. त्याच्या भीतीनें अंधारही दूर दूर झपाट्यानें सरकत होता.

शिवानंद शहरांत कांहीं कामाकरितां गेलेला होता. त्याची वाट पाहात आम्ही गच्चीवर बसलों होतों. सहाजीकच आमचे डोळे नगराच्या देखाव्या-कडे वळले होते.

इतक्यांत शिवानंद धाड धाड पाय आपटीत जिन्याच्या पायऱ्या चढून गच्चीवर आला, त्याला सुलभानें म्हटलें,

" शिवा, इतका उशीर रे तुला कां झाला ? आम्ही तुझी वाट पाहात बसलों आहोंत. "

" होय, मला जास्त वेळ लागला खरा ! " शिवानंद बोलला. " चांगला पांढरपेशाचा मुलगा गंगेवरील एका दुकानांत चोरी करितांना सांपडला. चार पांच रुपयाची चोरी होती ती ! दुकानदारानें बडवून त्याला सोडलें ! तो मुलगा रडत होता. मी त्याला चार समजुतीच्या गोष्टी सांगत घरीं पोंचविलें. त्यामुळें वेळ लागला ! "

" अगबाई ! " सुलभाची आई म्हणाली. " पोरासोरांना असल्या वाईट सवई कां लागतात बरं ? बरं झालं, तो दुकानदारच शाहाणा ! त्यानं जर पोलीसांच्या स्वाधीन त्या मुलाला केलं असतं. तर एरवडाच त्याला पाहायला लागला असता ! "

" आणि शिवाला साक्षीदार म्हणून कचेरींत खेटे घालावे लागले असते ! पोलीस कचेरींतील गमती दिसल्या असत्या त्याला ! " सदानद मध्येच बोलला.

" जाऊं द्या तें ! " सुलभा माझ्याकडे पाहात बोलेली. " भाऊ, गोष्ट सागणार आहांत ना आतां ? "

" पण भाऊ ! " सदानंद म्हणाला, " मागच्या गोष्टींत त्या व्यापाऱ्याची गेलेली केवढी मोठी रक्कम तुम्ही त्याला मिळवून दिलीत ! त्याने जातांना तुम्हांला खाऊकरिता कांहीं तरी देणें वाजवी नव्हतें का ? "

" तो व्यापारी सज्जन होता " मी म्हटले. " तो पाहाटेस उठून गावीं निघाला. त्यावेळीं बापू मला म्हणाले,

" गजू, उठ लवकर ! या पाहुण्यांना त्यांची वाट दाखविण्याकरितां गांवाबाहेरच्या वडाच्या पारापर्यंत जा बर ! "

मी लगबगीनें उठलों. तोंड धुतले आणि त्या पाहुण्याबरोबर निघालों. पाहुण्यानाही मार्ग दाखविण्याकरितां मीच यावें, असे त्याच्या हसत मुखावरुन दिसत होतें !

आम्ही अर्धा मैल बोलत बोलत चाललो होतो. त्यानीं माझी खूप स्तुति चालविली होती. माझ्या आईवाडिलांचा मोठेपणा ते वर्णन करीत होते.

वडाच्या पारापर्यंत आल्यावर त्यानीं घोडयावर बसण्याची तयारी केली; आणि माझ्या पाटीवरुन हात फिरवून ते प्रेमळपणे म्हणाले,

" गजाभाऊ, तुम्ही शूर आहात. बुद्धिमान आहात. तुमच्या गुणांचें चीज ईश्वर केल्याशिवाय राहाणार नाहीं. तुम्हाला मी फूल नाहीं, फुलाची पाकळी देतों, याचा उपयोग शरीर कमावण्यासाठीं करा. "

असें म्हणून त्यानीं माझ्या हातीं दहा रुपयाच्या दोन नोटा आणि रोकड पांच रुपये ठेविले आणि चटकन ते घोडयावर बसले.

बापू रागावतील या भीतीनें मी ते पैसे घेणार नव्हतो. त्यांना परत देणार होतो. पण त्यांनीं जलदीनें घोडयाला टाच दिली. माझे बोलणें

ऐकूनच घेतलें नाहीं. आणखी ते म्हणाले, "माझी आठवण ठेवा, तुमच्याकरितां मी जरूर तें करीन!"

"तो व्यापारी प्रामाणिक व व्यवहारदक्ष खरा." सदानंद बोलला.

"हो! तें खरें आहे." मी म्हटलें. "त्याच पैशामुळे मला चांगला धडा मिळाला! पैसे घेतल्याबद्दल बापू मजवर रागावले. आईच्या कुशींत शिरून तिला मी झालेली हकीकत सांगितली. तिनें ते रुपये मोठया नाखुषीनें खिडकींत ठेवण्यास मला सांगितले."

"हो! समजलं आम्हाला!" सुलभा उतावीळपणें म्हणाली. "पण बापू, आजची गोष्ट सांगता ना आम्हाला!"

"अग ए! थांब कीं!" शिवानंद म्हणाला. "याच हकीकतींत गोष्टीचें सूत्र गोवलेले दिसतें! बापू, सांगा आता तुमची गोष्ट?"

मी सांगू लागलो—"त्याच वेळीं पुण्याकडील खळबळजनक वार्ता आमच्या गावापर्यंत येऊन थडकल्या होत्या. त्या बातम्या केसरी वर्तमानपत्रातून येत होत्या. नाना खरे केसरी घेत असत. त्यांच्या सोप्यातील बैठकींत गावची कांहीं माणसे जमत असत. त्यांना मोठ्या आवेशानें नाना केसरी वाचून दाखवीत!

नानांच्या घरीं पुण्याची कांहीं पाहुणे मंडळी येऊन राहिली होती. ते लोकही पुण्याकडील भयंकर भयंकर गोष्टी बोलत असत!

मला वर्तमानपत्र वाचण्याची अद्यापि गोडी लागली नव्हती. आईनें सांगितल्यावरून मी रामविजय, हरिविजय, भक्तिविजय असल्या पोथ्या वाचून काढल्या होत्या. केसरींतील बातम्या आणि पुण्याकडील पाहुण्यांचीं बोलणीं हीं बाळू खरे ऐकत असे. तो आम्हाला सांगे—

"पुण्यास प्लेग नांवाचा मोठा रोग आला आहे. प्लेगचे गोळे आंगावर एकदम उठतात! माणूस एकसारखा ओरडतो! चार पांच तासांत तो मरूनही जातो!"

बाळूला समजलेली ही गोष्ट आम्हांला फार भीतिदायक वाटे. आम्ही मुलें रोज बाळूला बातमी विचारीत असूं. एके दिवशीं बाळू म्हणाला,

" आमचे नाना म्हणतात; आतां कली माजू लागला आहे. लोक मोठमोठीं पापे करू लागले आहेत ! देवाने म्हणूनच प्लेग पाठविला आहे ! कली जेथें प्रवेश करील, तेथें प्लेग जाणारच ! "

बाळूच्या असल्या घाबरट बातम्यांमुळे मला केसरीच वाचावा, असें वाटूं लागलें. पण नाना खरे " मुलांनीं असली पचाईत करू नये. वर्तमानपत्र वाचू नये ", असें बाळूला दरडावून सागत असत. त्यामुळें खऱ्याचा केसरी आम्हांला मिळू शकत नव्हता !

इतक्यांत पुण्यास रॅंड साहेबाचा बळी पडल्याची बातमी आमच्या गांवीं येऊन थडकली ! साऱ्या लोकांत तो एक चर्चेचा विषय झाला. " पुण्यात बड चालू आहे. केव्हा काय होईल, याचा नियम नाहीं, जिकडे तिकडे तालमी सुरू करून बळ कमावलें पाहिजे, " असें पुण्याचे पाहुणे म्हणतात, हे बाळूनें आम्हाला सांगितले. त्याच्या घरच्या बैठकीतील तो एक बाळूनें ऐकलेला विकृत ध्वनि होता, हे कळण्याचीही पात्रता आम्हां मुलात नव्हती.

बाळ खऱ्याच्या म्हणण्याप्रमाणे आपण तालीम केली पाहिजे, असे मुलें म्हणू लागलीं.त्याचा विचार करण्यासाठीं आम्ही वडाच्या पारावर जमलो.त्यात मोरे, मुसळे, गुरव, इगळे व खरे हेही होते. तालमीची कल्पना सर्व समत झाली. पण तालीम गुपचूप झाली पाहिजे, नानाना कळता कामा नये, ही बाळूची अट होती. मीही घरांत बापूंची संमति घेण्यास भीतच होतो. आणि भीतीच्या पोटींच पाप निर्माण होतें, याचा मला पुढें रोकडा अनुभव आला !

गांवांत एक जुना मठ होता. तो फार मोठा होता. त्याच्या दुसऱ्या मजल्यावर पुष्कळ मोकळी जागा होती. मठांतील गोसाव्याची संमति मोरे व गुरव यांनीं मिळविली व त्या ठिकाणीं गुप्तपणें तालीम करण्याचें आम्ही निश्चित केलें !

त्या तालमीत कोणीतरी आम्हांला गुरु पाहिजे होता. मोरे, मुसळे याना त्यांच्या आळींतील तालीम माहीत होती. पण त्यांपैकीं एकाद्यास गुरु करण्याची कल्पना खरे व इगळे यांना पटेना. मी घरीं नमस्कारांचा व्यायाम

करीत असे. मला जोर, बैठका कशा काढाव्या, हेंही बापूंनीं शिकविलें होतें. ही गोष्ट बाबू मोरे यांस चागली माहीत होती. तेंव्हां त्याच्याच सूचनेवरून मलाच तूर्त तालमीचा गुरु समजावे, ही कल्पना सर्वांना पटली.

तालमीच्या जागेंत मारुतीची स्थापना झाली पाहिजे, त्याच्या पुढे नारळ फोडला पाहिजे, खडीसाखरेचा पण नैवेद्य पाहिजेच, असें सर्वांनीं ठरविले. मारुतीची लहान पितळेची मूर्तिं विकत आणावी, असेंही ठरलें.

पण या खर्चाची तजवीज कशी करावी, हा प्रश्न लवकर सुटेना. प्रत्येकानें थोडी थोडी वर्गणी दिली पाहिजे, असे मीं सुचविले. पण त्या काळीं घरांतील माणसें मुलांजवळ पैसे देत नसत. थोडें थोडे धान्य आणून देण्याचे मोरे, मुसळे व गुरव यानीं कबूल केले. पण त्याची विक्री करतेवेळीं आपले गौप्य बाहेर फुटेल, अशी शका निघाली आम्ही मठातील तालमीच्या जागेत बसून या विषयाची पुष्कळ चर्चा केली, पण त्यातून मार्ग निघेना. शेवटीं ‘गजाला आपण गुरु केले आहे, त्यानेंच काय ती प्रथम तजवीज करावी, तो जोशी असल्यामुळें मूर्ति आणून प्रथम त्यानेच पूजा अर्चा केली पाहिजे’, असें इगळे व खरे यानीं ठासून सांगितले !

आमची तालीम गुप्त होती. आई व वडील यांची समति तिला मिळेल किंवा नाहीं, याची मला शका वाटत होती. त्यामुळे मला घरीं पैसे मागण्याचें धैर्य होईना.

शिवाय आमच्या घरात पैशाची अडचण नेहमीची असे. मला शेठजींनीं दिलेले रुपये गजूचे आहेत, असे नेहमी आई म्हणे. ती त्यातले पैसे बरेच दिवस खर्च करीत नव्हती. पण अत्यत अडचणीच्या प्रसगीं तिनें त्यापैकीं कांहीं रुपये खर्चले होते.

पैशाच्या विवचनेंत मी दोन दिवस घालविले. मारुतीचें चिंतन मी एकसारखें करीत होतो ! मी बलभीमाची मूर्ति आणून तिची पूजा तालमींत करीत आहें, असें माझ्या स्वप्नातही मला दिसलें. त्यामुळें भावनेच्या भरांत मी आपल्या मनाशीं बोलू लागलों, “ माझे रुपये आई खर्च करिते, तर त्यांतला एकदा रुपया मीही खर्च केला तर काय बिघडेल ? ”

माझ्या मनानें माझ्यासारखाच कौल दिला. मी उतावीळपणें खिडकीतील माझ्या रुपयापैकीं एक रुपया हळूच लांबविला. आणि हर्षभरानें पैसे मिळाल्याचें मी मित्राना कथन केलें !

मग काय विचारतां ? आम्ही आनंदानें नाचलो. चार आण्याची मारुतीची मूर्ति आणली. नारळ, खडीसाखर, गुलाल, उदबत्ती विकत घेतली. आणि दुसऱ्याच दिवशीं शनिवारची दुपारची सुट्टी असल्यानें, आम्हीं सायकाळीं मोठ्या थाटमाटात मारुतीची स्थापना केली. दगड मांडून पाच पाच जोर काढले. उठबशा काढल्या. शेवटीं मारुतीची आरती मी म्हटलीं. सत्राणे उड्डाणे म्हणताच मुलें उड्याच मारूं लागली ! बाबू तेवढा शातपणे आरती म्हणत होता. बाकी सारे घाई करून प्रसादाची वाट पाहात होते. त्या दिवशीं प्रसादाच्या वेळीं दहा बाराजण जमले होते !

आमचा गोंधळ ऐकून मठाचे बोवा तेथें आले. सर्वजण गप्प बसले. त्याना आमच्या नव्या उपक्रमाबद्दल संतोष वाटला. सर्वांना गुलाल लावून त्या दिवशींचा प्रसाद बुवानींच वाटला. मुलें चुळबुळू लागलीं. कारण कोणाचा मुलगा तूं ? अशी प्रत्येक मुलाची चौकशी बुवा करीत होते. त्यामुळे आमच्या तालमीची गुप्तताही नष्ट झाली !

मी व बाबू यानीं ती पडकी माडी स्वच्छ केली होती. आम्ही ती सारविली. झाडलोटीच्या वेळीं बाबू मोरे नियमित येत असे. बाकीचे काहींना काहीं तरी सबबी सागत !

दोन तीन दिवस आमचा आखाडा जोरात चालला होता. खोबरें व खडीसाखर यांचा प्रसाद प्रत्येकास मिळत होता. मठाचे बुवा आमची तारीफ करीतच होते !

पण तीन चार दिवसानीं आमच्या तालमीचा बोभाटा बोवानींच गावभर केला ! नाना खरे व बापू इत्यादिकांच्या कानावर ही गोष्ट गेली. नाना खरे यानीं त्याच्या बाळूला चोपलें. मुलाना अभ्यास सोडावयास लावणारा, तालमीचा अनाचार चालविणारा, जोशांचा गजाच, अशी माझी चारचौघात नालस्ती नानानीं चालविली !

आमची तालीम एकसारखी चागली पाच दिवस चालली होती! पहिल्या दिवशींचा सहा आणे खर्च व चार दिवसांचा पांच आणे मिळून रुपयातील अकरा आणे खर्च झाले होते. राहिलेले पाच आणे मी एका पुडींत बाधून मारुतीच्या खालीं पुरून ठेविले. पण सहावे दिवशी एक अकल्पित गोष्ट घडून आली! नारळ आणण्याकरितां मी ती पुरलेली ठेव शोधू लागलों. तेव्हा तिचा पत्ताच लागेना! पुडी गेली! पैसेही गेले! कोणीं नेले, हें कोणाला कळेना!

खोबऱ्याचा प्रसाद नाहीं, तर तालीमही नाहीं, असें आमच्या आळींतील मुलानीं त्या दिवशीं ठरविलें कीं काय, अशी मला शंका आली! कारण सहावे दिवशीं बाबू व मी असे फक्त दोघेच तालमींत गेलों होतों. बुवानीं आणिलेल्या खडीसाखरेच्या प्रसादावरच आम्हांस त्या दिवशीं संतुष्ट व्हावें लागले!

पण तो दिवसच मुळीं वाईट होता, असें माझ्या अनुभवास आलें. खिडकींत असलेल्या रुपयांतील एक रुपया कमी झालेला आईला आढळला. कदाचित् बापूंनीं तो घेतला असावा, असे वाटून तिनें जरा उतावीळपणानेंच बापूना विचारलें,

“ होय हो! या खिडकींत ठेविलेला एकादा रुपया आपण घेतला का? मला कमी झालासा वाटतो. ”

“ तुझा रुपया मी तुला विचारल्याशिवाय कसा घेईन? आज तुला भलताच संशय आलासा दिसतो! ” बापू तिरसटपणें बोलले.

“ असं काय म्हणायच बरं! ” आई काकुळतीच्या स्वरात बोलली. “ मी ताईला खण आणण्याकरिता पैसे पाहात होते. खिडकींतील वाटींत पाच रुपये होते. आता चारच आहेत. म्हणून मी सहज विचारलें. ”

बापूना आज सावकाराने देणें देण्याबद्दलचा मनस्वी तगादा लाविला होता. त्यानें फिर्याद करण्याचाही धाक घातला होता! त्यामुळें बापूचें मस्तक अगदीं तापून गेलें होतें. तशांत आईच्या बोलण्याचा अर्थ त्यानीं वेगळा घेतला व ते उसळून म्हणाले,

" काय बोलतेस तूं? मी काय चोर आहे, तुझा रुपया घ्यायला? पुरे हा संसार! दारिद्र्याचें दुःख मरणप्राय असतें, हेंच खरें! म्हटलेलेंच आहे कीं–

दारिद्र्यात्मरणाद्वा मरणं मे रोचते न दारिद्र्यम्।

ती तिन्ही सांजेची वेळ होती. आईने नुकतीच देवापुढे समई लाविली होती. सोप्यातील लांबण दिवा लावण्याकरितां ती आली होती. त्यावेळीं बापू सत्रस्तपणे सोप्यांतून येरझारा घालीत होते, त्यावेळचे हे सभाषण होतें.

इतक्यांतच मी घरीं आलो. माझी सध्येची वेळ टळून गेली होती. मी दबकत दबकतच घरात पाऊल टाकले. मला पाहाताच बापू माझ्यावर खेकसले.–

" गजा, इतका वेळ बाहेर काय करीत होतास? वेळेवर सध्या करायला नको. बाहेर गुडासारख भटकायला पाहिजे. "

मला बापूनीं गुड म्हटलेले माझ्या मनाला लागलें व मी सहज म्हटलें, " मला जरा वेळ लागला खरा, पण मी मठांत तालीम करीत होतों तेथें आम्ही मारुती बसविला आहे! "

" बरेच ढग चालविले आहेस तू! " बापू गरजले " चाफेकरासारखा तुला कोणा साहेबाचा फडशा पाडावयाचा आहे, वाटत? मारुती बसविला तुम्ही त्या गोसाव्याच्या मठात! कोणी दिला तो मारुती तुम्हाला? "

" कोणीं दिला नाहीं. " मी हळूच म्हटलें. " मीच तो विकत आणला. छान मूर्ति आहे ती! "

" अरे! मूर्ति चांगली असेल ती! " वडील बोलले. " तिचे पैसे कोणीं खर्च केले? एवढा दाता तुम्हांला कोण भेटला? "

" दाता कशाला पाहिजे? " मी चटकन उत्तर दिलें " मी माझ्या पैशानें तो विकत घेतला. तो माझा मारुती आहे. तो बलभीम आहे! "

बापूंच्या डोक्यांत चाललेल्या विचारास ही एक चालना मिळाली व ते जोरानें म्हणाले,

" अरे! तुला पैसे कोणीं दिले? कां चोरी केलीस? "

मला चोरी हा शब्द झोंबला. त्यामुळें मीं धीटपणें म्हटलें, " मी चोरी कशी करीन? मला शेठजींनीं शरीर कमावण्याकरितां पचवीस रुपये दिले होते,

त्यांतला मी माझा फक्त एक रुपया घेतला! त्याच पैशानें मी तालीम स्थापली!"

"वा! घरींच चोरी केलीस! अग ए! हा बघ कार्टा काय म्हणतो तें! यानेच रुपया चोरला! चागला दिवटा निघाला पोरटा!"

"बापू!" मी आवेशाने म्हटलें. "मी चोर नाहीं. माझा रुपया मी घेतला. ही चोरी कसली? का ग आई, मी तुला चोर वाटतो?"

मी बापूच्या तोंडास तोंड कधींच देत नसे. पण मला त्यांनीं चोर म्हटलेले खपलें नाहीं. मीही माझे मारुतीखालीं पुरलेले पाच आणे गेल्यामुळे त्रासून गेलों होतों. त्यामुळें बेभानपणे जोराने बोललों.

पण माझ्या बोलण्यानें बापूचा राग भडकला! आणि त्यांनीं पुढे येऊन मला दोन कानशिलांत अशा जोराने भडकाविल्या कीं, मी झीट येऊन खालींच पडलो!

गजा! गजा! म्हणून आई धावत आली. तिने माझें मस्तक मांडीवर घेतलें ती आपला प्रेमळ हात माझ्या कानशिलावर हळूवारपणें फिरवू लागली. मी डोळे मिटले होते. कानशीलांतील आग मस्तकापर्यंत पोचली होती. मला वेदना होत होत्या. आईनें माझ्या तोंडात पाणी घातलें. जरा बरें वाटून मी थोडसे डोळे उघडले. आईच्या डोळ्यातून सारख्या अश्रूधारा वाहात होत्या. बापूही गजू, गजू, अशा मृदु शब्दांत हाका मारीत होते. मी आईच्या केविलवाण्या तोंडाकडे पाहू लागलो. आईचे अश्रु पाहून मलाही रडू आवरेना. माझ्या लालीलाल झालेल्या गालावर तिचा मृदु हात फिरत होताच. तेथे तिचे अश्रूही ठिबकत असल्यामुळें माझी आई जणूं ते अमृतबिंदु माझ्या गालावर चोळीत आहे, असे मला वाटत होतें!

मी रुद्ध स्वरांत आईला म्हटले, "आई! मी चोरी केली का ग? ते माझे पैसे होते ना? बापू मला चोर म्हणतात, तूं मला तसंच म्हणणार का? बोल! बोल आई?"

आईचा कंठ अधिकच भरुन आला. तिच्या तोंडांतून शब्द बाहेर पडेना. त्या मिणमिण्या दिव्याच्या उजेडात तिच्या मुखावरील भावनांचा

कल्लोळ मला चांगलासा दिसत नव्हता. तथापि माझ्या पुनः पुनः विचारण्यावरून आई हळुवार स्वरात बोलली,

" गजू! तुझ्या समजुतीनें तूं कांहीं चोरी केली नाहींस. त्या भल्या माणसानें ते रुपये तुलाच दिलेले होते. पण ते तूं मजजवळ ठेविले होतेस. मला विचारल्याशिवाय त्यातला एक रुपया तूं घेतलास. नकळत असा तुझा अपराध झाला ना? पण माझा गजू जाणून बुजून कधींही चोरी करणार नाहीं. गजू, समजलें ना तुला?"

इतके बोलून आईनें मला पोटाशीं घट्ट आवळून धरलें. माझें दुःख मी विसरलो. आईच्या बोलण्यातील मर्म मीं जाणलें आणि तिच्या मांडीवर मी शांत मनानें डोळे मिटून पडलों.

आई मनाचे श्लोक हळू हळू म्हणूं लागली. बापूंची रामरक्षा गहिंवरलेल्या आवाजात चालली होती. नंतर त्यांनीं माझ्या कपाळीं रामरक्षेचा आंगारा लाविला आणि थरथरत असलेला उजवा हात माझ्या मस्तकावर कांहीं वेळ ठेविला.

माझें मस्तक शांत झालें आणि मला डोळा लागूं लागला.

*　　　*　　　*

ती मध्यरात्रीची वेळ असावी. माजघरात मी गादीवर निजलेला होतों. मी कांहींसा जागा झालों. एका कोपऱ्यात समई शांतपणें तेवत होती. आई व बापू जागेच होते. ते हळूहळू बोलत होते. माझें लक्ष साहजीकच त्यांच्या बोलण्याकडे वेधलें.

" माझा गजू अगदीं प्रामाणिक आहे." आई म्हणत होती. "मींच ते त्याचे पैसे खर्च केले, हा माझाच अपराध! त्यानं जर रुपया मागितला असता, तर मीं दिलाच असता कीं!"

" तुझा हेतु मला समजला." बापू म्हणाले. " पण गजूनें तो रुपया तुला विचारून मग घ्यावयाचा नव्हता का? ती सूक्ष्म असली, तरी चोरी आहे. चोरीला शासन हें पाहिजेच. अशा अपराधाकडे बालपणीं काणा-डोळा करिता कामा नये. आता माझेंही मस्तक भणाणलेलें होतें, हेंही खरें.

चापट्या जोरानें बसल्या. पण चोरीचें पातक पंचमहापातकांपैकीं आहे. वेळेवर कडक शिक्षा झाली, म्हणजेच मनाला पक्का धडा मिळतो."

गोष्ट सांगण्याच्या तन्मयतेंत माझें कोणाकडे विशेष लक्ष गेलेलें नव्हतें. नंतर थोडा वेळ थांबून मीं सुलभाकडे पाहिले. नंतर तिच्या आईकडे माझी नजर गेली. दोघींचे डोळे डबडबलेले होते. इतक्यांत शिवानंद बोलला,

"भाऊ, प्राचीन काळीं चोरीच्या अपराधाला कडक शिक्षा असे. महाभारतांतील शांतिपर्वात चोरीच्या क्षुल्लक अपराधाबद्दल हातच तोडल्याची कथा आहे."

"थोडक्यांत सांगतोस का ?" सदानंद म्हणाला. "प्राचीन काळीं ग्रीक व रोमन राज्यांत चोरीला अशाच कडक शिक्षा असत. महाभारतातील गोष्टी तशाच प्राचीन आहेत."

"सांग रे शिवा गोष्ट ती !" सुलभा म्हणाली, "पण आता डोळे चुरचुरू लागतील. उशीर लावू नकोस."

"थोडक्यात अशी गोष्ट आहे ती !" शिवानंद बोलू लागला, "शंख व लिखित असे दोघे बंधू होते. ते ब्राह्मण फार मोठे तपस्वी होते. दोघांचे आश्रम वेगवेगळे होते.

एकदां लिखित शंखाच्या आश्रमांत कांहीं कामाकरिता गेला. शंख आश्रमांत नव्हता. त्याच्या आश्रमातील वृक्षाना गोड फळे लटकलेलीं होतीं. तीं पाहाताच लिखिताच्या तोंडास पाणी सुटले. त्यानें फळे तोडून तीं तो खाऊं लागला ! इतक्यात शंख तेथें आला.

"माझीं फळे तू चोरलीस, त्याबद्दल तुला शिक्षा मिळाली पाहिजे. तूं ताबडतोब राजाकडे जा." असे शंखाने म्हटले.

लिखित राजाकडे गेला. त्याने आपला अपराध राजाला कथन केला. राजा या क्षुल्लक अपराधाबद्दल शिक्षा करीना. पण लिखिताने शिक्षा कर, नाहींतर शाप देईन, असें सांगितल्यामुळे राजानें चोरीबद्दल हात तोडण्याची त्याला शिक्षा दिली.

तोडलेला हात दाखविण्याकरितां लिखित बंधूकडे आला. तेव्हां त्याचा बंधु शंख गहिंवरला. तोही तेजस्वी तपस्वी होता. त्याने सांगितले कीं आतां

तुझ्या पापाची निष्कृति झाली. नंतर त्याच्या आग्रहाच्या सागण्यावरून लिखित नदीवर देव व पितर याचें तर्पण करण्यास गेला. त्याने नदींत बुडी मारली व तर्पण करण्याकरितां तो प्रवृत्त होणार, तोंच त्याला आपल्याला हात असल्याचें दिसलें. बंधूच्या तप.सामर्थ्याचा हा प्रभाव आहे, हें लिखिताला पटलें. तेव्हांपासून त्या नदीस लोक बाहुदा नदी असें म्हणू लागले."

शिवानदाची गोष्ट संपली. तेव्हां उठता उठता सुलभा आईला म्हणाली, " आई, मी मागें नैवेद्याचा पेढा तुला न विचारता खाल्ला. तेव्हां तूंही मला चापटी दिली होतीस नाहीं ? तुझें करणे बरोबर होतें तर ! आतां माझ्या मनांत तसली गोष्ट करण्याचें कधींच येत नाहीं ! "

सगळेजण हसू लागले. त्यावेळीं सदानंद म्हणाला, " आजोबानीं भाऊंना शिक्षा दिली. तशी तुला आईनें दिली. आजोबाच्या तोडीची तुझी आई झाली नाहीं का ? "

सुलभा म्हणाली, " तुझं आपलं काहीं तरीच सदा ! आजोबासारखा कडक हात काहीं आईचा नव्हता. "

मीं म्हटलें " चला उठा आतां; उद्यां यापेक्षां निराळ्या प्रकारची गमतीची गोष्ट तुम्हाला सांगेन. "

———

प्रकरण चौदावे

आज धनत्रयोदशी दिवाळी होती. दुसरे दिवशीं दिवाळी असल्यानें सकाळ-पासून फराळाचे जिन्नस तयार करण्याची धादल घरांत चालू होती. "काळा-बाजार करून साखरेचा कण देखील आणणार नाहीं," असें मीं सांगितल्यामुळें सुलभाची नाराजी माझ्यावर झाली होती, पण "तिकडचा स्वभाव न्यायी व निर्भीड आहे, तूं उगाच त्याना आग्रह करूं नकोस, जन्मभर मी हें असें पाहातें आहें. गुळाचे जिन्नस कांहीं थोडे थोडके होत नाहींत का ? गोरगरिबांची दैना पाहा, त्यांना पोटभर अन्न देखील मिळत नाहीं, ते लोक दिवाळी कशी साजरी करणार ? "

असें माझ्या पत्नीने सुलभाला सांगितल्यामुळें तिची कुरकूर बंद पडली होती.

रात्रीं गच्चीवर आम्ही जमलों, त्यावेळीं या गोष्टीची चर्चा पुन्हा होऊं नये, या हेतूनें मी ताबडतोब माझी गोष्ट सांगण्यासच सुरवात केली. मी म्हणालों—

" इ. स. १८९८ सालचा दुष्काळ आम्हांला फार कठीण गेला. पण आमच्या गावच्या कुलकर्णी, इंगळे, खरे इत्यादींना ही सोन्याची संधि लाभली. त्यानीं आपलीं जुनीं धान्याचीं पेवें उपसलीं. त्यातला बुरसटलेला व वास मारीत असलेला दाणा त्यांनीं भलत्या भावानें विकला आणि आपल्या घरचीं बायकामुलें सोन्याच्या लगडीनीं सजविलीं !

सरकारनें काढलेल्या दुष्काळी कामावर शेतकरी गेले ! जनावरांना वैरण नसल्यानें त्याची कसाईखान्याकडे रवानगी होऊं लागली ! पाण्याच्या

दुर्भिक्षामुळें रात्रीचा दिवस करून लोकांना लांब लांबच्या विहिरींतून नरोटीनें पाणी भरून आणावें लागलें ! कुचक्या धान्याच्या आहारामुळें रोगराईला मात्र रान मोकळें झाले !

आमच्या ताईच्या घरची थोडीबहुत मदत आम्हांला होत असे. शंभूला तिनें आपल्या घरींच ठेवून घेतले होतें. बापू नेहमीं परगांवीं जात असत व जे काय मिळेल ते महिन्या दोन महिन्यानीं घेऊन येत असत. त्याच्या पुराणाच्या व्यवसायाला आतां प्राप्ति फार बेताची होत असे. ते घरीं आले, म्हणजे थोडे दिवस दिवाळीसारखी आमच्या घरीं चगळ होई. पण ते परगांवीं गेले कीं, आम्हाला कित्येक वेळां उपाशी राहाण्याची पाळी येई !

आमची आई गोरगरिबांना साधारणपणें जुजबीं औषधे मोफत देत असे. पण आता औषधांकरितां लागणारे जिन्नस पैशाशिवाय मिळेतात. त्यामुळे औषधांचा उपयोग करणारे गोरगरीब पसाकुडता देतील, ते घेण्याची लाचारी तिला पत्करावी लागली ! त्यांतूनच जे कांहीं मूठभर उरे, त्यावर आम्हांला गुजराण करण्याची कष्ट दशा प्राप्त झाली !

पुढच्या वर्षीं ही स्थिति थोडी पालटली. आमच्या तिकडे थोडा पाऊस पडला. सरकारनेंही लोकांना पाणी पिण्याकरितां विहीरी व हेळ काढून दिले, त्यामुळे आमच्या घरच्या आडावरची गर्दी कमी झाली.

आमच्या घरचे परडें बदिस्त असून तें बरेच मोठें होते. त्याचा उपयोग करून आपण स्वावलबी व्हावें, अशी कल्पना आईच्या डोक्यांत शिरली. वाडीची शेती पाहून मलाही शेतीची आवड उत्पन्न झाली होती बाबू मोरे, याची मदत आम्हांला मिळण्यासारखी होती. बाबू माझ्यापेक्षां दोन तीन वर्षांनीं वडील असल्यामुळें तो त्या वयांत शेतींत मुरब्बी झाला होता !

आम्ही आमच्या परडयांतील आणि घरासभोवतालची मोकळी जागा बाबूच्या मदतीनें रात्रीचा दिवस करून खणली. शेतकऱ्यांच्या बायकाप्रमाणें आई निरलसपणें आमच्या बरोबर काम करी. तिच्या मदतीस मधून मधून गजाई ही येत असे. तिच्या नाजूक हाताला फोड आले; हात पाय दुखू लागले; तरी तिनें चिकाटी सोडली नाहीं. तिच्या हसत मुख चेहरा पाहून

आम्हांलाही काम करण्याचा हुरूप चढे. गाईच्या दुधांतील छोटीशी चांदकी, तीवर आमच्या आडातील गोड पाण्याचे घोट, आमच्या पोटांत जाऊन पडले, म्हणजे आम्हांला ब्रह्मानंदासारखे समाधान वाटे !

जमीन तयार झाल्यावर तींत आम्ही राजगिरा पेरला. मका टोंकला, आणि कांहीं आळीं घातलीं. आडाचे पाणी रात्रीं ओढून आम्ही आमच्या पिकास घालीत असू थोडा पाऊस झाल्यानतर उरलेल्या भागांत भुईमूग व बाजरीही आम्हीं पेरली.

आमच्या घरच्या गाईच्या शेणाचें खत; आम्ही खणून खणून जमिनीस आणलेली मृदुता, आमच्या श्रमाने त्या जमिनीस मिळालेले गोड पाणी; आणि आमची आई व गजाई यानीं केलेली पिकाची जपणूक; यांमुळे धरणीमाता आमच्यावर प्रसन्न झाली. तुरे आलेला भरदार मका आणि लांबच लांब लोंब्या आलेला राजगिरा पाहून शेतकरी म्हणू लागले—

" आनंदीकाकूच्या हातात अमृत हाय! म्हणून असा मका नि राजगिरा पिकतुया ! "

बापूनीं आणलेले तुटपुंजे धान्य आणि आमच्या घरचा भाजीपाला यांवर आम्ही दिवस कंठित होतो. पण आमच्या दुर्दैवाला ही गोष्ट पाहवली नाहीं !

एके दिवशीं आमच्या घरीं नाना खरे आले त्यावेळीं ते पन्नाशी उलटलेले होते. ते आगापिंडाने सुदृढ, गौरवर्णी होते. त्याचा चेहरा पण गोल होता. त्याचा एक हेरगिरी करणारा चकणा डोळा मात्र नकळत त्यांचा कावेबाजपणा उघड करीत होता !

त्या दिवशीं त्यांच्या आंगावर रेशमी काठी उपरणे होते. आमच्या सोप्याच्या पायऱ्या चढत चढत ते " आनंदी ! आनंदी ! " अशा हाका मारू लागले. आई दिसताच ते म्हणाले—

" बापू बऱ्याच दिवसांत दिसला नाहीं, तो कोठे गेलाय बरे ? "

इतक्यांत मी सोप्यांत बैठक घातली व म्हटलें, " नानासाहेब, आपण बसावें येथें. "

" गजू ! तूं उनाड आहेस, असें आम्ही ऐकत होतों " नाना खरे बोलूं लागले. " पण चागला सुशील आहेस कीं ! आनंदीबाईचा पुत्र आनंदीच असावयाचा ! "

नतर चकण्या नजरेने त्यानीं आईकडे पाहिलें.

" नाना ! " आई, उंबरठ्याच्या आत उभी राहून म्हणाली, " गरिबाच्या मुलाला कोणी काहीं म्हटले, तरी आपण आपलेपणानें गजूला बोलणारच. शेजारधर्म असाच असतो कीं ! "

" मी काहीं उगीच गजाची वाखाणणी करीत नाहीं. " नाना म्हणाले. " तो शाळेंतील सर्वांत हुशार मुलगा आहे. मी पच आहे ना शाळेचा ? सला सगळे माहीत आहे. अलीकडे बापू दिसला नाहीं, म्हणून त्याच्या घरची विचारपूस करावी, असे वाटले मला ! "

" त्याना परगावीं जाऊन बरेच दिवस झाले. " आई म्हणाली. " येतील लवकरच ! वाईट काळ आलाय आम्हाला ! काहीं तरी हातपाय हलविले पाहिजेत ना ? "

" होय, तेही खरंच ! " नाना खरे म्हणाले. " पण तुम्हीही काय कमी खटपटी आहांत ? मोकळ्या जागीं मळा लावलात, काय पीक आलंय हें ! काल तुम्ही पाठविलेली काकडी किती रुचकर होती, म्हणून सागूं ? तुमच्या घरचा भाजीपाला आमच्या तिला फार आवडतो."

" मीं काय केलंय ? " आई म्हणाली, " सारे श्रम गजूचे व त्याच्या शाळेंतील बाळगोपाळाचे. काय करायचं नाना ! भाजीपालाही गरिबांना जगवितो. गजू मोठा झाल्यावर येईल चागला काळ ! "

" आमची ती म्हणत होती, तेंच खरें " नाना खरे डोळ्याची उघडझाप करीत बोलले. " तीच इकडे येणार होती. पण म्हटलें मीच जातों. आतां तिलाही घरचें काम आवरत नाहीं. स्वयंपाकाला तिला कोणाची तरी मदत पाहिजे आहे. शेजारधर्म आपला आहे ना ? तिनेंच म्हटलें मला ! आनदीकाकूंना बोलवा. घरच्याच आहेत त्या ! दोन तुकडे भाजतील नि जेऊन जातील. त्यांचेही हाल चालले आहेत. होईल मदत त्यांनाही ! "

आई कांहीं तरी उत्तर देणार होती, इतक्यांत मींच उतावीळपणें म्हटलें, " नाना ! आमच्या आईला स्वयपाक करायला बोलावता तर ? पण मी साफ सागतों, आमची आई कोणा श्रीमताच्या घरीं पोटाकरितां असलें काम कधींच करणार नाहीं ! "

नानानीं माझ्याकडे डोळे वटारून पाहिलें त्यांना माझ्या बोलण्याचा फार राग आला, असे दिसले. इतक्यांत मीं आईसच म्हटलें, " आई ! आपण घरीं काय वाटेल तसें करू, पण असले काम उपकाराच्या सोंगांत मी तुला करू देणार नाहीं, बर ! "

माझे हे कठोर शब्द ऐकताच नानाची चुळबूळ सुरू झाली. इतक्यांत बाबू मोरे याने मला हाक मारली. मी धावतच त्याच्याकडे गेलों.

यानतर नानाना आईने काय सागितलें, हें मला कळलें नाहीं. पण आई मात्र त्याच्याकडे स्वयंपाकाला गेली नाहीं, एवढें खरें.

पुढें आठ दहा दिवसानतरची गोष्ट. तो दिवस रविवारचा होता. माझे चुलते अण्णा एकाएकी घरीं आले.

ते आपले ताबूस डोळे गरगर फिरवीत आवारांतील सर्व भाग न्याहाळीत होते ! त्यांनीं वेलींच्या काकडया, दोडके, पडवळे स्वत: काढलीं आणि मक्याचीं कणसेही भराभर काढून ते पोत्यात भरू लागले !

मी त्यावेळीं आघोळ करून पूजा करीत होतों. आई स्वयपाकाच्या तयारीस लागली होती.

मी तसाच हातांत भाडें घेऊन उठलों आणि म्हटलें, " तात्या काका ! मका मी लावला आहे. वेल आईनें जोपासले आहेत. ज्याचे श्रम झाले, त्याना विचारून तरी जिन्नस काढा. "

इतक्यांत आईनें मला दाबलें व ती म्हणाली, " चुलते वडिलांसारखे आहेत गजू ! वडील माणसानीं काहींही केलें, तरी असे बोलूं नये आपण ! बरें, जा. पूजा कर. देव " **ठेवील तैसें राहावें** " हें लक्षांत ठेव. "

त्यावेळीं अण्णा म्हणाले, " मी कांहीं कोणी चोर नाहीं. निम्म्या हिश्शाचा मालक आहे. नानांना मी पांच रुपयाला मका विकला आहे.

त्यांनीं लिहिलें म्हणून मला तरी कळलें ! नाहींतर, तुम्ही खातच होता कीं ! शेतींत कर्ज करून ठेविलें, म्हणून शेती सावकाराच्या ताब्यांत गेली. पण परसात पीक झालें, त्यात हिस्सा नाहीं, असें हें पोर म्हणतें. त्याला काय कळतय ! घरची शिकवणच अशी ही ! ”

त्यांचा शेवटचा टोमणा आईला उद्देशून होता, मी आईच्या तोंडाकडे पाहिलें, तिच्या डोळ्यांतून खळकन् अश्रु ओघळले.

अण्णांनीं खरोखरच नानाना कणसें विकलीं होतीं ! इतक्यात आपल्या गड्याला घेऊन तीं नेण्याकरिता नाना खरे तेथे आले त्यांचे मिश्किल हसणें पाहून आईच्या कपाळाला कधीं नव्हत पडलेल्या आठ्या माझ्या नजरेस आल्या ! पण लगेच पदर तोंडावरून फिरवून ती म्हणाली,

“ गजू ! भाऊजींना सांग. आघोळ करून घ्या. तोंपर्यंत स्वयपाक होत आहे. जेवल्यानतरच कुठ बाहेर जायच असेल, तर जातां येईल. ”

तावडतोब नाना म्हणाले, “ आज अण्णा आमच्याकडे उतरले आहेत. ते तिकडेच जेवतील. घरात बापू नाहींत आमचे घर नि बापूचे घर दोन कां आहेत ? आणि आनदी ! घरातली स्थिति मला माहीत आहेच कीं ! तुम्ही देखील या ना तिकडेच ! ”

आईच्या स्वाभिमानाला घेतलेला तो जहरी दश होता, तरी सारा राग गिळून ती मृदु स्वरात बोलली,

“ घरचा भाजीपालाच अमृतासारखा गोड लागतो. परक्या घरचीं लाचारीचीं पक्वान्ने मला तर कडू कारल्यासारखीं वाटतात ! हा आपला एखाद्याचा देहस्वभाव समजा, नानासाहेब ! ”

नानानीं तोंड वाकडे केलें. आण्णाचाही चेहरा उतरला. काहीं न बोलतांच त्यांनीं उंबरठा ओलांडला. या वेळीं बापूनीं शिकविलेले एक सुभाषित मला आठवलें व तें मी म्हटलें—

दुर्जनः प्रियवादीच नैतद्विश्वासकारणम् ।

एवढें म्हणताच आई मला म्हणाली, “ गजू ! दुसऱ्याला नावें ठेवून आपलंच मन दोषी होत. आपलं मन पवित्र असावं. मग कोणी कसंही

वागो! आज भाऊजींना नाना बरे वाटतात. त्यांनीं मला स्वयंपाकाला बोलावलं, मी गेलें नाहीं. नानांनींच भाऊजींना पत्र घातलं. भाऊजी आले. त्याचा भाग त्यांनीं नेला. झालं तें बरंच झालं नाहीं का? प्रसंगाप्रसंगानं माणसं समजतात. तीं समजून घ्यावीं व सावधपणान वागावं. पण त्याचा द्वेष करूं नये. कारण, आपल्याच मनांत द्वेषाचा दोष घर करून राहातो!"

"आईच्या या थोर बोलाची योग्य थोरवी मला त्या वयांत चांगलीशी कळली नव्हती. पण मोठेपणीं हेच बोल मला फार कल्याणप्रद झाले."

एवढे सांगून मी गोष्ट संपविली. त्यावेळीं सुलभा म्हणाली, "सदा, शिवा, तुम्हीच या गोष्टींतून बोध घ्यायचा आहे बरं का?"

पण सुलभाची आई लगेच बोलली, "आताच्या हिंदुकोड बिलानं तूं देखील भाऊबदकींत वाटेकरी होशील कीं?"

"मी आपली माझ्या भाऊच्या आईचा—माझ्या आजीचा उपदेश जन्मभर पाळीन कीं!" सुलभाने चटकन उत्तर दिलें.

— —

## प्रकरण पंधरावें

दिवाळीच्या दिवशीं गोड गोड पदार्थ सगळ्यांच्या पोटांत गेले होते. सर्वांनाच थोडी जाडयता प्राप्त झाली होती. त्यामुळें मजेंत खेळ खेळून हास्यविनोदात ती रात्र घालविण्याचा आमच्या घरीं बेत टरला होता. सुलभाच्या आग्रहामुळें माझ्या गोष्टीला सुट्टी मात्र मिळेना. पण सारेजण जमण्यास वेळ लागला. त्यांतले त्यात सुलभाच्या आईनें उशीर केला ती आल्याबरोबर सुलभा म्हणाली,

" भाऊ ! आज गमतीची गोष्ट सागितली पाहिजे हं ! "

" हो ! " मीं म्हटले, " सांगतो बरें ! माझ्या साऱ्या गोष्टी गमतीच्याच नव्हेत का ? लहानपणचे अनुभव आठवले म्हणजे मोठेपणी मजाच वाटतें कीं ! उद्यांपासून मात्र नवाचा ठोका पडला कीं, गोष्ट सुरू होईल. मग कोणी येवो वा न येवो ! "

" मग काय आभाळांतील चांदण्या गोष्ट ऐकत बसणार ? " सुलभाची आई हळूच बोलली. तो मलाच सौम्यसा टोमणा होता, त्यामुळें सारीं मुलें हसलीं. मी पण चांगलाच हसलों. नंतर गोष्ट सांगण्यास सुरवात केली. मी म्हटलें——

" आमच्या लहानपणीं आम्हांला व्यवहारज्ञान कमीच असे. अगोदर गांव सोडून जाण्याचा प्रसग फार क्वचित् येई. पत्र लिहिण्याचीही माहिती होत नसे. कारण, आतांप्रमाणें पत्रव्यवहार त्यावेळीं फारसा होत नसे.

सहाव्या इयत्तेंत गेल्याबरोबर मी पहिलें पत्र पाठविलें, त्याचीच आजची माझी गोष्ट आहे.

आमच्या गांवच पोष्ट शाळेच्या मुख्य शिक्षकांकडे होतें. सकाळची शाळा सुटली कीं, ते टपालाची थैली फोडीत. तेथेच गांवचे ठराविक लोक जमत गांवांतली दुसऱ्यांचीं पत्रेही ते लोक वाचीत ! पोस्टाची थैली घेऊन येणारा रनरच गांवातील पत्रें वाटण्याचें काम करी. तो ओळखीच्या माणसांजवळ हीं पत्रे देऊन बटवडा उरकी. आमच्या तीन हजार वस्तीच्या गांवीं दररोज फार तर दहा बारा पत्रे येत जात असत ! अशी आमच्या गांवची त्यावेळची टपालाची व्यवस्था होती !

बाहेर गांवचीं, त्यांतले त्यांत पुण्या मुबईचीं पत्रें आमच्या गांवीं कशीं येतात, याचेंही कोडें मला उलगडत नसे !

एकादा पुण्यामुबईकडील पाहुणा आमच्या गावीं येई. असा पाहुणा खरे किंवा इंगळे याच्या घरीं येत असे बाळू खरे आपल्या घरीं आलेल्या पाहुण्यांनीं मारलेल्या गप्पा आम्हाला तिखटमीठ लावून सांगत असे. आम्ही शाळेतील मुले त्या गोष्टी अत्यंत उत्सुकतेने ऐकत असू कारण त्या गोष्टी आम्हांला अद्‌भुतरम्य अशाच वाटत.

एकदां बाळू खऱ्याच्या घरीं मुंबईचे दोन तीन पाहुणे आले, ते सुटां-बुटांत होते. ते मोठे साहेब असावेत, असें आम्हाला वाटले. त्यांनीं बरोबर वर्तमानपत्रें आणलीं होतीं. तीं इंग्रजी होतीं. तीं वर्तमानपत्रें भडाभड ते वाचीत असत. त्याचे तें इंग्रजी ज्ञान पाहून आम्हाला फार आश्चर्य वाटत असे !

पण त्याचवेळीं एक अद्‌भुत वार्ता आम्हाला बाळू खरे यानें सांगितली. पुण्यामुबईच्या पाहुण्यांकडून ती हकीकत कळली, असेंही तो म्हणाला. ती माहिती अशी—“ पुण्यास एक नामदार टिळक म्हणून फार बलाढ्य माणूस आहे. तो गोऱ्या इंग्रज सरकाराबरोबर लढतो ! त्याला दुष्ट सरकारनें कैदेत टाकलें पण तुरुंग फोडून तो बाहेर पडला ! सरकार त्याला फार भितें ”

पुन्हां एकदां बाळू खरे आम्हांला म्हणाला, “ आमच्या पाहुण्यांनीं टिळकांना पाहिलें आहे ते डोकीस तांबडी पगडी आणि आंगांत लांबट

आगरखा घालतात. ते बोलतात तेव्हा सरकार थरथर कापते! ते वाटेल ते करतील, अशी त्याना शक्ति आहे!"

मी म्हटलें, "बाळू, एवढा मोठा माणूस फार श्रीमत असेल, नाहीं? केवढा रे श्रीमत आहे तो?"

बाळू म्हणाला, "पैशाला रे काय कमी त्याना? ते सरदाराच्या वाड्यात राहातात! आमचे नाना सागत होते मला कीं, त्याना मुले फार आवडतात. ते आमचे नात्याचे पण आहेत. मी आता त्याच्याकडे जाऊन इंग्रजी शिकणार!"

मी बाळूला म्हटले, "बाळू, मला नेशील का रे पुण्याला? मीही तुझ्याबरोबर येईन. टिळकाची वाटेल ती कामे मी करीन!"

बाळू म्हणाला, "मी नानाना सागतो. पत्र पाठवून विचारतील ते त्याना. पण काय रे गजा, मी आता रेशीमकाठीं धोतरें नेसू लागलो आहे. मग ती स्वच्छ नकोत का ठेवायला? तुला काय लंगोटी चालते. पण मला धोतरे नेसलीं पाहिजेत. त्याच्या घरीं फार मोठे लोक येणार जाणार! तेव्हा मला तेथें शोभेस वागले पाहिजे. गजा! मजबरोबर आलास, तर माझीं धोतरे अगदीं स्वच्छ स्वच्छ धुशील का तूं?"

मी धोतरे धुवावीं, असे बाळूनें म्हटले. त्यामुळें माझें मस्तक भणाणलें. मी त्याच्याकडे अत्यत क्रुद्ध नजरेनें पाहिलें. तोही थोडा चपापला. त्यावेळीं माझ्या मनात एकदम एक विचार स्फुरला. त्याच्या पूर्ततेसाठीं मीं ताबडतोब सुरवात केली. 'सहसा विदधीत न क्रियां' हें वाक्य मजकडून बापूंनीं पाठ करवून घेतलें होते. पण त्याचा अर्थ नीट मला कळलेला नव्हता.

मी घरीं जातांच सुंदर मोडी अक्षरांत टिळकांनाच एक पत्र लिहिलें. त्यांत मीं लिहिलें होते कीं—"आपण सरकारला फार भारी आहात. बाळू खरे तुमच्याकडे येणार आहे. मी त्याच्या बरोबर येतों. मी तुमचीं वाटेल तीं कामें करीन. सागाल त्यावर हल्ला चढवीन. मला मोठें व्हावयाचें आहे. माझ्या घरची फार गरिबी आहे. मी पुण्यास इंग्रजी शिकेन..."

इत्यादि मजकूर मी घाईघाईनेंच लिहिला. कागदाचेंच एक पाकिट बनविले. बामळीच्या डिंकाने तें मी चिकटविले. त्यावर बाळूकडून ऐकलेला मनात आला तो पत्ता खरडला! आणि ते पत्र पोस्टाच्या पेटींत टाकूनही आलो. नतर मला थोडेसे समाधान वाटले.

बाळू खऱ्याचीं धोतरे मी बडविणार नाहीं. टिळक मोठे आहेत, त्यांचीं वाटेल तीं कामें करीन. मला टिळक उत्तर पाठवितील व बाळूबरोबरच पुण्यास जाईन, अशा ताठ्यातच मी काहीं दिवस होतों!"

इतक्यात शिवा बोलला, "भाऊ आता शाळेंत पत्रें लिहावयास शिकवितात. कितीतरी व्यावहारिक माहिती देतात. सहली काढतात. नवीं नवीं ठिकाणे दाखवितात. तुमच्या वेळेला तसे काहीं नव्हतें, असें दिसतें. मग शाळेत शिकत तरी काय होता?"

"आम्ही काय शिकत होतो?" मी आवेशानें म्हटलें. "सर्व कांहीं शिकत होतों. ओकांचा छोटा इतिहास आमचा पाठ होता. पटवर्धनाचीं भूगोलाचीं छोटीं पुस्तकें व त्यातील नद्याचीं, पर्वताचीं, भूशिराचीं, बेटाचीं इत्यादि सर्व प्रकारचीं नावें मला आजही आठवतात. मोडी अक्षर तास दीड तास गिरवणें हा आमचा लेखनाचा अभ्यास होता!

पत्र कसें लिहावें, हे काहीं आम्हाला कोणी शिकवीत नव्हतें. पत्रावर पत्ता कसा लिहावा, याचेही धडे आमच्या पुस्तकात नव्हते. त्यामुळें टिळकाना पत्र लिहिताना माझी भयकर त्रेधा उडाली. पण माझें मनच हट्टास पेटल्यानें मीं त्याना पत्र लिहिलें व त्याचेकडील उत्तराची वाट पाहात बसलों!

सुमारें पंधरा दिवस झाले, तरी पत्राचे उत्तर येईना. मी अगदीं अधीर होऊन गेलों. बेचैनही झालों! इतक्यात एक दिवस फार मोठा चमत्कार घडून आला. आमचे गुरुजी म्हणाले, "गजू तुझ्या नांवाचें पत्र आहे. पण त्याला दोन आणे दिले पाहिजेत!"

पत्र आलें, तें टिळकाचेंच असलें पाहिजे. असा माझा कयास होता. पण पत्र रनर वाटीत असतो, तो कांहीं पैसे मागत नाहीं. गुरुजी मात्र दोन आणे मागतात, याचा अर्थ काय, हें मला समजेना. मी पुष्कळ डोकें

खाजविलें, पण त्या बथ्थड डोक्यात प्रकाश पडेना. बाळू खऱ्याला चकित करून टाकण्याचा माझा बेत होता, त्यामुळें त्याचा सल्ला मला विचारतां येईना.

पण दोन आण्याचे पैसे कोठून आणावे, या विवंचनेत माझी सगळी दुपार गेली. शेवटीं हिय्या करून सध्याकाळीं आईजवळ सगळी हकीकत सांगून मी दोन आण्यांची मागणी केली. त्यावेळीं आई म्हणाली,

" गजू ! पत्र नॉटपेड असेल ते ! कोण बरें तुला पत्र पाठविणार ? कांहीं का असेना, मी तुला उद्यां पैसे देते. तू पत्र घेऊन ये. मला काळजी लागली आहे. त्यांना गांवीं जाऊन बरेच दिवस झाले, त्याचें तर पत्र नसेल ना ? "

मी दोन आणे घेतले आणि दुसरे दिवशीं ते गुरुजींना दिले. त्यानी तें पाकीट माझ्या हातीं दिलें ! मी ते फोडले. आणि काय आश्चर्य सागावें ? माझेच पत्र त्यांत होते ! मी टिळकाना पाठविलेलें पत्र पत्ता चुकीचा आहे, असा शेरा मारून तें परत आले होते !

माझा चेहरा कावराबावरा झालेला पाहून गुरुजींनीं मला गोड शब्दांत सहानुभूति दाखविली. व ते म्हणाले,

" नॉटपेड पत्र आहे. ते परत आलेले पत्र आहे. तूच का कोणाला तें लिहिलें होतेंस ? "

माझ्या डोळयात पाणी आले. कंठ दाटून आलेल्या स्थितींत मीं म्हटले, " गुरुजी, माझें काहीं तरी चुकलें खरें ! मींच लिहिलेलें पत्र परत आलें ! मीं तें टिळकांना लिहिलें होतें ! "

गुरुजींनाही नवल वाटून त्यानीं तें पत्र मजकडून घेतलें. पत्र वाचीत असतां त्यांना आलेलें हसू आवरेना, शेवटीं ते म्हणाले,

" पत्राच्या आंतील भागीं 'ती. रा. रा. टिळकांना त्रिकालचरणीं मस्तक ठेवून बालकाचा शिर साष्टांग नमस्कार' असे लिहिलेंस हें ठीक. पण पाकिटावर पत्ता रे काय लिहिलास ? **टिळक सरदारांचा वाडा पुणें** या पत्त्यावर पत्र नामदार बाळ गंगाधर टिळकांना कसें पोचणार ? टिळक सरदार कोण ? वाडा कोणाचा ? पोस्टमननें पत्र फोडून तुझें नांव गांव पाहून तें परत

पाठविले. पोस्टाच्या नियमाप्रमाणें तें बरोबर झाले. नंतर गुरुजींनीं टिळकां-संबंधीं खरी माहिती पुष्कळ सांगितली. माझी त्यांनीं बरोबर समजूत घातली.

घरीं आल्यानंतर मी आईला सगळी हकीकत सांगितली. तेव्हां ती म्हणाली,

" गजू ! दोन आणे गेले तर गेले. पण त्यामुळे तुला पुष्कळसा व्यवहार कळला. आपल्याला कळत नसेल, तर जाणत्याना विचारून माहिती घ्यावी, आणि हे पाहा गजू, आपल्या प्रयत्नाने ज्ञान मिळविलें तर ते टिकून राहाते. बायकांना पुरणाची पोळी एकदम का येते ! ती करीत करीतच साधते. बाळू खऱ्याने सांगितलेल्या माहितींतील खरें खोटे-पणा तुला तुझ्या गुरुजींच्या सागण्यामुळेंच कळला. असें ज्ञान तुला दोन आण्यानें दिले !

दुसरे दिवशीं बापूही गांवाहून आले. त्या दिवशीं ताईही माहेरीं आली होती माझ्या पत्राची ताईने थट्टा केली. बापूही मनमुराद हसले, पण माझ्या पाठीवरून हात फिरवीत ते प्रेमळपणे म्हणाले,

" वाचनाने ज्ञानवृद्धि होते. आंगीं बहुश्रुतपणा येतो. तूं पोथ्या वाचीत असतोस, त्यामुळे पुराणांतील उपदेशपर कथा तुला समजत असतात. त्या जुन्या गोष्टी आहेत. तशा नव्या गोष्टींचें ज्ञानही तुला मिळालें पाहिजे. मला एखाद्या ठिकाणीं पुराण सांगतांना मधून जुन्या कथांची सांगड नव्या गोष्टीशीं घालावी लागते. तें एक प्रकारचें लोकशिक्षण आहे. पण आमचें नवें ज्ञान तोकडे पडतें. अलीकडे मी केसरी वर्तमान वाचू लागलों आहे. पुष्कळ माहिती असते त्यांत. तुला देखील तें वाचतां येईल.

इतक्यांत आई म्हणाली, " **दिसामाजी कांहीं तरी तें लिहावें । प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें.** असें रामदास देखील म्हणतात ना ? "

ताईलाही बोलल्याशिवाय राहावेना. ती म्हणाली, " आमच्या घरीं ज्ञानप्रकाश, केसरी येतो कीं ! कोणी नियमानें वाचीत असतील तर शपथ ! बापूंनीं मला लिहावाचायला शिकविलें नाहीं, नाहीं तर मी फाडफाड वाचलें नसतें का ? "

मी म्हटलें " ताई, तुझ्या घरचा ज्ञानप्रकाश, केसरी मीच आतां वाचीन बर ! "

आईच्या व बापूच्या उपदेशाप्रमाणें मी त्या वयांत वर्तमानपत्रें वाचूं लागलों. तेव्हांपासून मला तो नादच लागला. वाचनाचीं टिपणें पुढे पुढें मी ठेवू लागलो. त्याचा उपयोग मला कितीतरी झाला आहे व होत आहे.

मदा म्हणाला, " बापू ! मग तुम्ही पुन्हा कधीं लोकमान्याना पत्र लिहिले का ? त्याना कधीं भेटला का ? "

मी म्हटले, लोकमान्यांशींच काय पण त्याच्या पिढींतील आणि आज-कालच्या जमान्यातील पुढाऱ्यांशीं माझे घनिष्ठ संबंध होते व आहेत. त्यांची माहिती सांगण्याचा प्रसंग आताचा नव्हे. जमल्यास ओघा-ओघानें पुढील आयुष्यक्रमाच्या आठवणींच्यावेळीं त्या कथा सांगेनच कीं ! "

सुलभा म्हणाली, " चला उठा आतां. भाऊंच्या पहिल्या पत्राची कथा मात्र चटकदार आहे खरी ! "

---

## प्रकरण सोळावें

संसारांत सुखाचे दिवस अत्यल्प असतात, दुःखाच्या दिवसांचे प्रमाण कल्पनातीत असते, असे कांहीं तत्त्वज्ञ म्हणत असल्याचे मी कुठेतरी वाचलें आहे. आमच्या घरीं तोच अनुभव येत होता. पण सुखदुःख हे मनाच्या विशिष्ट धारणेवर अवलंबून असते. दुःखाचा क्षण निघून गेला कीं, मागे काय घडलें, हे पाहावयाचे नाहीं. म्हणजे दुःखाची आठवण मागें टाकावयाची, असा आमच्या आईचा देहस्वभाव होता. त्यामुळें 'धैर्याचा मेरुमणी' असे कधीं कधी बापू आईला उद्देशून म्हणत असत.

दिवाळीसारख्या सणांत दुःखाच्या आठवणी कशाला काढाव्या, असा विचार करून मीच रात्रीच्या नऊच्या ठोक्याला गच्चीवर थोडे दिवस उपस्थित राहिलो नाहीं आमचे श्रोते त्यावेळीं मात्र नेमके जमत. अर्थात् माझ्या गैरहजरीची हजरी सुलभाने कडकपणें घेतली. हेही माझ्या कानांवर आल्याशिवाय राहिलें नाहीं.

तीन दिवसांनीं मी अगदीं नवाच्या ठोक्याला गच्चीवर आलों. गोष्ट सांगण्याला सुरुवात करणार, इतक्यात सुलभा म्हणाली, " भाऊ ! नियम करायचा आपणच नि तो मोडायचा स्वतः ! हा कारभार कोणत्या राज्यातला ? "

सुलभाच्या टोंचक विचारण्याला उत्तर देतांना मी म्हटले " नियमाला अपवाद असतोच. दिवाळीच्या सणांच्या दिवसात कोणा दुःखी माणसाच्या मदतीला किंवा सांत्वनाला मला जावें लागलें, तर तो अपवाद क्षम्य नाहीं का ? "

इतकें उत्तर देऊन मी माझी कहाणी सांगण्यास आरंभ केला. मी म्हटलें, दुष्काळाचा तडाखा अद्यापि आमच्या गांवीं चाललाच होता. दावण-गिरीकडील पिवळी कुचकी ज्वारी सरकार लोकांना पुरवीत असे. पाण्याचा तुटवडा इतका कीं, कित्येक ठिकाणीं डोळ्याला पाणी लावायला मिळत नाहीं, ही म्हण सत्यसृष्टींत दिसत असे !

हा दुष्काळ आमच्या भागात पुढें तीन वर्षे कमी जास्त प्रमाणांत होता. मधून मधून थोडा पाऊस पडे, पण उपायापेक्षा केव्हा केव्हा त्यामुळें अपायच अधिक होत असे. १८९९ सालच्या पावसाळयाच्या आरंभीं पडलेल्या पावसानें ओढ्यानाल्यांना पूर आले. पाणीपुरवठा झाला. थोडे बरे दिवस येतील, असें वाटू लागलें. पण पोटात जाणाऱ्या कुचक्या धान्यामुळें आणि नव्या गढूळ पाण्यानें कॉलऱ्याची साथ सुरू झाली ! पुण्यामुंबईकडे प्लेगने कहर उडविला, तर आमच्याकडे पटकीनें थैमान घालण्यास सुरवात केली ! लोक म्हणू लागले, कलीयुगांत पाप माजलें, म्हणून महादेवानें हा संहार आरंभला आहे ! मृत्यूनें आपला जबडा चांगलाच पसरला !

पटकीनें पटापट लोक मरूं लागले. त्यावेळीं सरकारी मदत अगदीं मुंगीच्या पावलानें होत असे. खेडेगावीं औषधपाणी मिळण्याची सोय फारच कमी. आमची आई, आपल्या परीनें गोरगरिबांकडे जाऊन जुजबी औषधे देई, त्याची होईल तितकी सेवाचाकरी करी. पण हें तिचें वागणें पांढरपेशा वैद्याना पसंत पडत नसे. गोरगरिबांना नाडून त्यांच्याकडून पैसे उकळण्याच्या कामात आई व्यत्यय आणते, असेंच त्याना वाटे. प्रेताच्या अग्नीवर कणसें भाजून तीं मिटक्या मारीत खात बसण्याची ही आसुरी लालसा होती !

पण गावात चांगले विचारी लोक नव्हते, असें नव्हे. पण ते थोडे होते. ताईचें यजमान त्यापैकींच एक होत. ते वाडीचे कुळकर्णी होते. गोरगरिबाना पटकीच्या यमयातनेंतून वाचविण्याचे त्याचे प्रयत्न अव्याहत चालले होते. त्याच्या वजनामुळें वैद्यानाही आपल्या औषधाच्या बाटल्या नाखुषीनें का होईना, खुल्या कराव्या लागत असत. बाकीचा पांढरपेशा वर्ग आंग चोरून आपल्यापुरते पाहात होता. त्यांची स्वच्छ राहाणी आणि

अगोदरपासून रोगप्रतिबंधक उपायाची करून घेतलेली तजवीज, ह्यामुळें त्या वस्तीकडे पटकीनें दुर्लक्ष केलेलें दिसत होतें !

माझे मेहुणे श्रीधरपंत गोरगरिबांत हिंडून, रोग्याच्या औषधपाण्याची व्यवस्था आपलेपणानें करीत असत. साथीच्या रोगाच्या वेळीं गावकामगाराचें हे कर्तव्यच आहे, असे ते म्हणत असत. पटकीनें झपाटलेल्या क्षेत्रात फारसे वावरू नये, असें त्याच्या घरातील माणसे त्याना सांगत असत. ताईदेखील डोळ्यात पाणी आणून, त्यानीं वाडीकडे जाऊं नये असे सांगे. पण कर्तव्य केलेंच पाहिजे, त्यातच खरा पुरुषार्थ आहे, असें त्याचें म्हणणें असे. अखेरीस घडून यायचें तेंच घडलें ! "होणारें न चुकेल येइल जरी ब्रह्मा तया आडवा।" असें जें अलीकडील एका कवीने म्हटले आहे. त्याचाच रोकडा प्रत्यय आला !

श्रीधरपंत दिवसभर वाडींतील चावडींत असत. मधून मधून रोग्याची उठबस करण्याचे प्रसंगही त्याना येत. अखेरीस ह्याच संसर्ग त्याना बाधला ! पटकीने त्यानाही झपाटलें ! त्याना वाडीच्या खेडूतानीं घरीं आणून पोंचविलें. सगळ्याच्या तोंडचें पाणी पळालें !

त्याच्या सशक्त प्रकृतीवर रोगाचा जबर तडाखा बसला. आठ दहा तासात त्याना जेर करून टाकले. सारा गाव त्याना आराम पडावा, याकरिता वाटेल ते उपाय योजीत होता. माझी आई श्रीधरपंताच्या अगदीं उशाशीं बसून होती. ताईनें आपल्या सेवेची अगदीं पराकाष्ठा चालविली होती. घाण काढून पूर्ण स्वच्छता राखण्याची ती शिकस्त करीत होती. गावातील वैद्य आपल्या जवळची अप्रतिम औषधें देण्यात यत्किंचितही कसूर करीत नव्हते.

कॉलऱ्याच्या आजाराचा इतका जबर धोका असतो, त्याची मला कल्पना नव्हती. मी शून्य चित्तानें ती सगळी धावपळ पाहात होतों. आई सांगेल तें काम मी अगदीं जलदीनें करीत होतो.

असलें भयंकर संकट आपल्यावर कोसळेल, अशी शंका देखील ताईच्या मनाला शिवली नव्हती. तिच्या सुखी जीवनात विष कालविण्याकरिताच दैवानेंच ही प्राणांतिक आपत्ति धाडली होती, असेंच वाटत होतें !

माझ्या आईच्या गुणाची जिवंत प्रतिमाच माझी ताई होती. जसजशी त्या दिवशींची रात्र वेगानें पुढे सरकू लागली, तसतशी श्रीधरपतांच्या देहाची काहिली बेसुमार वाढू लागली. तरी श्रीधरपत शुद्धीत होते. ताई त्यांच्या निस्तेज नेत्रातून घळघळत येणारे अश्रू आपल्या पदराने टिपीत होती. जणू, त्यांच्या वेदना गिळून टाकण्याचे कार्य तिचा तो सौभाग्याचा पदर करीत आहे, असे वाटत होतें.! त्याचवेळीं ताई आपले मन इतके घट्ट ठेवी की, आपल्या डबडबलेल्या नेत्रातून दु खाचे कढ उतू जात आहेत, याची कल्पना आपल्या पतिराजाना मुळींच येऊ नये, म्हणून झटदिशी आपले डोळे टिपून प्रसन्नवृत्ति दाखवी! ती आपल्या पतिदेवाची शुश्रुषा करीत होता आणि त्याना धीर देत होती!

आई इकडे श्रीधरपताजवळ सचिंत बसली होती. तर तिकडे घरीं बापू पाण्याचा थेंबही तोंडात न घेतां शकरास एकसारखा रुद्राचा अभिषेक करीत होते. बापूना वाटत होतें, आपल्या हातून कधीं पापकर्म घडले नाहीं. आपण श्रीशकराची पार्थींव पूजा आतांपर्यंत एकनिष्ठेने करीत आलो आहोत म्हणून तो रुद्र आपल्याला सकटमुक्त करील!

बापू ध्यानधारणेतही वाकब होते. शभूच्या रौद्ररूपाच्या पलीकडचे त्याचें शातस्वरूप पाहाण्याचा ते यत्न करीत होते. त्या सहारकर्त्या परमेश्वराने आपले सकट निवारण करावे, म्हणून त्यानीं त्याचा धावा चालविला होता.

शेवटीं अगदीं पाहाटेची वेळ आली आमच्या पूर्वजन्मींच्या पापामुळे का म्हणा ना, बापूवर शकर प्रसन्न झाले नाहींत!

श्रीधरपतावर झडप घातलेल्या त्या आजाराचा झटका विलक्षण दारुण होता कीं, पधरा सोळा तासांत लोखडाप्रमाणे कणखर असलेल्या त्यांच्या देहाला त्या रोगानें अगदीं निर्जीव करून सोडले!

शेवटची पाहाटेची वेळ आली. बापूंच्या तपश्चर्येचा उपयोग झाला नाहीं! साऱ्यांची सेवा व पुण्याई यमराजाच्या पाशापुढे फिकी पडली! ताईच्या पातिव्रत्याच्या तेजाचाही दैवगतीपुढें इलाज चालला नाहीं! पतिराजांना

अंतकाळच्या यातना जाणवूं लागल्याचें चिन्ह दिसतांच ताईच्या डोळ्यापुढ अंधेरी आली !

तिकडे बापूनाही कसला तरी भयकर आवाज कर्णपथावर आदळत असल्याचें वाटले. तें भयानक चिन्ह आहे, हे जाणून तें तसेंच तीर्थ घेऊन सोवळ्यानेंच आपल्या जामाताच्या सनिध आले. तें तीर्थ त्यांच्या मुखांत घालून त्याच्याकडे पाहातात तोच श्रीधरपताचे डोळे पांढरे फटफटीत झाल्याचें त्याच्या नजरेस आले ! झालें ! सारेंच आटोपलें !

सारें घरच काय, पण सारा गांव शोकसागरांत बुडून गेला ! माझी ताई बेशुद्ध होऊन पडली, तिला पुढें दोन तीन दिवस शुद्धच नव्हती !

मात्र माझी आई आत्यंतिक दुःखाच्या खाईत पडली असतांही दु:खावर विवेकाचें दडपण ठेवून, पुढे जें काय करावयाचें ते करीत होती ! कसल्याही सकटकालीं तिला विलक्षण धैर्य प्राप्त होत असे. एवढा दुःखाचा डोंब भडकला असतां कर्तव्य करीत राहाण्याची बुद्धि त्यावेळीं मला आईच्या ठिकाणीं दिसली. आईचे हें उदाहरण माझ्या मनांत कायमचें वास्तव्य करून राहिलें आहे.

ह्यापेक्षां मी काय सांगावें आणि काय वर्णन करावें. तीन दिवसांनतर आई घरीं आली, त्यावेळीं तिच्या सांत्वनाकरितां जीं माणसें येत त्याना ती म्हणत असे—

जगीं सर्व सूखी असा कोण आहे ।
विचारी मना तूंचि शोधूनि पाहें ॥
मना त्वांचि रे पूर्वसंचित केलें ।
तयासारखें भोगणें प्राप्त झालें ॥

ह्यापुढें ती विशेषसें जास्त बोलतही नसे. विशेष चमत्कार असा कीं, त्यावेळीं गोरगरीब लोक मुलाबाळांच्या औषधाकरितां आले, तर ती त्यांना शांत चित्तानें औषधही देत असे !

ती नेहमी म्हणे, "कर्तव्य करण्याकरिता देवानें आपल्याला जन्म दिला आहे. दुःख आपल्या पूर्वकर्माचें फळ आहे. दुःखानें खचून जाऊन कर्तव्य सोडल्याने दुःख तरी कमी कसें होईल? आपण आपलें काम आणि योग्य ती सेवा करीत राहिलें, म्हणजेच मनाला विरंगुळा मिळून दुःख कमी कमी होत जातें."

त्यावेळची आईची ती वृत्ति पाहून एकदा बापू आईला म्हणाल्याचें मला आठवतें कीं, "तूं माझ्यासारख्या निर्धनाच्या पदरीं पडलीस, हें तुझें दुर्दैव, पण माझें हे केवढें सुदैव! कसल्याही संकटाला तोंड देण्याचें सामर्थ्य मला तुझ्यामुळें प्राप्त झाले आहे, आणि मी जगलों आहे."

त्यावर आई म्हणाली, "असलं कांहीं तरी बोलू नये बर. इकडच्याच आयुष्य आम्हांला जगवीत आहे. असच चालता चालता आहेवपणे डोळे मिटले, कीं झाल!"

त्यावेळीं बापूच्या डोळ्यांना पाणी आलें. आईचे नेत्र डबडबले होते.

एवढें सांगून मी झटकन् उठलों. माझी आजची कहाणी संपल्याचें सर्वांनीं जाणलें. मी जिन्याकडे जात असता एकदा सर्वांकडे नजर टाकली. साऱ्यांचेच डोळे ओलसर झाले होते. सुलभाच्या आईला आलेला हुंदका दाबताही येत नव्हता!

---

## प्रकरण सतरावें

नऊ वाजतां सगळेजण जमले. मी लगेच माझी कहाणी सांगण्यास आरंभ केला. सारे श्रोते उत्सुकतेनें ऐकू लागले. मी म्हणालों—

ताईच्या पतीच्या निधनानें बापूंच्या मनाला जबरदस्त धक्का बसला. वृद्धापकाळीं गावात आधार असावा, ह्या हेतूने आईच्या मनाविरुद्ध बापूंनीं श्रीधरपंताना पसंत केलें होतें. पण दुर्दैवानें बापूंच्या साऱ्या आशा धुळीस मिळाल्या !

माझ्या ताईला विधात्याने वैधव्यपंकांत रुतविलें. तिला एक पुत्र झाला होता, पण काळाला तोही पाहावला नव्हता ! आतां ताईचें पुढील आयुष्य कसें जाणार, हाच एक हृद्रोग माझ्या आईवडिलांच्या अंतःकरणात घर करून बसला. बापूंची कंबर खचली व त्यांनीं अंथरूण धरलें. आतां प्रपंचाचा सगळा भार आईवरच पडला !

किडूकमिडूक, भांडेंकुंडें हें एक एक घरांतून कमी कमी होऊं लागलें. जिन्नस गहाण ठेवणें किंवा त्याची विक्री करणें याशिवाय आईला गत्यंतरच उरलें नव्हतें. दारिद्र्याशीं टक्कर देत देत ती संसार कसाबसा रेटीत होती. बापूंच्या प्रकृतीची काळजी तिला वाहावी लागत असे. आईला होणाऱ्या यातना बापूंना स्पष्ट दिसत होत्या. पण आजारामुळें त्यांचें अंथरूण सुटत नव्हतें. आईला होणारे कष्ट पाहून एकदां ते गहिंवरून बोलले—

पूर्वदत्तेषु या विद्या । पूर्व दत्तेषु यद्धनम् ॥
पूर्व दत्तेषु या भार्या । अग्रे धावति धावति ॥

हेंच अखेरीस खरें. माझ्या पूर्वपुण्याईमुळें तुझ्यासारखें रत्न मला लाभलें.

म्हणून मी इतक्या दुःखांत, त्रासात आणि संकटांत समाधान म्हणून जी एक चीज आहे, ती मूर्तिमत तुझ्या ठिकाणी पाहात आहें !

बापूंच्या ह्या बोलण्यावर आई कांहीं बोलली नाहीं, पण कृतज्ञतेची नजर त्यांच्याकडे टाकून ती आपल्या कामाला लागली. तिचे नेत्र अश्रूंनीं डबडबले होते. त्या वेळीं बापू आणखी म्हणाले,

“ तू कसलहीं दुःख करू नकोस माझ्या संसाराचा गाडा दारिद्र्यानें खिळखिळा करून टाकला आहे पण तुझें पुढचे भाग्य मला उघड उघड दिसत आहे. तुला परमेश्वरानें सुपुत्र दिलेले आहेत. तेच पुढें उज्वल काल आणतील. एका सुभाषितात म्हटले आहे कीं––

एकेनापि सुवृक्षेण पुष्पितेन सुगंधिना ।
वासितं तद्वनं सर्वं सुपुत्रेण कुलं तथा ॥

एका सुपुत्राची ही एवढी योग्यता आहे. तुला गजू आणि शंभू असे दोन सत्पुत्र आहेत, मग तुझ्या भाग्याला काय उणे आहे ?

आता आईला बोलल्याशिवाय राहावेना. ती नम्रपणे म्हणाली, “ पुत्र काय, इकडच्या आशीर्वादाचेच फळ ना ? संकटें काय, येतील जातील. पुढें बरे दिवस केव्हा येतील तेव्हा येवोत. पण माणसानें संसारात एकसारखी संकटें येणार, असेंच धरून चालावें. मग कसलीही वाईट–अगदीं वाईट वेळ आली, तरी मन बावरत नाहीं ! ”

आईचे हे बोल खरें ठरण्याचा पुढे दोन तीन दिवसातच प्रसंग आला.

आमच्याकडे एका देसायाची मिरासी हक्कानें जमीन होती. ते देसाई घराणें आमच्या नातेवाइकांपैकींच होतें. पण अण्णांनी केव्हा तरी त्याचा अपमान केलेला होता, आणि कांहीं पैसे बुडविलेही होते ! तें शल्य देसायाच्या मनांत डाचत होतें. अण्णा आणि बापू एक विचारेच चालतात, अशी त्यांची अद्यापि समजूत होती !

अण्णांनीं साऱ्या जमिनी सावकाराकडे फेडीत दिल्या होत्या. त्या जमिनींची चावडी भरण्याची आणि देसायांचे मिरासी हक्काचे पैसे देण्याची जबाबदारी मात्र आमच्या माथीं मारली होती. म्हणजे जमिनीचें उत्पन्न

सावकारानें न्यावें, आणि सरकारसारा वगैरे आम्ही भरावा, असा तो पुरा आतबट्ट्याचा व्यवहार होता. बापूंच्या हातूनच कर्जाचा बोजा वाढला असल्यामुळें अण्णानीं घातलेली ही अट बापूंना मान्य करणें भाग पडलें होते. सरकारी चावडी आतापर्यंत बापू कशीतरी भागवीत होते. पण देसायांची तीन चार वर्षाची तीस चाळीस रुपये बाकी माल थकली होती.

इतके दिवस गावच्या वजनदार कुलकर्ण्याचा पाठिंबा आम्हाला आहे, असें देसायाना वाटत होतें. म्हणून त्यानीं फारसा तगादा लावला नव्हता! पण काळानें तो काढून नेल्याचे कळताच देसायानीं फिर्याद करून तीन वर्षाच्या बाकीचा तीस रुपयाचा एकतर्फी हुकूमनामा मिळविला! त्याची जप्ती आणण्याचें तेवढें राहिले होते!

पण एके दिवशीं सकाळीं बेलीफास घेऊन जप्तीकरिता देसाई दत्त म्हणून आमच्या घरीं उभे राहिले! बापू अथरुणावरच उठून बसून त्याच्याशीं बोलत होते. माझी शाळा सकाळची असल्यामुळें मी शाळेस निघून गेलों.

मी दहा वाजता शाळेतून परत आलों, तरी देसाई व सरकारी बेलीफ घरींच होते. देसाई घरातली उरलीं सुरलीं भांडींकुंडीं जमा करून सोप्यावर आणून ठेवीत होते. आई हा सर्व प्रकार सचिंतपणें पाहात होती. बापू गयावया करून मुदत मागत होते. पण देसायाची सूडबुद्धि जागृत होती. शत्रूवर विजय मिळविल्याचा उन्माद त्याच्यावर चढला होता. ते तुच्छतेनें म्हणाले.

"बापू! आता का गयावया करतां? अण्णाच्या करणींत तुम्ही भागीदार होता ना? तेंच भूत तुम्हाला भोवतें आहे. आताच्या आतां पैसे द्या. अब्रू वाचवा!"

बापू निरुत्तर झाले होते. घरात जप्त करण्यासारखें धान्य नव्हतें. भाड्याची यादी चालली होती. गोठ्यांत फक्त दुष्काळातून कशी बशी वाचलेली एक तरणीताठी दुभती गाय होती. तिच्याकडे देसायांची पापी दृष्टि गेली.

देसाई गाय सोडून ती जप्त करावी, ह्या विचारास लागले! ते गाई पुढें गेले. तिचें खुंट्याचें दावें सोडण्याचा ते प्रयत्न करूं लागले. गाय

बावरली ! कोणी तरी परका माणूस आपणास नेणार, असें तिला कळलें कीं काय न कळे. तिनें क्रुद्ध होऊन शिंगें झाडण्यास सुरवात केली. ती हंबरूं लागली. तिच्या वासराची धडपड सुरू होऊन त्यानेही तिला साथ दिली. दाव्याची गांठ सोडण्याचा देसायाचा प्रयत्न चाललाच होता. इतक्यांत त्यांना गाईनें शिंग मारलें. देसायांच्या मांडीतून घळाघळां रक्त वाहूं लागलें !

झालें ! देसायांचा क्रोध अनावर झाला ! त्यानीं गाईला काटीचे रट्टयावर रट्टे मारण्याचा सपाटा चालविला ! गाईनें जोराने हिसका मारून दावें तोडलें आणि लाथा झाडीत झाडीत ती घराबाहेर उधळत गेली ! गाईवरील जप्ती तिची तिनेंच उठविली !

आता बरेचसे बघे लोक जमले. खरे, इगळे, भटजी इत्यादि दरवाज्यांतून डोकावून गेले. आमची नालस्ती त्या मडळींत सुरू झाली. त्या आपत्तीच्या वेळीं आमचा वाली आम्हांस कोणीच दिसेना.

इतक्यांत आमची ताई डोक्यावर पदर घेऊन अत्यत घाईघाईनें आली. ती अद्यापि घराबाहेर पडली नव्हती. आमच्या घरची दैन्यावस्था तिच्या कानीं गेली तिचें हृदय पिळवटून निघालें. ती स्फुदत स्फुदतच माजघरात आली आई तिची समजूत घालू लागली. आई उद्गारली—

" भांडींकुडीं गेलीं, तरी हरकत नाहीं. आम्ही काय, गाडग्या मडक्यांत संसार करूं. गोरगरीब शेतकरी तसेच करितात कीं नाही ! जाऊ द्या हें पाप !..."

आईचे माजघरांतून हे उद्गार मोठ्यानें बाहेर पडले होते. सोप्यावरील देसायांच्या कानीं ते शब्द गेले. पण त्या पाषाणहृदयी गृहस्थास दया आली नाहीं. भाडीं बाहेर आलेलीं पाहून शंभू मात्र मोठ्यानें रडत होता.

ताई आईशीं एका बाजूस स्फुंदत स्फुंदतच कुजबुजत होती. आई पुष्कळ वेळपर्यंत नकाराची मान व हात हलवीत होती. पण शेवटीं होय-नाहीं, करितां करितां ताईनें आईचें मन वळविलेलें दिसलें.

नतर दोघींनीं विचार केला आणि आई मला हळूच म्हणाली, " तुझे

गुरुजी घरीं आहेत का बघ गजू ? त्यांच्या एकट्याकडेच आमचें काम आहे, असें त्याना एका बाजूस बोलावून हलकेच सांग.''

आमचे गुरुजी दोन पैसे बाळगून आहेत, असा त्याचा लौकिक होता. त्याना वीस रुपये पगार असला, तरी त्यांच्या प्रपचास दहापेक्षां अधिक खर्च लागत नसे ! ते श्रीमत आहेत, असें मानून त्याच्याकडे उसने पासने मागण्यास अनेक लोक येत असत !

पण गुरुजी व्यवहारदक्ष असल्यामुळें देण्याघेण्याच्या भानगडींत ते आमच्या गावीं फारसे गुतत नसत ! एकांतात त्यांच्याजवळ सोनें नाणेंच ठेविलें, तर ते पांच दहा रुपयाची चागल्या प्रामाणिक माणसाची नड भागवीत असत. ही गोष्ट माझ्या आईच्या कानावर होती.

गुरुजी पोस्टाचे काम उरकून जेवणाची वाट पाहात होते. ते वळकटीस टेकून पोस्टात आलेले एक खेडयाचें वर्तमानपत्र वाचीत होतें ! इतक्यांत मी त्याच्याकडे गेलो. नम्रपणें मी त्याना आईचा निरोप सांगितला.

गुरुजींनी थोडासा विचार केला. शेवटीं 'हू' असे उद्गारून ते म्हणाले, "येऊ दे त्याना ! वेळ कठीण आहे खरी ! माझ्या हातात तर कांहीं नाहीं !''

गुरुजींना आमच्या घरीं आलेल्या जतीची कुणकूण लागलेली असावी, असे मला दिसले.

आई व ताईची जोडी गुरुजींच्या घरीं जाताच आईने झटकन् पुढें होऊन गुरुजीच्या पायावर डोकें ठेविलें; आणि त्याच्या हातांत ताईची जाडजूड वज्रटीक देत ती म्हणाली, "हा माझ्या ताईचा डाग आहे. तो आपण ठेवा. आतां रुपये देऊन आम्हांला यमाच्या तावडींतून सोडवा. गांवात तोंड दाखविण्यासही आम्हाला जागा राहिली नाहीं !''

आई अश्रु ढाळीत होती. ताईचा डोळ्याना लावलेला पदर ओलाचिंब झाला होता. ताईकडे पाहातांच गुरुजींनीं एकदम मान खालीं घातली. त्यांना अत्यत वाईट वाटलें. पण ते जरा चाचरत चाचरत बोलले—

" मजजवळ एवढी रोकड कुठली असणार ! आणि तुम्हाला माहीतच आहे कीं, नाना खरे आमच्या वाकड्यावर आहेत. तुमची वेळ कठीण खरी, पण मी तरी काय करूं ? मी सावकारी करितों, असा डांगोरा पिटून सूड घेण्याला नाना खरे टपलेले आहेतच ! "

गुरुजींच्या ह्या बोलण्यावर आईला उत्तर सुचेना. तिनें जवळच उभ्या असलेल्या गुरुजींच्या कुटुंबाकडे केविलवाण्या नजरेनें पाहिलें. स्त्रीहृदयच तें ! एकदम त्याच्या अंतःकरणात दयेचा पाझर फुटला. त्या म्हणाल्या,

" गजूच्या आईची वेळ वाईट आहे ! असला प्रसंग वैऱ्यावरही येऊं नये. त्याची दानत चांगली आहे. हाडाचीं काडें करून त्या आपलें देणें फेडतील. परमेश्वराला तरी डोळे असतीलच कीं ! "

गुरुजी कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं थोडा वेळ डोळे मिटून घेतले. आणि झटकन उठून कांहीं कुरकुर न करितां तीस रुपये माझ्या आईच्या हातीं दिले. व एवढेंच म्हटले, " फक्त आठ आणे व्याज मात्र दरमहाचे दरमहा देत जा, म्हणजे झालें ! पण ते तरी तुम्हाला कसें देता येणार ?"

गुरुजींचें बोलणें ऐकून आईनें उत्तर देण्यापूर्वीच सद्गदित होऊन मीच म्हटलें,

" गुरुजी ! तुमच्या घरचें वाटेल तें काम मी करीन. शाळेची देखील झाडलोट करीन, पण व्याजाचे पैसे भागवीन ! "

इतकें बोलून मीही गुरुजींच्या पायां पडलों.

कसलेही कष्ट करण्याची मला लाज वाटत नव्हती. घरच्या अशा विपन्न स्थितींत आपल्याला कांहीं तरी करण्याची संधि मिळेल, ह्याची मी वाट पाहात होतों. माझें बोलणें ऐकून गुरुजींचाही कंठ दाटून आला व ते म्हणाले,

" गजू ! तूं मोठा होणार खचित ! कसल्याही संकटाला तूं जुमानणार नाहींस ! हेही दिवस जातील, हें लक्षांत ठेव. "

आईनें रुपये आणून दिल्यावर देसायांचें तोंड त्या भर दुपारीं काळें

ठिक्कर पडलें ! त्याना आमच्या घराचा बोजवारा उडवावयाचा होता, पण तो त्यांचा डाव हुकला !

बापूंच्या मनाला ह्या आपत्तीमुळें अत्यंत वेदना झाल्या. श्रीशंकराची पार्थिव पूजा ते अधिक वेळ करूं लागले. अनेक उपासतापास त्यांनीं आपल्या मागें लावून घेतले. त्यांची प्रकृति अधिकच नादुरुस्त झाली. पण कांहीं दिवसानंतर त्यांच्या कोणा एका मित्रानें पोतेंभर ज्वारी पाठविली, त्यामुळें त्याच्या मनाला थोडा उत्साह वाटून ते हिंडूं फिरूं लागले. आणि सारे नको, नको म्हणत असतां परगांवीं निघून गेले ! ''

गोष्ट संपतांच मी आपल्या खोलींत ताबडतोब निघून गेलों.

---

## प्रकरण अठरावें

ठरल्याप्रमाणें नवाच्या ठोक्यास मी माझी कहाणी सांगण्यास आरभ केला. मी म्हटलें—

" स. १९०० साल उजाडलें. आमच्या घरची हलाखी कांहीं केल्या आमच्या घरातून बाहेर पडेना. तिला आमच्या येथेंच वास्तव्य करण्यांत सुख वाटत असावे, कीं काय न कळे पण त्या सधीस आमच्या गांवीं पुण्यामुबईचे सुखवस्तु लोक येऊन राहिलेले होते. त्यांच्याजवळची सपत्ति स्वैरपणें नाचत खेळत होती. फक्त आमच्याच घरीं तिची वडील बहीण जागी असल्यामुळें तिचा प्रवेश होऊं शकत नव्हता !

पुण्यामुबईस प्लेगची सांथ दरसाल उद्भवत असे. ती सांथ खेड्या-पाड्यापर्यंत जाऊन पोहोचे. आमचें देवगांव अद्यापपर्यंत त्या सांथीच्या तावडींतून सुटले होतें. आम्हां मुलांनीं एका मोठ्या धोंड्यास शेंदूर फासला आणि तो मारुतीच्या देवळात ठेविला. आम्ही त्याला प्लेगोबा म्हणू लागलों. लोक त्यालाही गंधफुलें वाहूं लागले. प्लेगोबाची पूजा आमच्या गांवीं होत असल्यामुळें इकडे तो ढुंकूनदेखील पाहावयाचा नाहीं, असेंच जो तो म्हणू लागला !

आमचें गांव उंचवट्यावर असल्यामुळें तेथील हवा खेळती होती. उन्हाळ्याच्या दिवसांतही तेथें सतत थंडगार वाऱ्याची झुळूक येत असल्या-मुळें शहरच्या लोकांना वास्तव्य करण्यास आमच्या गांवची हवा आल्हाद-कारक वाटत असे. पुण्यास प्लेग झाला कीं, देवगांवांत पाहुण्यांची गर्दी

होत असे. ह्या सालीं तिकडचीं बरींच कुटुंबें आमच्या गांवीं प्लेगमुळें येऊन राहिलीं होतीं !

त्यांपैकीं बरेच लोक सेवानिवृत्त झालेले होते. आमच्या गांवचें डोंगरातील महादेवाचें स्थान त्याना फार आवडलें होतें. सकाळसंध्याकाळ नियमानें ते लोक महादेवास जात असत. तेथील कुडावर स्नानसंध्या उरकण्यात त्याना आल्हाद वाटत असे. आमच्या गांवचे पांढरपेशे लोक त्यांचे अनुकरण आतां अगत्यपूर्वक करूं लागले.

त्या सालीं उन्हाळ्यांत वळीवाचे कांहीं पाऊस झाले. तें सुबत्तेचें चिन्ह लोकांना वाटले. पुढें सुरवातीचा पावसाळाही ठीक झाला. लोकानीं उत्साहाने पेरण्या केल्या. पण त्यानंतर पावसाने चांगलीच ओढ धरली !

प्लेग येऊ नये आणि पर्जन्यही पडावा, ह्याकरितां डोंगरच्या महादेवास मोठा अभिषेक करावा, असे पुण्याकडील आलेल्या कांहीं पाहुण्यानीं सुचविले. त्या लोकाच्या तालावर नाचणाऱ्या खरे, इंगळे, गोरे वगैरेनीं पुढाकार घेऊन वर्गणी जमविण्यासही सुरवात केली.

देवाच्या कामाला गावचे सर्व प्रकारचे लोक--मराठे, वाणी, उदमी, साळी, माळी, धनगर, गावचा अस्पृश्यवर्ग इतकेंच नव्हे तर, तांबट, तांबोळी, बागवान वगैरे धंदे करणारे मुसलमान देखील आपापल्यापरी मदत करूं लागले. कारण, सर्वांचें संकट एकच होते. आणि सर्वांची गावच्या महादेवावर श्रद्धा होती. आमच्या गांवच्या मुसलमानाची देखील घरची राहाणी व आचारविचार हिंदु बांधवांसारखेच असल्यामुळें ते कोणत्याही सार्वजनिक कार्यांस आपलेपणानें हातभार लावीत असत.

एकदरींत आमच्या गांवीं सर्व लोकात उत्साह संचारला. महादेवास अतिरुद्र करून शेवटीं रुद्राचा स्वाहाकार करण्याचें तज्ज्ञांच्या विचारानें ठरलें.

इतक्यांत शिवानंद म्हणाला, " भाऊ, अतिरुद्र म्हणजे काय हो ? रुद्राची अकरा आवर्तनें झालीं म्हणजे एकादशनी होते. अशा अकरा एकादशनींचा लघुरुद्र होतो. आपल्या घरीं नेहमीं आपण तो करतो, पण अतिरुद्राची कल्पना आम्हांला नाहीं, ती सांगतां का ? "

मी म्हटलें—" तसे अकरा लघुरुद्र झाले म्हणजे महारुद्र होतो आणि तशा अकरा महारुद्राचा एक अतिरुद्र होत असतो. "

सुलभा म्हणाली, " मग ह्याला पुष्कळ ब्राह्मण लागतील व हें काम बरेच दिवस चालेल की ! "

" हो ! " मी म्हटलें. " चागले पट्टीचे ब्राह्मण तेहतीस मिळाले, म्हणजे एका दिवसांत व्यवस्थितपणें महारुद्र आटोपतात. असे अकरा दिवस झाले की, अतिरुद्र होतो. त्यावेळीं कोल्हापूर, कऱ्हाड, वाई, सागली, पुणे येथें वेदशास्त्रसपन्न ब्राह्मण पुष्कळ होते. त्यातील निवडक लोकाना निमत्रणेंही गेलीं.

बापू त्यावेळीं गावीं नव्हते. ते कोल्हापूर, बेळगाव भागात पुराण सागत हिंडत होते. लहानपणीं त्याना अध्ययनाची चागली संधि मिळाली नव्हती. आपल्या वडिलाजवळ त्याचें जें काय शिकणे झालें, तेवढ्यावरच त्याचा पुराणिकाचा व्यवसाय चालत असे. पुण्यासारख्या शहरात जाऊन तेथे आपल्या विद्वत्तेचे तेज पाडावें, इतकी विद्वत्ता नसल्यामुळें ते दूरदूरच्या साधारण मोठ्या गावीं पुराण सागत असत. पण त्याही व्यवसायांत दुष्काळामुळें पोट भागून फारसे उरत नसे. बापू चारपाच महिन्यानीं जें काहीं साठेल, ते घेऊन घरीं येत असत. तोंपर्यंत आमची इकडे उपासमार होत असे. आमच्या दुर्दैवानें आणि दुष्काळानें असले दिवस आणिलेले होते, त्याला कोणाचा इलाज नव्हता !

अतिरुद्राच्या चळवळीचा गाजावाजा गावांत बराच चालला होता. त्यात होणारी चर्चा आमच्या कानावर येई. आमच्या घरावर नाना खरे यानीं दहा रुपये वर्गणी बसविली. सगळें घर धुतलें तरी दहा पैसे रोख, निघण्याची जेथें मारामार, तेथें दहा रुपये वर्गणी कशी भागवावयाची, ह्याच चिंतेनें आईला ग्रासून टाकलें !

एक दिवस नाना खरे, इंगळे, गोरे, पाटील वगैरे मंडळी आमच्याकडे वर्गणी मागण्यास आली. घरमालक परगावीं गेले आहेत, ते आल्यानंतर शक्तीप्रमाणें आम्ही वर्गणी देऊं, असें काहीं तरी आईनें म्हटलें. त्यावर नाना खरे उसळून म्हणाले,

" आनंदीबाई ! तुम्हीच घर चालवितां तेव्हां धर्माच्या कामाला अशी टोलवाटोलव योग्य नाहीं. परवां कसे तुम्ही देसायांना आपल्या गाठीचे तीस रुपये काढून दिलेत ! तुम्हांला दहा रुपयांची हो कायकथा ? द्या लवकर ! आम्हांला एकाच घरीं इतका वेळ घालवून कसे चालेल ?"

" नाना ! अंत पाहू नका आमचा ! " आई हलकेच बोलली. " ते आल्यावर कांहीं तरी दिल्याशिवाय राहाणार नाहींत. चार कामें आम्हाला करावयास सांगा. पण पैशाची जिकीर करू नका. आमचा जीव देण्या-पाण्यान अगदीं गुदमरून गेलाय ! "

नानांनीं लोकांकडे पाहात डोळे मिचकावले व ते म्हणाले, " अहो ! साऱ्यांनाच कामें करावीं लागणार आहेत तुम्हांला तिकडे रोजच्या रोज स्वयपाकाला आलेच पाहिजे. गजा पाणी भरील ! यांत हयगय झाली, तर देवाचा व गावचा कोप होईल तुमच्यावर ! पण इतके झाले तरी वर्गणी मात्र सुटायची नाहीं बरे का ? "

" देवांची सेवा करीन. स्वयपाक करीन " आई म्हणाली. " पण दररोज घरींच जेवायला येईन. शेवटच्या दिवशीं तेवढा देवाजवळचा प्रसाद घेईन मी ! माझा हा नियम आहे, नाना ! "

" आम्हांला हें सारे सोंग कळतेय बरें का ? " नाना खरे तिरस्कारदर्शक स्वरांत म्हणाले. " वर्गणी बुडविण्याचा हा सगळा पवित्रा आहे. आम्ही कांहीं आमच्या घरच्या स्वयपाकास बोलावीत नाहीं. वाडींतील लोकाच्या घरीं आचारीपणा करून यथेच्छ ढेकर देत होता कीं ! शूद्रांचे अन्न खातांना धर्म, व्रत, नियम आठवला नाहीं तुम्हांला ? आतां म्हणे, मी स्वयपाक करीन, पण तेथे घास घेणार नाहीं ! मोठा पवित्रपणाचा आव आणलात ? आनंदीकाकू, असल्या बाता नाना खऱ्याना सागू नयेत तुम्ही ? "

त्यावेळीं मला राहावेना. लहान तोंडीं मोठा घास होत आहे, हें कळूनही मी म्हटलें,

" आईला काय म्हणतां नाना ? आम्ही मुलें आहोंत कीं काम करायला. मला रुद्र पण छान येतो. मी रुद्र म्हणेन, वाटेल तितक्या पाण्याच्या घागरी अभिषेकासाठीं आणीत जाईन ! "

" वारे गजा ! " नाना चेष्टेनें हसत म्हणाले. " लांब लांबचे मोठमोठे विद्वान् ब्राह्मण येणार आहेत अतिरुद्रासाठीं. गावचा कोणी आम्ही अभिषेकाला घेणार नाहीं. बापू आले तरी, त्यांना ती संधि मिळणार नाहीं. तूं तर पोर ! दहापंधरा रुपयाची दक्षणाही मिळविण्याची हाव सुटली आहे तुम्हाला ! "

नानाचा हा विकृत दृष्टिकोण गांवच्या इगळे व पाटील वगैरेंना आवडला नाहीं. त्यावेळीं गावचे पाटीलच पुढाकार घेऊन बोलले —

" नानासाब, गरीब पोरासोराला आन बाया बापड्याना टोचून काय बोलता ? बापूंना पाहिजे तर बोला. आनंदीकाकूंना अख्या गाव साध्वी समजतो. त्याच्याशीं असं बोलण आम्हाला बरं नाहीं दिसत ! चला आपण पुढ जाऊं या. "

जाताना पाटील आईला उद्देशून म्हणाले, " काकू ! तुम्हाला होईल ती देवाची सेवा करा. बापू आले म्हणजे काय द्यायचें ते देतील. उगाच मनाला लावून घेऊ नका. "

पाटलाची उदारता आणि आत्मीयता पाहून आईला भडभडून आलें. ती खालीं मान घालून टिपें गाळीत उभी होती.

नानाच्या वागणुकींत इतका कडवटपणा कां असावा, इतकें ज्ञान मला नव्हतें. मी मात्र अतिरुद्राच्या सोहळ्यात जोरानें भाग घेण्याचें ठरविलें. त्या दिवशीं रात्रीं आई नेहमींपेक्षा अधिक वेळ देवाची प्रार्थना करीत बसली होती. शेवटीं ती **आम्ही काय कुणाचें खातों रे । श्रीराम आम्हांला देतो रे ॥** हें पद घोळून घोळून म्हणत होती.

* * *

मला त्या दिवशीं रात्रीच्या गाडीनें मुंबईस जावयाचें असल्यामुळें मी उठलों. त्यावेळीं सुलभाला म्हटलें,

" मी परत आलों, म्हणजे आमच्या लहानपणच्या मेळ्याची व त्याच्या संगतेची गोष्ट सांगेन. तुमच्या लहानपणच्या खेळासारखीच मोठी मजेदार कथा आहे ती ! "

———

## प्रकरण एकोणिसावें

तिसरे दिवशीं मी मुंबईहून परत आलों. रात्रीं नऊ वाजतां आम्ही सारे जमल्याबरोबर सुलभा म्हणाली,

" भाऊ ! सांगा आतां तुमच्या मेळ्याची गोष्ट ! सदानद म्हणतो. ' पुण्यास लोकमान्यांनीं गणेशोत्सव सुरू केला. तेथें मेळे निघत असत. शहराबाहेरच्या खेडयापाडयापर्यंत पन्नास वर्षांपूर्वी अशा चळवळी पसरलेल्या नसाव्यात. ' खर का हो हें भाऊ ! "

" होय. खरं आहे तें. " मी सदानंदाकडे स्मितपूर्वक पाहात म्हटलें. " सदाने केलेला अभ्यास बरोबर आहे. सध्याप्रमाणें राजकीय, सामाजिक किंवा धार्मिक चळवळीची लाट खेडयापर्यंत मुळींच पोचली नव्हती. आपला जुना मामुली जमाना खेडयापाडयांत चाललेला होता. पण आमच्या गावीं पुण्याचे लोक राहावयास आले होते. त्यांच्या-कडूनच अतिरुद्राच्या अनुष्ठानात मेळा काढण्याची कल्पना निघाली !

नाना खरे यांच्याकडे आलेल्या पाहुण्यांनीं पुण्यास मेळा काढलेला होता. अर्थात् त्यांनींच आमच्या गांवच्या मेळ्याची कामगिरी आपल्याकडे घेतली. मला अतिरुद्रांत भाग घ्यावयाचा होता; आणि मेळ्यांतही काम करण्याची इच्छा होती.

गांवांतील वीस पंचवीस मुलें मेळयांत घालण्याचें ठरलें. मुलांना ठरावि साच्याचा पोशाक करावा लागणार होता. घुंगूर असलेली काठी व टिपऱ्या ज्यानें त्यानें आणावयाच्या होत्या.

नानांच्या वाड्यांत मेळ्याची तालीमही सुरू झाली. आमच्या घरांतून मला मेळयांतील गाणीं ऐकूं येत होतीं. तबल्याचा ठेका आणि काठ्यांच्या घुगूरांचा मधुर नाद यांच्या तालावरचीं गाणीं मन वेधून घेत होतीं. किर्लोस्कर नाटक कंपनीच्या नाटकांतील पद्यांच्या चालीवर तीं पदे होतीं. त्या कंपनीचीं नाटकें पाहिलेले पुण्याचे लोक किर्लोस्कर कंपनींतील भाऊराव किंवा भावड्या ह्या पात्राची फार स्तुति करीत. मला नाटक कसें असतें, हे त्यावेळीं माहीत नव्हते. तथापि **काव्येषु नाटकं रम्यम्** हें वचन बापूच्या तोंडून बऱ्याच वेळां मीं ऐकलें होतें.

मेळयाच्या रागरंगाचीं वर्णनें माझे शाळेतील मित्र आकर्षक रीतीनें करीत होते. त्या मेळयांत बांढरपेशाच्याच मुलांचा मुख्य भरणा होता. मेळ्याचे चालक व खरे यांनीं प्रत्येक मुलाच्या पालकाकडे मुद्दाम जाऊन मुले जमविलीं होतीं आमच्याकडे कोणी आलें नव्हतें. नानांनींच माझें नांव गाळलेले असावें, असें आईचे अनुमान होते. तथापि मी बाळू खरे याच्याशीं संधान बांधून माझें नांव मेळ्यांत घालण्यासाठीं विनंति करण्या-करिता मेळयाच्या चालकाकडे गेलों.

त्या तरुण गृहस्थानें माझ्याकडे निरखून पाहिले. माझा वर्ण काळा-सावळा असला, तरी शरीर तेजःपुंज होते. माझें कपाळ भाग्यवानासारखे भव्य आणि माझे डोळेही पाणीदार आहेत, असे माझें वर्णन गुरुजींनीं पुष्कळ वेळां केलेलें होतें. त्यामुळें दिसण्यांत मी चालकांना नापसंत होण्यासारखा नव्हतों.

पण माझा त्या वेळचा पोशाक अगदींच भिकार होता. डोक्यास कानटोपी आणि अंगांत फक्त बंडी होती. आणि तीही पुरेशी लांब नसल्यानें माझी लंगोटी कोणाच्याही सहज नजरेस येत असे!

मला पाहातांच मी मराठ्याचा मुलगा आहे, अशी त्या पुणेरी गृहस्थाची समजूत झाली. पण बाळूनें माझी माहिती सांगितल्यानंतर मला त्या दिवशींच्या मेळ्याच्या तालमींत बसण्यास अनुज्ञा मिळाली.

पण दुसऱ्या दिवशीं पोशाखाचा प्रश्न निघाला. जरीची टोपी, रंगीत कापडाचा सदरा आणि नेसण्यास रेशीमकांठी धोतर एवढा जामानिमा अवश्य

पाहिजे होता. त्याकरितां पांच रुपये घेऊन आणण्याची ताकीद मला मिळाली. माझें कंबरडेंच खचलें. चालकांच्या मनांत थोडी उदारता उत्पन्न होण्याजोगी मेळ्यांतील मुलांनी माझ्या हुशारीची हकीकत त्यांना सांगितली. पण इतक्यांत नाना खऱ्यांचा मोर्चा तिकडे वळला. त्यांनीं मला पाहातांच म्हटलें,

" गजाला मेळ्यांत कशाला ? तो तर फार वांड मुलगा आहे ! "

नानांच्या तोंडचे हे शब्द ऐकून माझें मस्तक भणाणलें. मला असला अपमान सहन होणे शक्य नव्हतें. नानांकडे जळजळीत नजरेनें पाहून मी तेथून निघालों आणि जातांना म्हटले,

" असला भिकारडा रडवा मेळा मला मुळीं आवडावयाचा नाहीं ! काय ती बायकी पदे ! वाहवा रे वाहवा ! " असें म्हणत म्हणत खऱ्यांच्या वाड्यांतून मी धावतच घरीं आलो.

ती संध्याकाळची वेळ होती. माझें मस्तक अगदीं तापून गेलेले होतें. मी शांत जागा शोधीत होतो. माझ्या घरांतील परसांत सीताफळीचे झाड होतें. त्या झाडाखालीं जाऊन तेथें स्वस्थ बसलो. पण कांहीं केल्या माझें मस्तक थंड होईना. अपमानाचें शल्य माझ्या मनाला सारखें टोंचीत होतें शेवटीं एक कल्पना माझ्या मनात स्फुरली व तेथून झटकन् उठून मी आईकडे आलों. आईला सारी हकीकत सागतांच ती म्हणाली,

" गजू ! आपण गरीब आहोत, ही कल्पनाच तू सोडून दे. जो मनाचा मोठा तोच खरा मोटा. मनाची श्रीमती कायमची असते. पैशाची श्रीमती टिकाऊ नसते. तू मोठ्या मनाचे मित्र शोधशील, तर ते तुला मिळतील. जगांत चांगले व वाईट लोक असतातच. चांगले लोक शोधणे हेंही चांगल्या माणसासच जमते. कशाला त्या मेळ्याच्या मोहांत पडलास बर ? तुझ्या आंगीं तसला मेळाच निर्माण करण्याच सामर्थ्य आहे कीं ! "

आईनें ही उत्तेजक मोजकीं वाक्यें उच्चारली. त्यामुळें माझ्या आगांत उत्साहानें सचार केला. माझ्या मनांत नवीन प्रकाश पडला. मी जोरानें कामास लागलों.

दुसऱ्या दिवशीं बाबू मोरे, सदू गुरव, आणि ज्ञानू मुसळे इत्यादि माझ्या मित्रांना मी भेटलो. बाबूचें घर मोठें होतें. त्याच्या माडीवरच आमची बैठक भरली. मी त्याच्यापुढें नव्या मेळ्याची कल्पना माडली. तिचें स्वागत साऱ्यांनीं उत्साहानें केलें.

झाले ! बाबूची माडीच आमच्या मेळ्याचें मुख्य स्थान ठरलें. गांवांतील भजनात अभग म्हणणारीं, सणगर, कोष्टी वगैरेची कितीतरी मुले आम्हाला मिळालीं. पोवाडे म्हणणारा रामू गोंधळी आमच्यांत आला. मृदग, झांजा, वगैरे सारा काहीं सच जमला.

बाळू खऱ्याच्या वाड्यात चाललेलीं पदे आमच्या घरांत ऐकू येत होतीं. त्या पदाच्या चाली मी आत्मसात् केल्या त्याच धर्तीवर मीही शकराच्या स्तुतीचीं काहीं पदे रचलीं. मीं तीं पदें आईला व ताईला म्हणून दाखविलीं. त्याना तीं पसत पडली. त्यावेळीं माझ्या पाठीवरून आपला प्रेमळ हात फिरवीत आई म्हणाली,

“ गजू ! तुझ्या बुद्धीला चांगले वळण लागलें कीं ! आपलाच स्वयपाक आपल्याला आवडतो. तशीं आपलींच गाणीं आपल्याला आवडतात. दुसऱ्याचीं उष्टीं पक्वान्ने खाण्यात गोडी कसली ! घरच्या मीठ भाकरीची चव त्यांना नाहीं. तुझीं पदे मला आवडली. गांवाला आवडतील. त्यात गावकऱ्यांना आपलाच गाव दिसेल ! ”

आईने माझी वाखाणणी केल्यामुळें माझे मन फुलून गेलें. आमची मेळ्याची तयारी पुढें जोरात चालली. गावचा शेतकरी वर्ग बाबूच्या माडीवर आमच्या मेळ्यातील पदें ऐकण्यास जमूं लागला !

मी आतां आमच्या मेळ्याची अधिक माहिती सांगण्यांत वेळ घालवीत नाहीं. अतिरुद्राची तयारी पुरी होईपर्यंत आमचा व खऱ्यांच्या वाड्यांतला मेळा चांगलाच रगारूपास आला.

आमच्या मेळ्याचा पोशाक अगदीं साधा होता. पांढरी शुभ्र कानटोपी, धुवट बाराबंदी आणि लंगोट हा तर पोशाख ठरलेलाच होता. त्यावेळीं आलूड किंवा लाब विजारींचा शिरकाव खेड्यांत झाला नव्हता ! सणगर

मंडळींनीं आपल्या मागावरील छोट्या कांबळ्या आम्हांला दिल्या होत्या. त्याची खोळ करून तिलाही आम्ही मेळ्याच्या पोशाकात स्थान दिलें होतें.

मेळ्यांतील शिस्त मात्र मी अगदीं कडवी ठेविली होती. लेजीम, टिपऱ्या, यांचेही हात आमच्या मेळ्याला चांगले येत होते.

अतिरुद्राच्या निमित्ताने डोंगरांतील महादेवाच्या जुन्या देवळापुढें गावकऱ्यानीं मोठा मांडव घातलेला होता. दररोज लतापल्लव व रानवेली यानीं तो सुशोभित ठेविण्यात लोक दक्षता घेत होते. मंडपाच्या प्रवेशद्वारीं चौघडा, सनई इत्यादि वाद्ये आरतीच्या वेळीं वाजत असत.

अतिरुद्रास सुरवात मोठ्या थाटाने झाली. दूरच्या ठिकाणाहून आलेल्या ब्राह्मणाचा रुद्रघोष चालू झाला. शंकरास रात्रदिवस सततधार चालू झाली. गावातील ब्राह्मण मंडळी आळीपाळीने कुंडातील पाणी आणीत होती. मी आणि इगळे याच्याकडे रात्रीचे पाणी भरण्याची पाळी दिलेली होती. अतिरुद्राचा सोहळा पाहून मला आनंद वाटला. यावेळी बापूही तेथें पाहिजे होते, असें मला वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यानीं शिकविलेला रुद्र मी मधून मधून खणखणितपणें म्हणत होतों. ते जमलेले ब्राह्मण माझेही कौतुक भरपूर करीत होते.

पहिले चार दिवस पुणेरी मेळ्याचे कार्यक्रम सायंकाळच्या वेळीं ठाक-ठीकपणे झालें. पाचवे दिवशीं मींही आपला मेळा आणला. प्रथम आम्हाला देवापुढील मंडपात पदें म्हणण्याची परवानगी कारभारी मंडळी देईनात ! पण लोकाच्या आग्रहावरून परवानगी मिळाली. आमच्या मेळयास लोक मावळी मेळा म्हणूं लागले. आमचीं गाणीं चांगली वठलीं. गावच्या शेतकरी मंडळींनी आमच्यावर स्तुतीचा वर्षाव केला !

पुढें दोन तीन दिवस आमचे पदाचे, लेजीम, टिपऱ्या यांचे भरगच्च कार्यक्रम झाले. लोकानीं आमची अधिकच वाहवा केली. खऱ्यांच्या वाडयातला मेळा आमच्या मेळ्यापुढें फिका पडला !

वेदघोषांत मी होतोंच. पाणी भरण्यांतही माझी तत्परता ब्राह्मण-मंडळींना दिसत होती. शिवाय मेळ्याचेंही पुढारीपण मजकडेच असल्या-मुळें माझी स्तुति ब्राह्मणांनीं आणि गांवच्या लोकांनीं भरपूर केली. पण

तीच स्तुति प्रतिस्पर्धी मेळ्यांतील लोकांना असह्य झाली व ते माझा द्वेष करूं लागले !

पुढें दोन तीन दिवसानतरची ती गोष्ट. रात्रीच्या वेळीं आम्ही सर्व कार्यक्रम आटोपून परत घरीं चाललों होतों. खिडींतून जवळच्या वाटेनें आम्ही नेहमीं प्रमाणें निघालों होतों. त्या वाटेंत लोकांची वर्दळ नव्हती.

मी जरा मागें रेंगाळलो होतों. इतक्यांत कोणी तरी माझ्या डोक्यावर काठीचा तडाखा मारला व तो इसम पळून जाऊ लागला ! मी ओरडल्या-बरोबर आमचीं मुलें मागे फिरलीं तोपर्यंत मी काठी मारणारास टणकन दोन तीन उडया मारून गाठलें. इतक्यांत माझे मित्र तेथें आले. त्यांनीं त्याला खूप झोडपले. तो तरुण पुणेरी गृहस्थ अगदीं दीनवाणा होऊन गयावया करूं लागला. ताबडतोब मी त्याला सोडले व आमच्या मुलांना म्हटले, " अरे ! मेळा तयार करणारा हा तर पाहुणा आहे. त्याचा मेळा हिणकस ठरला, म्हणून तर ह्याला क्रोध आला. जाऊ द्या. कशाला मारायचें त्याला ! पाहुण्याला आदराने वागविणें हा आपला अतिथिधर्म आहे ! "

मी घरीं आलों. मला झालेल्या जखमेवर आईने उपचार केले. मला दोन तीन दिवस घरीं पडून राहावे लागले. आमचा मेळा मडपांत जाऊन गाणीं म्हणतच होता. दुसऱ्या मेळ्यातील मुलाचा सूड घेण्याची कल्पना माझ्या मित्रांच्या मनात वाढीस लागली. पण माझ्या आईनें घरीं आलेल्या माझ्या मेळ्यातील मुलाना म्हटले,

" जाऊ द्या, तो मनातला सूडाचा विचार ! देवाची सेवा आपण केली. कोणी दुष्ट निघाला, तर ज्याचे पाप त्याला. तो दोषी पाहुणा तर भीतीनें पुण्यास पळून गेला ! मग उगाच गावात भाडणतडा कशाला ? पिसाळलेलें कुत्रें चावलें तर, त्याला का कोणी चावत असतात ? झालें तें झालें. आतां गांवची एकी अभग राखा. "

माझ्या आईचा उपदेश सगळ्यांना पटला. लहानपणापासून त्या मुलांची आईला माहिती होती. लहानपणीं त्यांना तिनें औषधें व पथ्यपाणीही दिलेलें होतें. सगळयावर होईल तितका उपकार करावा, असें तिचें मूळचेंच बाळकडू होतें.

आतां आमच्याच पाठीस दारिद्र्य हात धुवून लागलें होतें. केव्हां केव्हां गरीब लोकही भक्तीनें कांहीं जिन्नस आम्हांस आणून देत असत. तेव्हां नाइलाजाने आईला त्यांचा स्वीकार करणें भाग पडत असे. त्यावेळीं ती म्हणे, " मी काय, कसेही उपास तापास करून दिवस काढीन. पण ह्या कच्च्याबच्च्यांचा जीव जगला पाहिजे ना? लोकांचे उपकार झाले, तर गजू व शंभू मोठे झाले म्हणजे त्यांची सवाई फेड करतील ! "

एखादे वेळीं अगदीं धान्य नाहीं, अशी घरीं स्थिति असेल, तेव्हां आई पुढील अभंग एकसारखी गुणगुणत राही.

आलीया भोगासी असावे सादर ।
देवावरी भार घालोनिया ॥
तोचि कृपानिधि वारील सांकडे ।
येर ते बापुडे काय रंक ॥

हा अभंग तिच्या तोंडातून मी ऐकला कीं, मला घरची स्थिति लक्षांत येई. पण चमत्कार असा कीं, त्यानंतर एक दोन दिवसात कोणी ना कोणीतरी मूग, मटकी असले कडधान्य आणि ज्वारीचें किंवा गव्हाचें पीठ आणून देई ! त्या दिवशीं आमच्या मेळयातील मुलाना उसळ किंवा थालीपीठ हमखास मिळत असे. त्यामुळे माझ्या आई माझ्या मित्रांना आपल्याच आईसारखी वाटे.

* * *

आता आमच्या मेळ्याची सांगता कशी करावयाची याचा विचार आम्ही करू लागलो. खऱ्यानीं आपल्या मेळ्याला मेजवानी देण्याचें ठरविल्याची बातमी माझ्या कानावर आली. ती मुलाना सांगताच त्यानीं आपल्या मेळ्यातील मुलाचा जेवणाचा दिवस ठरविला. त्या दिवशीं मुख्यतः उत्कृष्ट खिचडी करण्याचा आमचा बेत होता.

हा बेत गुरवाच्या घरांत करण्याचे ठरलें. आमच्या आईला यांतील कांहीं कळूं न देतां स्वावलंबनानें सर्व कामें उरकावयाची, असे आम्ही योजिलें होतें. कर्मधर्मसंयोगाने त्या दिवशीं सकाळीं आई वाडीच्या एका आजारी मुलास पाहाण्यासाठीं गेलेली होती.

तो पंधरावीस मुलाचा जेवणाचा बेत होता. मी जोशी असल्यामुळें मुलांनीं माझ्याकडे फक्त स्वयपाक सोपविला होता. आमच्या मेळ्यांतील मुलानीं तादूळ जमविले. मुगाची डाळ आणली. मसाला, दूध, तूप दहीं यांची भरपूर जमवाजमव केली

मी पाणी आणून स्वयपाकाच्या सुरवातीस लागलो. मुलांचा उत्साह दांडगा होता. वडाचीं पानें आणून द्रोण पत्रावळींच्या तयारीस गुरव लागला. बाबूने मुलाना फराळाकरितां शेंगा व गूळ आणला. सणगराने घोंगडया आणून बैठक सजविली.

गुरवाच्या बायकानीं तादूळ डाळ निवडून दिली. पिठल्याचे पीठ त्यांनीं दळून आणले. खिचडी कशी तयार करावयाची, याची सूचनाही मला त्यानीं दिली. आमची स्वारी सोवळयाने स्वयपाकास लागली. माझ्या मदतीस फक्त आमचा शंभू होता !

आमचे त्यावेळचे सरपण म्हटलें म्हणजे गुरापुढचीं ताटे व गोवऱ्या हेंच होय. मी मोठें पातेले चुलीवर ठेवून त्यात पाणी, डाळ व तांदूळ घातले. पेटलेल्या चुलींत ताटांचे सरपण घालू लागलो गोवऱ्याही घालीत होतो. जरूरी-पेक्षां अधिक अन्न पोटात कोंबल्यानें अजीर्ण होऊन तें पचत नाहीं, तशीच स्थिति चुलीची झाली ! सरपणानें चूल भरून गेली. सर्वत्र धूर पसरला. त्याने आपला पराक्रम आमच्या डोळ्यावर गाजविला ! मी चूल फुकीत असतां माझ्या नेत्रांतून गगायमुना वाहू लागल्या ! मी सोवळ्याने स्वयंपाक चालविला असल्यामुळे आमच्याकडे कोणी फिरकत नव्हतें !

चूल जोरानें पेटत नव्हती. त्यामुळे खिचडी खदखदण्यापर्यंत येईच ना ! मधून मधून तांदुळांतून पळी फिरविली पाहिजे, हेही ज्ञान मला नव्हतें. मी फक्त आई भात कसा करते, हे पाहिले होतें. त्या तुटपुज्या ज्ञानावर मीं त्यावेळीं बल्लवाचार्यांची जबाबदारी स्वीकारली होती. खिचडी शिजत आली, पण ती अर्धीकची होती. ती माझ्याकडे चेष्टेने पाहात खदखदत हसत आहे, कीं काय, असें वाटत होतें !

दुपारचे बारा वाजून गेले तरी, आमचे चुलीवरचे पातेलें खालीं उतरेना.

आमचें सोवळे कडक असल्यामुळें शेजारी पाजारी बाया तिकडे येईनात. मी तर अगदीं रडकुडीस आलों.

आता मुलांची कावकाव सुरू झाली. गजा, झाला कारे स्वयपाक, असें मुलें ओरडू लागलीं. पत्रावळी द्रोण घेऊन जो तो पानावर बसला. पण अद्यापि खिचडीचा पत्ताच नव्हता !

मी आतां देवाचा धावा चालविला. पातेल्याकडे पाहून खिचडीला लवकर शीज असे म्हणू लागलो. चुलींत ताटे नकळत खुपसीतच होतो ! ती कोंदटल्यामुळे फुरगटून मधून मधून माझ्याच आंगावर फुत्कारे सोडीत होती ! खाल्ल्याघरचे वासे मोजण्याचा हा तिचा पराक्रम मला सतापदायक वाटला !

पण थोडयाच वेळात माझ्या शकराच्या प्रार्थनेला यश लाभले. कारण, माझी आईच पार्वतीप्रमाणे माझ्या चुलीजवळ दत्त म्हणून उभी राहिली ! माझा जीव भाडयात पडला !

माझी झालेली दुर्दशा लक्षांत आणून आई मला म्हणाली,

" गजू, सकाळींच बोलला का नाहींस ? मीच तुमचा सारा बेत आपल्याच घरीं छानसा करून दिला असता कीं ! "

" आई ! " मी म्हटलें. " आपलीं आपण सारीं कामे करावयाची, असें आम्ही ठरविले होतें. शेतकऱ्याच्या घरात हा नैवेद्य व्हावा, अशी सर्वांची इच्छा होती. बघ बरें, त्यांचीं चिलीं पिलीं भावडे किती जमलीं आहेत तीं ! मुलांमध्ये देव असतो, असे म्हणतेस ना ? मग येथे सारे देवच जमलेत कीं ! "

मी बोलत आहे, तोपर्यंत आईनें कोंदटलेली चूल उकरली. राख पुढें ओढून घेतली चुलींत हवेला प्रवेश मिळाला. त्यामुळे आनंदित होऊन फुरफुर करीत अग्निनारायण जागृत झाले ! भांडयांतून पळा फिरवून खिचडींत मसाला वगैरे घालून आईनें खिचडी बनविली आणि पिठलेंही तयार केलें. आईनें चटकन पापड लोणचेंही आणलें. गुरवानें महादेवास नैवेद्य नेला.

आम्ही हरहर महादेवाच्या गजरात जेवावयास बसलों. आई म्हणजे देवीच सर्वांना आग्रहानें वाढीत होती. खिचडी, दही, दूध, तूप याचा काला सगळ्यांना अमृताप्रमाणें गोड लागत होता. ह्या गोड भोजनानें आमच्या साऱ्याचीं अंत.करणें एकजीव झाली. हा सारा परिणाम माझ्या आईच्या हातच्या अन्नाचा होय.

आमचा सगळा समारंभ यथास्थित पार पडला. घरीं आल्यानंतर आई मला म्हणाली,

" आजचा तुमचा बेत छान झाला. स्वत:ला स्वयपाक करिता यायला पाहिजे, हें तुला समजलें. साध्याही पदार्थांना राधण्याच्या कुशलतेनें चांगली रुची येते. पुरुषाला स्वावलबी होण्यासाठीं भात, भाजी, भाकरी असले पदार्थ त्याला स्वतःला करिता यायला पाहिजेत."

माझ्या आईचें पन्नास वर्षापूर्वींचें हें तत्त्वज्ञान कोणाला जुनेंपुराणें वाटेल. पण मला हा तिचा उपदेश फार उपयोगीं पडला. मी पूर्व आफ्रिकेंतील जगलात सोन्याच्या खाणीच्या शोधात हिंडत असता हातानेंच स्वयपाक करी. त्यामुळे शुद्ध अन्न मला मिळत असे. स्वतःकरितां लागणारें अन्न स्वत:लाच करण्याचा प्रसग प्राप्त झाला, तर मला केव्हांही कमीपणा वाटला नाहीं.

* * *

माझी कहाणी येथे सपली. मी उठण्याच्या बेतात होतो, इतक्यात सुलभा म्हणाली,

" भाऊ ! तुम्हाला स्वयपाक येतो, म्हणूनच काहो, तुम्ही हेंच बिघडलें, तें असेंच झाले, अशी कुरकूर आईच्या स्वयंपाकावर करिता ! मग बाई, पुरुषाला स्वयंपाक करिता न आला तरच बरं नाहीं का ! आम्हां स्त्रियावर मग अशी टीका होण्याची भीतिच नाहीं ! "

ह्या तिच्या बोलण्यानें तिची आई मोठ्यानें खो खो हसूं लागली. आम्ही सारे हसत हसतच उठलों.

———

## प्रकरण विसावें

संध्याकाळीं नऊ वाजतां आम्ही जमल्यानंतर शिवानंद म्हणाला,

" भाऊ! कालची तुमची गोष्ट पुष्कळ उद्‌बोधक आहे. आमचे आजोबा त्यावेळीं परगांवीं गेले होते. अतिरुद्र सपेपर्यंत ते आलेले नव्हतेच, मग ते केव्हां आले? त्याना मुलाबाळांची काळजी नव्हती का?"

शिवानंदानें विचारलेला प्रश्न ऐकून सदानंदच म्हणाला, " अरे, आपल्याला भाऊ निरनिराळ्या प्रसंगीं आलेले अनुभव सागत आहेत. बाकीच्या गोष्टी आपण अनुमानानेच जाणावयाच्या. ते कांहीं तारीखवार रोजनिशी वाचीत नाहींत!"

अशी चर्चा करण्यांत फार वेळ जाऊं नये, म्हणून मीच सागूं लागलों—

त्यानतर दोन तीन महिन्यांनीं बापू परत आले. पण ते जवळ जवळ हात हलवीतच आले होते. कारण ते येतांना एका खेडेगावीं आजारी पडले. आम्हाला काळजी वाटूं नये, म्हणून त्यानीं पत्रही पाठविलें नव्हतें. इकडे महादेवाला अतिरुद्र करूनही भरपूर पाऊस पडून दुष्काळाची उग्रता कमी झाली नव्हती!

सरकारनें काढलेल्या दुष्काळी कामावर गोरगरीब जात होतेच. आतां श्रीमंत लोकही मेटाकुटीस आले होते. गांवांत भुरट्या चोऱ्या होऊं लागल्या होत्या. बापूंनीं गांवची व घरची स्थिति जाणली आणि ते आईस म्हणाले,

" गांवात लाचारीनें कसंतरी जिणं काढण्यापेक्षा परठिकाणीं कसलाही धंदा करून पोट भरणं मानाचें आहे. आपला गांव साधारणपणें दुष्काळी

भागांतला आहे. येथें ज्याला बागाईत जमिनी आहेत, त्याला खाण्या-पिण्याची टंचाई नसते आपल्या ताब्यांत आतां तसलीच काय, पण कसलीही जमीन नाहीं. तर हें गांव सोडून दूरच्या नदीकाठच्या खेडयांत जाऊन राहू या. गांवापासून जितके दूर जावें, तितके बरें. तुम्हाला हा विचार कसा काय पटतो ? ”

आईने थोडा विचार केला व म्हटलें—

“ आपल गाव सोडणं जिवावर येत खर. गेली तीन चार वर्षे दुष्काळान भडावून सोडलंय ! कस जगाव हेंच समजत नाहीं. असे वाईट दिवस पूर्वी आपण पाहिले नव्हते. तुम्ही परगांवी गेलात, तर लवकर येतही नाहीं! इथ चार कष्ट करून दिवस काढावे म्हटल, तर कष्ट कोणते करायचे ? स्वाभिमान सभाळून जगायच इथ दुर्घट झालय खर ! ”

आई थांबली व ती माझ्याकडे पाहू लागली, इतक्यात बापू म्हणाले,

“ मग माझेच म्हणणे तुला पटतें ना ? असे गाव मी पाहूनही ठेविलेले आहे. तेथें जोशीपण आपणास करावे लागेल. मी आता तिकडे जातो. सारी तजवीज करून येतो. गांव पधरावीस कोस दूर आहे. पण तेथें सुबत्ता आहे. आतां आठ पंधरा दिवस येथें कसे तरी काढा. ”

“ पण, गजूच्या शिकण्याचे तेथे कसं जमेल ? ” आई सचिंत होऊन म्हणाली.

“ आधीं जगू या. ” बापू म्हणाले. “ मग शिकण्याचे पाहातां येईल. सारा काळ सारखा राहात नाहीं. मुलगा काहीं असा तसा नाहीं. नशीबच गजूला मार्ग सुचवील ! ”

आई व बापू यांचा विचार पक्का ठरला. आणि बापू तिकडे निघून गेले. त्याच्या परत येण्याची वाट आई एकसारखी पाहात राहिली.

आतां उन्हाळ्यालाही सुरवात झाली, तरी बापूचा पत्ता लागेना. आमच्या ताईला आमची काळजी होती. ती मधून मधून आपल्या प्रेमळ सासूच्या समतीनें आमच्या घरीं चिपटें मापटे धान्य आणून देई ! पण तिच्या दिराला ही कुणकूण लागली. त्यांनीं ताईचें आमच्या घरचें येणें बंद करून टाकलें ! त्याचा राग ताईवर चांगलाच भडकलेला होता मला

त्या कारणांची पुरी माहिती नव्हती. पुढें त्यांच्या क्रोधाचें कारणही समजले ती हकीगत प्रसगानुसार मी पुढें सागेन.

बापूकडील बातमी कळेना. त्यामुळें आम्हाला त्यांच्याविषयीं फार काळजी वाटू लागली. आई दिवसे दिवस खगू लागली. तिला काय होतें, हेंही मला कळेना. तीन चार दिवस घरच्या राजगिऱ्याच्या भाजीवर ती राहिली होती. मला कशीबशी ती भाकरी करुन देत असे. तीही मला अपुरी पडे. कपिला गाय जें काय अच्छेर, पावशेर दूध देई, ते सगळे आई मलाच देई ! डोळ्यात टिपे आणून ती माझ्याकडे पाही ! आई आजारी आहे व घरांत धान्याचा कणही नाहीं, हे मी जाणलें.

ह्या परिस्थितींतून कसा मार्ग काढावा, याचा मी पुष्कळ विचार केला. पण मार्ग सांपडेना.

तथापि एक दिवस पाहाटेच्यावेळीं मी जागा झालों. अरुणोदय होण्याची ती वेळ होती. हवेंतही गारवा आलेला होता. मी झटकन उठलों. आणि तडक डोंगरच्या महादेवास निघालो.

त्यावेळीं चंद्रमा डोकीवरुन पुढें कललेला होता आकाशांतील नक्षत्रें स्थिरपणे त्याच्याकडे पाहात हळू हळू त्याच्याच दिशेनें पुढें निघालीं होती. पक्षीगण जागा होऊन किलबिल किलबिल करीत घर सोडण्याच्या तयारींत होता. मी डोगरांतील महादेवाजवळ आलो, त्यावेळी माझी होणारी हालचाल जाणून खारी, सरडे सरकन झाडावरुन धावत जात असलेलें मला कळत होते. करवदीच्या जाळीजवळील घळींतील ससे कावरे बावरे होऊन पळण्याच्या तयारींत होते. सृष्टीची सारीच धावती हालचाल नजरेस पडत असतां माझ्या मनांत तसलेच कांहींतरी विचार धुमाकूळ घालूं लागले होते.

मी स्नान उरकून शंकरास एकादशिनी केली. भक्तिभावानें मी माझ्या त्या गांवच्या कुलदेवतेस नमस्कार केला. " तुझा हेतु चांगला आहे, तूं तो तावडतोब अमलांत आण. " असा आशीर्वाद कोणीतरी माझ्या डोकीवर हात ठेवून प्रसन्न अतःकरणानें देत आहे, असा मला भास झाला !

मी परत निघालों. त्यावेळीं सूर्य कासराभर वर आलेला होता. मी माझ्या विचाराच्या तंद्रींतच चाललों होतों. "गजूचें नशीबच गजूला मार्ग सुचवील." हे बापूंचे शब्द माझ्या मनात एकसारखे घुमत होते. त्या दिवशीं आम्ही रात्रीं कांहीं खाल्लें नव्हतें. फक्त आम्ही गाईचें थोडें निचरारें दूध पिऊन निजलो होतों. मला झोप आली नव्हती. रात्रभर मी विचार केला आणि ठाम निश्चय ठरविला. पहाटेस जागा होताच आईजवळ जाऊन मीं तिला म्हटलें,

"आई! मला एक उपाय सुचला आहे. येथेच राहाण्यात आतां अर्थ नाहीं. मला चार अक्षर येतातच. मीही बापूप्रमाणें एका गावाहून दुसऱ्या गावीं प्रवास करीत करीत, कोणाच्या घरीं पूजा करून, अभिषेक करून, पोट भरीत भरीत पुणें गाठतो. नंतर तेथें खूप खूप शिकतों."

आईला बोलवेना. माझा उत्साह पाहून तिला बरें वाटले. पण तिनें मला उत्तर दिलें नाहीं. फक्त माझ्या पाठीवरून हात फिरवीत मला अगदीं जवळ घेऊन ती एकसारखी रडूं लागली!

त्या दिवशीं अगदीं ठेवणींतले जोंधळे आईने बाहेर काढले. त्याच्या कण्या तिनें केल्या. परसांतली राजगिऱ्याची भाजी आणि त्या कण्या त्या दिवशीं आम्ही पोटभर खाल्ल्या. त्या दिवशींच्या अन्नाची गोडी पंच पक्वान्नानाही लाजविणारी होती!

दुसरे दिवशीं प्रभातकालीं मी जागा झालो. तावडतोब परगांवीं निघण्याची मी तयारी केली. तयारी ती कसली करावयाची? धुवून स्वच्छ केलेली ठिगळे लावलेली बंडी मी आंगात घातली. डोकीस कान-टोपी चढविली. आईनें दिलेलें एक मोठें फडकें मी कंबरेस बांधलें.

इतक्यात आईनें जलदीनें गाईची धार काढली. माझी आवडती कपिला गाय माझ्याकडे पाहून हुंकार घालीत होती. जणूं मी आतां घर सोडून जाणार, असें तिला कळलें असावें! मी तिच्यापुढें उभा राहिलों. तिची पोळी खाजवूं लागलों. गाईनें पान्हा चांगला घातला! आज तिनें रोजच्यापेक्षा अधिक दूध दिलें! आईला समाधान वाटलें.

आई त्या दिवशीं "धांवरे रामराया किती अंत पाहासी।" हें पद एकसारखें गुणगुणत होती. तिनें मला आपल्या हातानें तें सगळें दूध पाजलें. जणू तिनें तें अमृतच माझ्या पोटांत घातलें !

नतर मी आईच्या पायावर डोकें ठेविले. तिनें मला कडकडून मिठी मारली. आईच्या थोर अतःकरणाची व गाढ प्रेमाची मी शब्दानीं कशी कल्पना करून देणार ? डोळ्यांतून निघणारे अश्रु पुसीत ती खोल गेलेल्या स्वरांत बोलली---

" पोटचा गोळा पोटाकरितां दूर जातोय. जीव तिळतीळ तुटतोय. त्यांतही देवाला परीक्षा पाहावयाची असेल. तोच कर्ता करविता आहे. गजू, तूं कुठेही जा. रामच तुझा पाठीराखा राहील. रामदासांचा मी म्हणते तो एक श्लोक लक्षांत ठेव.---

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा।
पुढें वैखरी राम आधीं वदावा।
सदाचार हा थोर सोडूं नये तो।
जगीं तोचि तो सज्जना धन्य होतो।

आणि हें बघ गजू, आपली वागणूक आरशासारखी स्वच्छ ठेव. वाईट दिवस सतत का राहाणार आहेत ? येतील चांगले दिवस ! रामच तुझा सांभाळ करील. आतां आणखी काय सांगू ?---"

ह्यापुढें तिचा कंठ अतिशय दाटून आला. तोंडांतून शब्द बाहेर पडेनात. नंतर मीच मनाचा हिय्या केला आणि घरांतून झटादिशीं बाहेर पडलों. मी गावाबाहेर आलों. महादेवाच्या वाटेने चालू लागलों.

त्यावेळीं प्रातःकालचा शीतल मंद वारा वाहू लागला होता. पूर्व दिशा सोनेरी बुट्टीचा पितांबर नेसली होती. मी तिचें दिव्य तेज एकसारखें निरखीत होतों. त्या आनदाच्या भरांत माझे पाऊल वेगाने पुढे पडत होतें.

मी महादेव गांटला कुडांत स्नान करून देवाला पाणी घातलें. आणि तडक पुढचा रस्ता सुधारला.

रविराजाचा तेजोगोल माझ्या दृष्टीस पडत होता. त्याचें दिव्य तेज डोंगराच्या दरींतील वृक्षलताच्या पालवीवर खेळत होते. वेलींचीं हलतीं पानें माझें स्वागत करीत आहेत, असें मला वाटत होतें !

खिंड ओलांडून मी सखल भागांत आलों. सहा सात मैलाचें अंतर मी उत्साहाच्या भरांत तोडलें होतें. पुण्याच्या रस्त्यानें चाललों आहें कीं नाहीं, ह्याचीही चौकशी मीं केली नाहीं !

देवगाव सोडून प्रवास करण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. मी शाळेंतील पहिल्या क्रमांकाचा विद्यार्थी होतों. पण मला भूगोलाचें ज्ञान नकाशांत मोठीं गावें दाखविण्यापुरतेंच होतें. तीं गावें किती अंतरावर आहेत, प्रवास करण्याचे मार्ग कोणते आहेत; त्याकरितां प्रवासाच्या सोई कोणत्या आहेत वगैरे माहितीचा गंधही आमच्या शिक्षणांत नव्हता. मग सुपीक नापीक प्रदेश कसा ओळखावा, तेथील पिकें कोणतीं, व्यापार कसा चालतो इत्यादि माहिती शिकविण्यांत येत नसे, हें वेगळें सांगण्याची जरूरी नाहीं. त्या मानानें भूगोलचें व्यावहारिक ज्ञान सध्याच्या पिढीला मुबलक होतें, हें प्रांजलपणें मान्य केलें पाहिजे. असो.

इतक्यांत मला आगगाडीची शिटी ऐकूं आली. गाडी भकभक करीत स्टेशनांत शिरत होती. मी प्रथमच आगगाडी पाहात होतों. मला नवल वाटून मी जलदीनें स्टेशन गांठलें. मी ती गाडी निरखून पाहिली. ती मालगाडी होती ! ती माणसांच्या प्रवासाची गाडी नव्हती. तशी गाडी चार पांच तासांनीं येणार होती. पण तिकिट घेण्यास मजजवळ पैसा नसल्यामुळें मी आगगाडींत बसण्याचा मोह आवरून पुनः सडकेनें चालूं लागलों.

रामापूर गांवीं आमचे कोणी नातलग आहेत, असें आई म्हणाली होती तें गांव नकाशांत मोठ्या अक्षरांनीं लिहिलेलें असल्यामुळे मला तेथें शहरासारखी मोठी वस्ती असेल, असें वाटत होतें. तिकडे मी निघालों.

तेव्हां मोटारी नव्हत्या. सडकेनें बैलगाड्या जात येत होत्या. सडकेच्या दोन्ही बाजूस शेतकऱ्याचे मळे होते. कोठें कोठें उसाची गुऱ्हाळे चालू

होती. त्या काळीं गुऱ्हाळात कोणीही वाटसरू गेला, तर त्यास रस, ऊस शेतकरी देत असत. उसाचें गुऱ्हाळ म्हणजे बळी राजा जो शेतकरी त्याचें दानधर्माचे स्थान होय, असे लोक समजत असत. मी तर ब्राह्मणाचा मुलगा आहे, असे कळल्यानतर मला रस आणि ऊस यांच्याबरोबर गूळ आणि शेंगदाणेही मिळाले ! ते खात खात व पाणी पीत पीत मी रस्ता तोडीत होतो.

भर दुपार उलटली होती. आता मोठी सडक सपून मी रामापुरास जाणाऱ्या साध्या बैलगाडीच्या रस्त्यास लागलों. त्या रस्त्यास झाडझुड नव्हतें, वाट फुफाट्याची होती. तो फुफाटा उन्हाच्या तापाने तापलेला होता. वाटेत फारसे कोणी भेटत नव्हते. कोठे विसावा घ्यावा म्हटले, तर जवळपास वस्ती किंवा झाडी दिसत नव्हती !

आतापर्यंत माझी चाल पधरा सोळा मैलाची झालेली होती. पायांत जोडा नसल्याने पाय चटाचट पोळत होते. रामापूर किती दूर आहे, असे एकाद्या क्वचित् भेटणाऱ्या वाटसरूस विचारले, म्हणजे तो येथे कोसभर आहे, असे म्हणे. पण तो त्याचा कोस मी पुढें तास दीड तास चाललों तरी सपेना !

आता मात्र माझ्याने पाय उचलेना. उन्हाचा तडाखाही सहन होईना. वरून व खालून होणाऱ्या प्रखर उष्णतेच्या माऱ्याने मी घाबरा होऊन गेलों. डोळ्यापुढें अंधेरी येऊं आगली. पायही लटपटू लागले. एखादें झुडूप पाहून त्या खालीं टेकावें, म्हणून मी कसेतरी पाय उचलू लागलो. पण पायही काम करीनात. पोटांत अन्न नव्हते. शेंगदाणे व पाणी यांनीं पित्त भडकलें. पोटांत ढवळूंही लागलें. नाइलाज झाल्यानें मी एके ठिकाणीं मटकन बसलों. पुढें मला तेथें झोप लागली, कीं ग्लानी आली, हें मला सांगतां येण्यासारखें नव्हतें. मी बेशुद्ध होऊन रस्त्यावरच पडलों. पोट भरण्याच्या महत्त्वाकांक्षेनें निघालेला मी रस्त्यातच गळून पडलो !

  

मी गोष्ट बंद केली. त्या वेळीं माझ्या पत्नीकडे मी पाहिलें. तिच्या नेत्रातून अश्रु ओघळत होते. ती सद्गदित स्वरांत बोलली.

" काय बाई, हा दारुण प्रसंग ! अशी वेळ वैऱ्यावरही येऊं नये खरी. लहानपणी इतक्या हालअपेष्टा इकडच्यांनीं भोगल्या, हें कोणाला आतां सांगितलं तर खरतरी वाटेल का ? "

सुलभा मध्येंच बोलली, " भाऊ ! मग पुढं काय झालं ? आतांच सांगा की ! मला बाई दम धरवत नाहीं !

मी म्हटलें " आतां पुढची गोष्ट उद्यांवर. "

नंतर मी झटकन् उठून माझ्या खोलींत जाऊन पलंगावर लवंडलों. ह्या मागच्या आठवणीनें माझ्याही मनाला थकवा आल्यासारखें झालें होतें.

———

## प्रकरण एकविसावें

दुसरे दिवशी मी माझी काहाणी सांगू लागलों—

" मी डोळे उघडले, त्या वेळीं एक, दोन तीन असे दहा ठोके पडल्याचें मला ऐकू आले. ती रात्रीची वेळ होती, हे मी जाणले. माझी गुंगी पुरी गेली नव्हती. पुन्हा मला डोळे मिटून पडावेसें वाटले. माझी ही चाललेली हालचाल पाहून मला कोणीतरी औषध चाटवू लागले त्याच औषधानें मी लवकर शुद्धीवर येतो आहें, असे मला वाटलें. मी सावध होत आहें, हे पाहातांच माझ्या मस्तकावरून प्रेमळ हात फिरवीत फिरवीत, हलकेच एक व्यक्ति बोलली,

" बाळ ! सावध झालास का ! आतां तुला बर वाटतय ना ? थोडसं दूध घेतोस का ! "

मी नकळत तोंडाचा ' आ ' पसरला. अद्यापि मला बोलता येत नव्हतें. माझा मानस त्या व्यक्तीनें जाणला. आणि चमच्या चमच्यानें माझ्या तोंडांत दूध पडू लागले.

कोणी तरी माझे पाय चोळीत आहे, असे मला वाटले. सूर्याच्या तापानें प्रखरता पावलेल्या फुफाट्यानें अग्नीप्रमाणे माझे पाय भाजून काढले होते ! त्यामुळें माझे तळपाय सुजले होते. त्यांना तेल लावून ऊन पाण्याने धुवून आतां कोणीतरी त्यांना तूप चोळीत आहे, हें मीं जाणलें.

मी बराचसा सावध झालों होतों, पण मला डोळे मिटून पडावेसेंच वाटत होतें. माझ्या कानावर पुढील आवाज येत होता—

जयदेव जयदेव सुखवरदा रामा ।
मुनिजन मानस हंसा सुंदर गुणधामा ।

ह्या चरणावरून कोठेंतरी जवळच श्रीरामाची आरती चाललेली आहे, असें माझ्या ध्यानांत आलें. मीही मनांतल्या मनांत रामनामाचा जप करूं लागलों. इतक्यांत मला दूध पाजणारी व्यक्ति कांहीं तरी एकसारखी गुणगुणत होती. त्या पैकीं पुढील चरण मला चांगले ऐकूं आले.

सदा संगति सज्जनाची धरावी ।
मति दुर्मती कांहीं कोठे नसावी ॥
मनी लोचनीं रामरूपा पाहावें ।
समर्था मला पूर्ण वैराग्य द्यावें ॥

त्यानंतर मला अगदीं गाढ झोंप लागली.

पाहाटेस मी जागा झालों. सभोवतीं मी पाहूं लागलों. ती एक मोठी सर्व सोई असलेली खोली होती. त्या खोलींतील एका पलंगाला मच्छरदाणी लावलेली मला दिसत होती. त्याच पलंगावर बसून कोणीतरी गृहस्थ भूपाळ्या म्हणत बसले होते. त्यांचा आवाज गोड पण काहींसा क्षीण होता. माझ्या आंगांतील थकवा अजून गेला नव्हता. मला आणखी डोळे मिटून स्वस्थ पडावेसें वाटले. पुढील चरण मला चांगले ऐकू आले.

रामें रक्षिलें भक्तासी । रामें सोडविलें देवासी ।
राम चिंतितां मानसी । रामदासी आनंद.

* * *

उठा प्रातःकाळ झाला । अवघे राम पाहूं चला ॥
हा समयो जरी टळला । तरी अंतरला श्रीराम ॥

त्यानंतर चांगलें उजाडलें. पलंगावरून एक गृहस्थ खाली उतरले. ते गृहस्थ काळेसावळे जरा पाठींत बाक आलेले असून त्यांच्या गळ्यांत तुळशीच्या माळा होत्या. ते जरा खोकत खोकतच खोलींतून बाहेर पडले.

इतक्यांत एक शुभ्र पातळ नेसलेल्या वृद्ध पण प्रसन्न आणि निश्चयी

मुद्रेच्या आजीबाई मजकडे आल्या. त्या माझ्या आंगावरून हात फिरवीत फिरवीत म्हणाल्या,

" बाळ, तुला आतां चांगलं बरं वाटतंय ना ? "

त्या आजीबाईनींच मला औषधोपचार केला, हें मी तेव्हांच ताडलें; आणि मला उठवत नव्हतें, तरी मोठ्या कष्टानें उठून त्या मला नको नको म्हणत असतां, मी त्यांच्या पायांवर डोकें ठेवलें. आणि रडूं लागलों.

त्यांनीं मला उठविलें. आणि मृदु शब्दांत विचारलें, " बाळ, तुझं नांव काय बरं ? "

मी ' गजू ' असें सांगताच, त्यांना आनंद झालेसा दिसला. आणि त्या म्हणाल्या,

" माझ्याही गणपतीला तूं फार आवडशील. चांगला हुशार दिसतोस कीं तू ! "

* * *

माझ्या सुदैवानें त्या ठिकाणीं माझी व्यवस्था चांगली होत होती. तें एक रामापूरपासून थोडया अतरावरचें टेकडीवरील सुंदर स्थान होतें. तेथें रामाचें भव्य देवालय असून रामदासी पंथाचा एक मठही होता. रामाची पूजाअर्चा, नैवेद्य आणि आल्यागेल्याचा सत्कार तेथें यथास्थित होत असे.

दोन तीन दिवसानतर मी तेथें कसा आलों, ही हकीकत मला कळली. मी सडकेच्या कडेला बेशुद्ध स्थितींत पडलों होतों. संध्याकाळपर्यंत माझ्याकडे कोणाचें विशेष लक्ष गेले नव्हतें. ' कोणीतरी वाटसरू झुडपाखालीं विसावा घेत पडला असेल झालें ' असें फार तर कोणी म्हणून पुढें गेला असेल. पण सायंकाळच्या सुमारास एक चांगली बैलगाडी त्या रस्त्यानें चालली होती. तींत ह्या आजीबाई आणि त्याचे पुत्र गणपतराव हे बसलेले होते. त्यांच्या गाडीबरोबर एक तरुण आणि चौकस रामदासी मार्ग दाखवीत पायीं चालला होता. त्याच्या नजरेस मी पडलों.

त्यानें मला जवळ येऊन हटकलें. माझी कसलीही हालचाल त्याला आढळेना. पण मी जिवंत आहे, हें त्याने परिक्षून पाहिलें. गाडींतील त्या दयाळू माणसांना ही गोष्ट कळविली. त्यानीं तावडतोब मला गाडींत

ठेविण्याविषयीं त्या तरुणास सांगितलें. तो रामदासी व गाडीवान यांनीं मला गाडींत घातलें, आणि मठांत आणिले.

त्या गाडींत असलेल्या आजीबाईंनीं आणि त्या रामदासी तरुणानें माझी शुश्रुषा केली. त्यामुळेंच मी वाचलों.

त्या आजीबाईंचे पुत्र खरोखर साधुवृत्तीचे होते. वाटेल तो उपाय करून आणि लागेल तितका खर्च करून ह्या मुलाला आजारातून उठविण्याचा प्रयत्न करा, असे त्यानीं त्या रामदासी तरुणास सांगितलें होतें.

माझे रक्षणकर्ते गणपतराव वारकरी पंथाचे होते. पुण्याच्या ब्रह्मचारी विष्णुबोवा जोगाचे ते अनुयायी होते. त्याची पंढरीची आणि आळंदीची कार्तिकी वारी कधींही चुकलेली नव्हती.

गणपतराव हे घरचे खाऊन पिऊन सुखी होते अशा त्या सुखी पुण्य-पुरुषास सतत थोडासा ज्वर येत असे. त्या मठाचें स्थान आरोग्यदायक आहे, तेथें उन्हाळ्याचे कांहीं दिवस काढल्यास प्रकृतीस आराम पडेल, असे कोणा एका त्याच्या स्नेह्याने त्याना सांगितले. त्याच्याकडे तो तरुण रामदासीही पाठविला. त्याच्या आग्रहावरून गणपतराव मटाकडे बैलगाडींतून चालले होते. त्यानींच मला जीवदान दिलें.

बापूच्या तोंडीं नेहमीं सुभाषितातील एक चरण येत असे, त्याची रोखठोक प्रचीति मला आली.

अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितम् ।

तोच हा चरण होय. खरोखर दैवयोगानेंच माझे रक्षण झाले. नाहींतर तशा मूर्छित स्थितींत मला जनावरांनीं तुडविलें असते, किंवा रात्रीच्या वेळीं एकादी गाडी माझ्या आंगावरून गेली असती, तर मी जिवतच राहिलो नसतो !

मला खडखडींत बरे होण्याला आठदहा दिवस लागले. त्या गणपत-रावांचें टोपण नाव मामा असे होतें. पुढे मी त्या मामांची मनोभावे सेवा करूं लागलों.

*   *   *

मला आता माझ्या आईवडिलांचें नित्य स्मरण होत असे. मला तेथें गोड घास मिळत होता, पण माझ्या घरची स्थिति मला कळली नसल्यामुळें तो घास माझ्या घशाखालीं उतरणें कठीण पडत होतें. घरच्या विवंचनेनें माझें मन व्याकुल होऊन जाई. त्या सहृदय मामानीं माझी सारी करुण कहाणी ऐकली. त्यानाही वाईट वाटलें. घरीं पत्र लिहून तपास करण्याचा मार्ग त्यांनीं मला चोखाळण्यास सांगितलें.

त्यावेळीं फक्त एका पैशास पोस्टाचें कार्ड मिळत असे. तें छोटें कार्ड लिहून त्यावर पत्ताही मी काळजीपूर्वक लिहिला. टिळकाना लिहिलेल्या पत्रानें जशी माझी फसगत केली, तशी होऊं नये, ह्याकरिता मी फार खबरदारी घेतली.

पण त्या पत्राचे उत्तर लवकर येईना. मी दररोज पोस्टमन आला कीं, त्याच्याकडे उत्सुकतेनें पाही. पण प्रत्येक दिवशीं माझी निराशा होई. मी आता आठ दिवसानीं पत्र पाठवूं लागलो. शेवटीं, एका महिन्यानें मला बापूचे पत्र आले. तो दिवस मला फार भाग्याचा वाटला.

ते पत्र सगमवाडीहून आलेलें होते. तें ठिकाण दूरच्या एका संस्थानांतील खेडेगाव होतें. तेथें पोस्टाची सोय नव्हती. आठवडयातून एखाद्या दिवशीं तेथें टपाल मिळत असे; आणि पोस्टमनच्या मर्जीवर पत्राचा बटवडा अवलबून असे. एखाद्या पत्राकरिता पोस्टमनला दूरच्या गावीं जाणें कष्टदायक वाटे, त्यामुळें अशा पत्राची विल्हेवाट सुचेल त्या मार्गानें त्याला करण्याचा मोह होई. साराश, माझ्या पत्रापैकीं एकच पत्र अखेर बापूंना मिळालें. त्यानीं त्यानंतर पोस्टाच्या गावीं जाऊन मला पाकिटातून पत्र लिहिले. ते पत्र मी फार जपून ठेविलेलें आहे. त्यातले मोडी अक्षर किती सुंदर आहे, तें पाहा.

असे म्हणून मी माझ्या पेटींतून काढून आणलेलें बापूंचें पत्र मुलाच्या हातीं दिलें, त्यावेळीं शिवानंद म्हणाला,

“ भाऊ ! मोत्याच्या ओळीसारखें किती सुंदर अक्षर आहे हें ! फ्रेम करून ह्या पत्राची जपणूक केली पाहिजे. मी उद्याच हें फ्रेमींत बसवून आणतों. ”

सदानद म्हणाला, " भाऊ ! तुमचे अक्षर असेंच आहे कीं ! आजोबांचाच कित्ता तुम्ही गिरविला वाटलं ! त्या वेळीं अक्षर घटविण्यावर फार लक्ष असे, हें खरें दिसते "

पत्र पाहून सुलभा म्हणाली, " पत्रांतलें अक्षर छान आहे, खरं. पण तें वाचता कुठे येतेंय आम्हांला ? चागल बालबोध पत्र असतं, तर मी वाचलं असतं तें ! "

तें मोडींतील पत्र कोणासच वांचता येईना. शाळातून मोडी लिपीकडे दुर्लक्ष झाल्याचा हा सारा परिणाम होता. शेवटी माझी पत्नी म्हणाली,

" इश्श् ! सुलभा, किती वेळ पत्र पाहात बसणार. आतां त्यानाच त्यांत काय लिहिलय, ते सांगू द्या कीं ! "

मी म्हणालों, " आतां आपण पुष्कळ शुद्ध लिहितों. बालबोध लिपींत लिहिलें, म्हणजे शुद्धाशुद्धतेकडे जास्त लक्ष द्यावें लागतें. मोडी लिपींत तितकी काळजी घ्यावी लागत नाहीं. ह्रस्व, दीर्घ,अनुस्वार, विरामचिन्हें ह्यांचें बधन त्या लिपींत कमीच आहे. बापूच्या पत्रांतील पाहिला मायनाच केवढा लाबलचक आहे ! आता थोडक्यात ' अनेक आशीर्वाद ' असा मायना लिहिला, कीं काम झालें.

ह्या पत्रातील मुख्य मजकूर असा आहे--

" तुझी खुशाली कळली. तुला लाभलेले श्रीमत मामासाहेब म्हणजे गजेद्राला सकटांतून मुक्त करणारे शखचक्रगदाधारी विष्णुच होत. त्यांना आमचा कृतानेक प्रणिपात सांग.

संगमवाडी गावांतील श्रीमत धोंडीराव पाटलांनीं आमची चांगली बरदास्त ठेविली आहे. गाव सुपीक आहे. आम्ही येथें मारुतीची पूजा करून पुराण सांगतों. ती गांवांत औषधपाणी देते.

चिरंजीव ताईचें दुःख सांगतां येत नाहीं, असें आहे. तिच्या दिरानें वज्रटीकेच्या बाबतींत तिला फार छळलें. आमच्याबरोबर तिला आणावें लागलें. तिचा दागिना सोडवून आणावा, अशी खटपट तुझी आई करीत आहे.

तूं इकडे एकदां ये. तुला धोतरे नेसलेला पाहावा, अशी माझी इच्छा आहे. आजारानें येथेंही मला बेजार केलेले आहे.

तेथील साऱ्या लोकांबरोबर नम्रतेने वाग. रोजचें वेदाध्ययन सोडूं नको. लवकर लवकर शीक. इग्रजी शिक्षण मिळीव.

आता हात कांपतो आहे. जास्त लिहवत नाहीं.

कळावें, हा आशीर्वाद. ''

बापूंच्या या पत्रामुळें मला तिकडील स्थिति कळली. आमच्या रामापुरापासून संगमवाडी किती तरी दूर होती. मी तपास केला, तेव्हां मला कळलें कीं, त्या गांवीं जाण्यास धड गाडीरस्ताही नव्हता. इतकें तें गांव एका बाजूस होते.

मामांच्या आईना सर्वजण थोरल्या आई म्हणत असत. त्यांची व मामांची सेवा मी मनोभावें करीत होतों. त्यामुळें थोरल्या आई माझ्यावर मुलासारखें प्रेम करूं लागल्या. दासबोधाचें अध्ययन आणि रघुवंशाचें पठण मी रामापूरच्या रामदासी मठांत करूं लागलो.

पण सर्व गोष्टींत माझे मन पुरें रमेना. आईच्या आठवणीनें, ताईला झालेल्या छळाने आणि बापूंच्या आजारानें माझें चित्त व्याकूळ होऊन गेलें.

पण रामापुरात संपादन झालेली मामाची कृपा, थोरल्या आईची प्रेमळ आपुलकी व रामदासी मठाचें नवे आकर्षण, ह्यामुळें ताबडतोब रामापूर सोडून जाण्याचें मला जमेना. कर्मधर्मसयोगामुळे मामासारख्या सत्पुरुषांचा लाभलेला आश्रय व सहवास माझें बरेंच करील, असा जोरदार विश्वासही मला वाटूं लागला !

---

## प्रकरण बाविसावें

मी नऊ वाजता आल्याबरोबर सुलभा मला म्हणाली,

" भाऊ ! तुमचा तो रामदासी मठ आम्हाला केव्हातरी दाखवा. जेथें तुम्हाला जीवदान मिळालें, ती पुण्यभूमि पाहावी, असं मला फार फार वाटत. मी त्याच मठात आहे, असच स्वप्न रात्रीं मला पडल की ! "

" मनीं वसे, तें स्वप्नीं दिसे." माझी पत्नी हसून बोलली. " अग ! तुझे वडील जगभर हिंडले आहेत. जिवावरचे असे प्रसंग त्याना त्यांच्या आयुष्यात कितीतरी आलेले आहेत. मग तीं सारीं ठिकाणे तूं पाहाणार कशीं ? "

" आई ! सुलभा म्हणते, तसेच मला वाटते. " शिवानंद म्हणाला, " त्या रामदासी मठात भाऊचा पहिला पुनर्जन्म झाला. त्यांच्या त्या वेळच्या साहसाला यश लाभले. आयुष्याला नवी कलाटणी मिळाली. म्हणून तर तो मठ पाहिलाच पाहिजे. त्या मठाला आपण मोठी देणगी देऊ; आणि भाऊचा फोटो पण तेथे ठेवू. "

" बर ! पुरे झाली असली चर्चा ! " मी म्हटलें. " तुमच्या भाऊची अशीं स्मारकें करण्याच्या मोह तुम्ही आवरा. मी सागत असलेल्या माझ्या अनुभवातून पन्नास वर्षांपूर्वीचे समाजजीवन कशा प्रकारचे होतें, याची तूर्त माहिती घ्या. माझ्या आयुष्यातील गुंतागुंतीच्या साऱ्या घटना ऐकून तरी प्रथम घ्या ! "

" बर ! " सदानंद म्हणाला. " भाऊ सागा तुमची हकीकत ! मग काय करायचं ते आमचें आम्ही पाहू ! तोंडाची वाफ वायफळ कशाला दवडावयाची ?

मी सांगूं लागलो--

त्या रामदासी मठात मामा आणि थोरल्या आई यांच्या सेवेत माझे दिवस जाऊं लागले. मला तेथे येऊन पाच महिने झाले होते. त्या वर्षी जिकडे तिकडे पाऊस पडून दुष्काळही हटला होता. बाबू मोरे, गुरव वगैरे मित्रांची मला आठवण होत होती. संगमवाडीस जाऊन आई वडिलांना भेटावें, नंतर देवगावासही जाऊन यावें, असें माझ्या मनानें घेतलें. मध्यंतरी बाबू मोरे यांचे एक पत्र मला आलें होतें.

इतक्यात सुलभा म्हणाली, " भाऊ! बाबूरावाचें पत्र तुम्ही बापूंच्या-सारखे जपून तर ठेवलें नाहीं ना ? "

मी म्हटले, " बापूंचें पत्र मोडी अक्षराचा उत्कृष्ट नमुना कळावा, म्हणून तें मी जपून ठेविलें होतें. बाबू मोरे यांचेंही पत्र तसें ठेविण्यास हरकत नव्हती. कारण तें ओबडधोबड भाषेंत असले, तरी माझ्या गावच्या मित्राचें पहिले पत्र म्हणून त्याला महत्त्व होतेच. त्या पत्रातील साराश मला आठवतो, तो असा होता—

' गजू! तूं येथून गेल्यापासून तुझ्या मित्राना फार चुकल्याचुकल्यासारखें वाटते. आम्ही सारे आमच्या माडीवर मधून मधून जमतों. तुझी आठवण आम्हाला फार होते. दुष्काळामुळे तुझ्या घराची दुर्दशा झाली, हे तू येथून गेल्यानतर बाळू खरे, इंगळे वगैरे तुझ्या शेजाऱ्यापाजाऱ्याकडूनच आम्हाला कळत आहे. त्यापूर्वी आम्हाला तुझ्या घरची इतकी माहिती नव्हती.

तुझें धर एका आळींत आणि आमचीं घरें अगदीं दूरच्या आळींत. त्यामुळें आमच्या घरच्या लोकाचा निकट संबध तुमच्या आळींतील लोकाशीं येत नव्हता ! नाहींतर, माझ्या वडिलांनीं तुला घरातून जाऊ दिले नसतें ! त्यानीं वाटेल ती मदत केली असती ! कष्ट करून आमच्या मळयात जें काहीं पीक येतें, त्यात आमची गुजराण होते. तुलाही चार घास आम्ही दिले असते. आम्हा सर्वांना तूं आमच्याचपैकीं वाटत होतास.

आम्ही तुझ्या घरीं येत असूं, तेव्हा तुझी आई आम्हाला आनंदात दिसावयाची. तिच्यांत दुर्मुखलेपणा कधींही दिसायचा नाहीं. तूं कोठें गेलास, म्हणून आम्ही चौकशी केली, तेव्हा तुझी आई आम्हाला म्हणाली,

'तूं मावशीच्या गांवीं गेलास!' नंतर चार पांच दिवसांनीं तुझे बापू आले. आणि पुढें दोन तीन दिवसांनीं तुझ्या घरातलीं, सारींच माणसें निघून गेलीं! आम्ही बुचकळ्यांत पडलों. त्यानंतरच सर्व उलगडा झाला!

पण गजू! तू आता इकडे ताबडतोब आलें पाहिजेस. पाऊस पडून दुष्काळ हटला आहे. सगळे रान कसें हिरवेंगार होऊन गेलें आहे. पिकें जोमांत आहेत. तू इकडे ये. आम्हाला तुझ्याशीं पुष्कळ बोलायचे आहे.

आपले गुरुजी बदलून गेले आहेत. आतां एक फार मारके गुरुजी आले आहेत. बाळू खऱ्यांच्या वाडयांत ते राहातात. शेताचीं कामे आतां फार आम्ही आता शाळेला रामराम ठोकला आहे! साऱ्यांना शेतात राबावें लागते. गुरें सांभाळावीं लागतात. आता सुगी आली कीं, हुरडयाची मजाच मजा! तू लवकर आलें पाहिजेस. तुला महादेवाची शपथ आहे. अगदीं लवकर ये."

* * *

बाबूच्या या पत्रानतर माझ्या मनाची तळमळ फार वाढली. संगमवाडीस आईची भेट घेऊन नतर देवगांवास केव्हा जाईन, असे मला होऊन गेले. पण ती गोष्ट लवकर जमून येण्याचें चिन्ह दिसेना. कारण लवकरच आमचा मठांतला मुक्काम हलून आम्ही मामाच्या आनंदपूर गावीं गेलों.

आनदपूर हें गांव नांवाप्रमाणें खरेंच आनंद वाटण्यासारखें होतें. गांव कृष्णा नदीच्या कांठीं होतें. त्या गावीं पवित्र नदीचे पात्र बारा मास भरलेले असे. कारण, तेथे त्या नदीस खोल डोह होता. त्या डोहांतून पार जाण्यास आंबेकऱ्याची नांव असे. नदीच्या पात्रांतुन नावेंत बसून हिंडण्याचा आनद मला येथेंच प्रथम लुटावयास मिळाला! पावसाळा सपून गेल्यामुळें नदीचें पाणी स्वच्छ होतें. तेथें नदीला जागोजाग घाट बाधलेले होते. प्रातःकालीं घाटावर स्नान करून सूर्याला अर्घ्य देणारा वर्ग तेथें दिसून येत असल्यामुळें थोडयाच दिवसांत ती सवय माझ्याही आंगवळणी पडली.

आनदपुरांत पुढें मी दोन तीन वर्षे राहिलों असल्यामुळें तेथील विविध अनुभव व घटना मला सांगावयाच्या आहेत. आतां मी एवढेंच सांगतों कीं, तो गांव एक सुखी गांवांपैकी होता. गावची जमीन काळीभोर

असून कृष्णेला मिळणाऱ्या एका नदीला धरण बांधून ते त्या गांवच्या शिवारांत खेळविलें होतें. त्यामुळें त्या गांवच्या जमिनींत काय, किंवा कृष्णेकांठच्या मळ्यांत काय, अक्षरशः सोनें पिकत असे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नव्हता.

मामांचें घर गांवच्या मध्यभागीं होतें. त्या गांवीं घरदाज मराठे आणि ब्राह्मण यांची वस्ती शेंकडों वर्षांपासूनची होती. गांवांतील मोठमोठे वाडे डोळ्यांत भरण्यासारखे होते. मामा हे वारकरी पंथाचे असल्यामुळे त्यांच्या घरीं चालणाऱ्या रात्रींच्या पचपदीस वारकरी संप्रदायांतील मराठे, ब्राह्मण वगैरे सर्व वर्गांचे वारकरी जमत असत.

मामांच्या दुपारच्या ज्ञानेश्वरीच्या प्रवचनास घरदाज मराठे आवर्जून येत असत त्यांच्या जमिनींची मशागत ब्राम्हणांच्या जमिनीप्रमाणें कुळेंच करीत. बी बियाणे, खत, औतें वगैरेंना लागणारे भांडवल सढळ हातानें पुरविणें आणि उमद्या घोडयावर स्वार होऊन शेतवाडीची देखरेख करणें, एवढीं कामें हे लोक निरलसपणे करीत असत.

मला एक दोन महिने तेथें कुरकूर न करितां काढावे लागले. कारण माझ्या आवडीचें आमीष मला तेथे मिळू लागलें. मामांचे चिरंजीव कृष्णराव नुकतेच वकिलीची परीक्षा पास झालेले होते मामांची प्रकृति तोळा मासा अशी असल्यामुळें व घरचेच ते सुखी असल्यानें कृष्णरावांचा मुक्काम तेथेंच होता. मामांची व थोरल्या आईची मी मनोभावें सेवा करीत आहे, हे पाहून माझ्यावर त्यांचाही लोभ जडला आणि त्यांनीं मला इंग्रजी शिकविण्यास आरभ केला. माझ्या वडिलांची इच्छा मी इंग्रजी शिकावें, अशी होती. ती आयतीच येथें फलद्रूप होऊं लागली. ही गोष्ट मला माझ्या भाग्याची वाटली.

दिवाळीपूर्वी मी संगमवाडीस जाण्याविषयीं हट्टच धरला. थोरला आईना तो पटला. माझ्या आईच्या मनाची स्थिति कशी होत असेल, हें त्यांनीं जाणलें; आणि त्यांनीच माझ्या प्रवासाची तरतूत केली.

मी मामांचे तळपाय तूप लावून चोळी आणि थोरल्या आईचे पाय रगडीत असे. घोडयावरून एकाद्या वेळीं नदीच्या पाण्याच्या एक दोन माकणीही आणून

टाकी. शिवाय कृष्णराव सांगतील ते काम मी तत्परतेनें करी. बापूंनीं मजकडून लहानपणीं पाठ करून घेतलेल्या श्लोकापैकीं पुढील श्लोकाची प्रचीति मला तेथें आली.

सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं ।
सदा सर्वदा सत्यवादी विवेकी ॥
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

माझ्या वागणुकीनें सर्वांची माझ्यावर अत्यंत मर्जी बसली. मी संगमवाडीस जाण्याकरिता निघालों, तेव्हा माझ्या घरच्या माणसानाही काहीं ना काहीं मदत व्हावी, ह्या जाणिवेनें सर्वांच्या संमतीनें थोरल्या आईनीं माझ्या पडशींत पुष्कळ वस्तु भरल्या.

त्यानीं मला घोडें दिले. मला घोड्यावर बसण्याचा सराव होता. मी एकटाही घोड्यावरून गेलों असतो, परंतु मी लहान असल्यामुळे माझी काळजी वाहाण्याकरिता मजबरोबर त्यानीं आपला इमाम नावाचा गडीही दिला. मी लवकर परत यावें, असाही त्यात त्या घरच्या माणसाचा हेतु असण्याचा संभव होता.

इतक्यात माझी पत्नी साशंकतेनें बोलली,

" अग बाई ! इमाम नाव मुसलमानातले आहे की ! आणि चांगल्या ब्राह्मणाच्या घरात त्यावेळीं मुसलमान गडी होता ? नवल वाटते मला ! "

" बरे विचारलेत. " मी शांतपणे म्हणालों. " पन्नास वर्षांपूर्वी तरी बऱ्याच ठिकाणीं मुसलमानाना कमी समजत नसत. आणि ते मुसलमानही फार अदबीने आणि प्रामाणिकपणें वागत असत. देशावरच्या भागातील बहुतेक मुसलमान मूळचे स्थानिक मराठेच होत. त्यांच्या घरीं त्यांच्या जुन्या भाऊबंदाप्रमाणें देवदेवताही असत. त्यांच्या धार्मिक शिक्षणात कडवेपणा मुळीच नसे. त्यामुळें मराठ्याच्या व मोठमोठ्या घरंदाज ब्राह्मणाच्या घरातही विश्वासानें काम करणारे मुसलमान नोकर असत. तशाच पैकीं मामाच्या घरीं इमाम होता ! तो मुख्यतः शेतीचें आणि जनावरें राखण्याचें काम करी.

माझा खुलासा ऐकून माझ्या पत्नीचे समाधान झाल्याचें मला दिसलें. नंतर मी सागू लागलो--

जवान घोडा आणि उत्तम प्रकारचे घोडयाचे खोगीर, शिवाय त्याच्या-बरोबर इमाम खिदमतगार अशा थाटात आमची स्वारी एकाद्या जुन्या पिढीतील सरदाराप्रमाणे मोठ्या ऐटीत मार्ग क्रमू लागली. दोन दिवसांनीं आम्ही संगमवाडी गाठली.

आतां आईवडिलांना केव्हा पाहीन, असे मला होऊन गेलें. घोडयावर बसून येणारा मुलगा कोणातरी थोरामोठयाचा असावा, असे त्या खेडूतांना वाटले.

माझा घोडा गांवात शिरताच प्रथम गांवांतील कुत्र्यांनीं घोडयावर भुंकण्यास आरंभ केला. त्यानंतर मुलेही मजभोंवतीं जमूं लागलीं त्या सकाळच्या वेळीं जनावरांचा शेणगोटा करणाऱ्या बायकाही डोकीवरचा पदर सावरीत माझ्याकडे पाहू लागल्या !

इतक्यात मध्येच मारुतीचे देऊळ आले. तेथे बसलेले कृशमूर्ति बापू एकदम माझ्या नजरेस पडले ! मी ताबडतोब घोडयावरून उडी मारून खालीं उतरलों आणि अगोदर मारुतीला नमस्कार करून मी लगेच बापूंच्या पायावर डोके ठेविले. बापूंनीं मला मिठी मारली. कंठ भरून आल्यामुळें त्यांच्या तोंडातून शब्द निघेना. तशा स्थितींत आम्ही कितीतरी वेळ होतो. गांवची लहान थोर माणसें आमच्याकडे कुतूहलपूर्वक पाहात होतीं !

इतकी हकीकत सागून मी थांबलो. ही जुनी आठवण सागत असतां, माझे वडील मूर्तिमत ह्या ठिकाणीं आहेत, आणि त्यांनीं मला मिठी मारली आहे, असा मला भास झाला व पुढें मलाही बोलवेना. त्यामुळें माझी कहाणी येथेच पुरी करून मी माझ्या खोलीकडे निघून गेलों.

---

## प्रकरण तेविसावें

दुसरे दिवशी माझी कहाणी मी सुरू केली. मी म्हटलें—

बापूंची प्रकृति बरीचशी क्षीण झाली होती, ते काठी टेकून उठले आणि मला शेजारच्या पाटलाच्या वाड्यात घेऊन गेले.

त्यावेळीं पाटलांच्या गोठ्यातील बैल डरकाळ्या फोडीत होते. गाई हंबरत होत्या. म्हशींची धडपड चाललेली होती. दूध काढण्याच्या चरव्या तेथील बायका घासून पुसून स्वच्छ करीत होत्या.

इमामनें पाटलांनीं दाखविलेल्या जागीं घोडें बांधलें. पाटलांनीं स्वतःच त्याच्यापुढें हिरवागार चारा टाकला आणि इमामला तोबऱ्याची तयारी करून दिली. वाड्यांतील बायकामुलें माझ्याकडे कुतूहलानें पाहात होतीं. खेडुताचा साधा आणि प्रेमळ स्वभाव मला त्यांच्या दृष्टींत दिसत होता.

इतक्यांत शभू येऊन मला लगटला. दादा! दादा! म्हणत तो माझ्या पाठीवर चढू लागला. त्याला घेऊन मी घरांत गेलों.

पाटलांनीं आम्हाला दोन चागल्या प्रशस्त खोल्या दिलेल्या होत्या. तेथील एका बाजूच्या कोनाड्यांत आमचे देव होते. त्याना मी नमस्कार केला. आणि इकडे तिकडे पाहू लागलों. आई मला दिसेना!

इतक्यांत माझी ताईच पुढें आली. ताईच्या सुंदर मुखकमलाकडे माझी दृष्टि गेली. तिचें भव्य कपाळ स्वच्छ आकाशांत चंद्रमा नसावा, असे मला भकास वाटलें. मी खाली मान घातली. एकदम माझ्या शरिरांतून दुःखाची तीक्ष्ण चमक निघून गेली! पण लगेच भानावर येऊन मी ताईला नमस्कार केला व म्हटलें,

" ताई, तूं येथेंच आहेस ! बरें झालें तुझी भेट झाली. तूं सासरीं गेलीस, असें मला वाटत होतें. बापूंच्या अलीकडच्या पत्रांत तसें कांहीं स्पष्ट नव्हतें. पण आई कोठें आहे ? दिसत नाहीं ती ! कसल्या तरी कामाला बाहेर गेली कीं काय ? "

मी काळजींत पडलों. उदासपणें इकडे तिकडे पाहूं लागलों. ताई न बोलतांच आपल्या उद्योगाला लागली आणि थोडयाच वेळात सर्वांच्या पुढें दुधाचे पेले ठेवीत ती बोलली,

" असा घाबरू नकोस गजू ! आई परवांच देवगांवला गेली आहे. घराकडे कोणी नजर टाकायला नको का ? येईल आतां परत लवकर ! चार आठ दिवस राहाणार आहेस ना तूं इथं ? "

आईची भेट झाली नाहीं, त्यामुळें मला फार वाईट वाटलें. मला तर दोन तीन दिवसांपेक्षा अधिक काळ तेथें राहाणें शक्य नव्हतें. माझ्या मनांत खिन्नता पसरली.

* * *

संगमवाडी हे छोटें गांव होतें. त्या गांवावरून पंचगंगा नदी वाहात जात होती. तेथेंच नदीस दुसरी एक ओढेवजा लहानशी नदी मिळाल्यामुळें ह्या संगमावरील गावास संगमवाडी नांव पडलें होतें. तेथें पंचगंगेचें पाणी चांगले वाहातें होतें. दुपारच्या वेळीं नदीच्या पाणवठ्यावर पाणी पाजण्याकरितां आणलेल्या गाईम्हैलाची गर्दी आणि मुलामुलींचे पाण्यांतील डुंबणें पाहून ही नदी म्हणजे पुराणांत वर्णन केलेली श्रीकृष्णाच्या गोकूळची यमुनाच असावी, असें मला वाटले !

त्या गांवावर दुष्काळाची छाया विशेषसी पडलेली नव्हती. तेथील खेडूतांच्या मुलाच्या हातांत चांदीची कडीं आणि मुलींच्या गळ्यांतील सोन्याच्या पुतळ्याच्या माळा पाहून तेथील सुखी जीवनाची मला सहज कल्पना येत होती. गांवांत दूध दुभत्याची संपन्नता असून, शेतकऱ्यांच्या मुलांना दूध, ताक, दही यांची कमतरता नव्हती. लोणी किंवा तूप हें फक्त शहरांकडे विक्रीकरितां जात असे.

बापूंचा तेथील जीवनक्रमही आरामाचा होता. त्या गांवीं ब्राम्हणांची

वस्ती नव्हती. आई आणि बापू यांचें तेथील वास्तव्य त्या लोकांना महत्त्वाचें वाटत होतें. तेथें फक्त एक मारुतीचें देवालय होतें, त्याची पूजाअर्चा बापू करीत. देवळाची स्वच्छता, आरतीचा प्रसाद वगैरेंची व्यवस्था आई ठेवी. शिवाय ती गांवच्या लोकाना औषधपाणीही देई. त्यामुळें तिची ओळख गांवांतल्या बहुतेक कुटुंबांत झाली होती. तिच्या प्रसन्न आणि अनुकरणीय वागणुकीचा परिणाम तेथील स्त्रीसमाजांवर सांस्कृतिक दृष्टयाही अनुकूल झालेला दिसू लागला होता. आईने एकाद्याच्या घरीं जायचे म्हटलें कीं, तें घर अगदीं स्वच्छ होई. गावच्या खेडूताच्या बायका अदबीने तिच्याकडे येत. आईविषयीं सर्व गावांत फार आदर उत्पन्न झाल्याची माहिती मला ताईकडून खुलासेवार कळली. माझें हृदय आनदानें भरून आलें.

रात्रीच्या वेळीं मारुतीच्या देवळांत हरिविजय, रामविजय असल्या पोथ्या बापू वाचून दाखवीत आणि त्यातील भावार्थ आपल्या गोड वाणीनें खेडूतास समजेल, अशा रितीने सागत असत.

एक दिवस मी बापूजवळ बसून पुराण श्रवण केलें. दुसरे दिवशीं त्यांनीं मला पोथी वाचावयास लावली. तींतील अर्थाचे स्पष्टीकरण बापूंनीं केलें. माझें खणखणीत वाचन पाहून सारे श्रोते माझी स्तुति करू लागले. प्रसाद वाटल्यानंतर गांवचे पाटील बापूजवळ येऊन म्हणाले,

"बापूजी! आपला गजानन बापसे बेटा सवाई होनार! तुमी आन आईनीं कसली काळजी करायची नाई. मुलगा पन लई हुशार हाय!"

आपल्या मुलाचे गुणवर्णन कोणत्या वडिलांना आवडणार नाहीं? बापूंना पाटलाच्या बोलण्यानें समाधान वाटलें व ते म्हणाले,

"शंकराची कृपा! आहेच तसा गजू चांगला हुशार! आनंदपुरास शिकतोय तो. एका वकिलांच्या घरीं आहे. ते वकील गजूला इंग्रजीही शिकवितात. आजच हा सांगत होता मला!"

"इंग्रजी शिकतोय!" पाटील म्हणाले. "तर मग तो मामलतदार होनार! मग काय कमी आहे तुमास्नी!"

मी इंग्रजी शिकत असल्याचें विशेष कौतुक बापूंना वाटत होतें. मी

दोन तीन दिवसच राहाणार असल्याबद्दल ताई कुरकुरत होती. तिला उद्देशून बापू म्हणाले होते,

" जाऊं दे त्याला ! तेथें इंग्रजी शिकतोय तो ! येईल पुन्हा ती आल्यावर तो ! "

आई येईपर्यंत मला तेथें राहावेंसें वाटत होते ताईचेंही तेच म्हणणें होतें पण इमामची निकड माझ्या मागें होती. तो केव्हां निघावयाचे, हें एकसारखे विचारीत होता.

त्याच दिवशीं योगायोगानें का म्हणाना, आईचें पत्र ताईच्या नांवानें आलें. बापूंनीं ताईला लहानपणीं लिहावाचावयास शिकविलें नव्हतें. आतांच ती शंभूबरोबर अक्षरें ओळखूं लागली होती. त्या काळीं मुली शाळेत पाठवीतच नसत. अर्थात् ते पत्र तिनें मलाच वाचावयास सांगितलें.

मी अगोदर मनांतल्या मनात पत्र वाचलें. आमच्या वर्गांतील सदू गुरव हा लिहिण्यांत हुशार होता. त्यानेंच हे पत्र लिहिलें होतें. आईनें सांगितलेला मजकूर त्यानें चांगला जुळवून लिहिला होता. त्या पत्रांतील मजकूर असा होता—

" ताई तुझ्या घरीं शांतता नाहीं तुझ्या दिराचा गैरसमज अजून मुळींच कमी झालेला नाहीं. त्यांना वज्रटीक परत पाहिजे आहे. माझ्या आजोबांनीं मला दिलेली वज्रटीक मींच तुला दिली होती. तें तुझें स्त्रीधन होतें. त्यावर तुझीच मालकी आहे, असें वाटून मी ती गुरुजीकडे गहाण ठेविली. पण त्यांचे पैसे ठरलेल्या मुदतीन न दिल्यामुळे त्यांनीं तो जिन्नस आपल्या एका दूरच्या नातलगास विकला, असे कळतें. मी थकलेल्या व्याजासह घेतलेली रकम मनीआर्डरीनें त्यांच्याकडे पाठविली. आणि कसेंही करून ती वज्रटीक परत आणा, असे त्यांना लिहिलें आहे. गुरुजी तसे कांहीं वावगें वागणारे नाहींत. ते खटपट करून आमचा जिन्नस आम्हाला देतील, असें वाटतें. पाहू या आपल्याच दैवाची पारख !

पण दैवही अगदीं हात धुवून आमच्या पाठीशीं लागल्याचें दिसतें. आम्ही गाव सोडलें परागदा झालो. ही गोष्ट आपल्या शेजारच्या नानाच्या पथ्यावरच पडली. त्यानीं दोघांच्या घरामधील भिंत पाडून तेथे दार बसवून घेतले आहे. आणि आमच्याच आडाचा वापर ते हक्काने करू लागले आहेत! अण्णानीं मला तशी परवानगी दिली, असे ते गावांत सागत हिंडत आहेत! घर फिरलें, म्हणजे घरातले वासेही फिरतात, तशातलीच ही गोष्ट झाली! अण्णानीं भाऊबंदकीच्या पायीं तिसऱ्याच्या हातावरच आडाचे उदक सोडले कीं! काय म्हणावे, याला?

हे पत्र मी पाटलाच्या नावाने पाठविलें आहे, पाटील तुलाच ते नेमके आणून देतील. तुझ्या वडिलाना यातले काहीं कळू देऊ नकोस. त्यांना त्रास होईल. प्रकृति बिघडेल.

आपला शंभू एक एक अक्षर लावून पत्र वाचील. नाहीं तर, कुणीतरी सापडेल तुला वाचायला. मी लवकरच येते. त्याना सांभाळ व घर साभाळ. गजू केंव्हा आला, तर त्याला ठेवून घे.

कळावें, हा आशीर्वाद. ”

पत्र वाचून मला नानांचा फार राग आला. आमच्या दारिद्र्याचा हा सारा परिणाम आहे. दारिद्र्य गेले कीं, सर्व कांहीं स्थिरस्थावर होईल. तेव्हां त्याकरितां आटोकाट प्रयत्न करून मी तें घालवीन आणि आई-वडिलाना सुखी करीन, असा निश्चय मनात मीं केला. त्या पत्रातील मजकूर ताईला जुजबी सागून, मी ती वेळ मारून नेली.

मला आतां तेथून निघणें भाग होते. इमामाचा लकडा माझ्या मागें लागला होता. तेव्हां तेथून परत जाण्याची तयारी मी केली व बापूना व ताईला नमस्कार करून निघणार, इतक्यात बापू म्हणाले,

“ ताई! आण ग तो धोतरजोडा! ”

ताईनें ताबडतोब धोतरजोडा आणला. तिच्या आईनेंच त्याच्या निऱ्या करून ठेविल्या होत्या. रामविजयाची पोथी वाचून संपल्यानंतर गांवच्या

लोकांनीं तो बापूंना दिला होता. बापूनीं तो माझ्याकरिता ठेविलेला होता. तीं नवीं, पातळ व सुरेख धोतरे पाहून मी म्हटलें,

" कांहीं तरी काम करून मी धोतरे मिळविलीं आहेत. तीं चागलीं घड आहेत बापू! तुमचीच धोतरे जुनीं झालेलीं आहेत. हीं नवीं धोतरें तुम्हीच काढा. "

" आई देखिल असच कांहीतरी म्हणत होती गजू! " ताई म्हणाली. " पण बापूच म्हणाले, ' गजूला रेशीमकाठी धोतरे घेतलीं पाहिजेत. पण ती मिळतील, तेव्हा मिळोत! आज हीही धोतरें बऱ्यापैकींच आहेत. हीं गजूने नेसलेलीं मी केव्हा पाहीन, असे मला झालेले आहे!' गजू, तू आलास म्हणून बापूना कित्ती कित्ती बर वाटल म्हणून सागू? ते उत्साहाने हिंडलें फिरले. पण खरं म्हणशील, तर त्यांच शरीर आजारान अगदीं पोखरून गेलेल आहे! "

ताईच्या डोळ्यात पाणी उभें राहिले. इतक्यात बापू म्हणाले,

" गप बस ताई! नाहीं रे गजू, मला कांहीं होत नाहीं. पण तुझ्या आईचे कष्ट पाहून मला फार वाईट वाटतें. आज ती देवगांवला गेलेली आहे, पण माझे लक्ष तिकडे लागलेले आहे. माझ्याकरितां किती कष्ट पडतात तिला म्हणून सागू? आणखी सारखा तुझाच ध्यास! तिनेंच धोतराच्या निऱ्या करून ठेविल्या आहेत. नेस बरें तूं! तू उपाशी पोटी घरातून बाहेर पडलास. तिच्या जिवाचें पाणी पाणी झालें! काय करणार! देव ठेवील तसे राहिले पाहिजे. पण यत्नाने दैवही फिरवितां येते. म्हणून रामदास म्हणतात ' यत्न तो देव जाणावा ' हें लक्षात ठेव. एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं—

उद्यमः साहसं धैर्यं बलं बुद्धिः पराक्रमः ।
षडेते यत्र वर्तन्ते तत्र देवः सहायकृत् ।।

हे लक्षांत ठेव. ती येथें असती, तर तिनेंच तुला हीं धोतरे नेसविलीं असतीं. तिचीच इच्छा म्हणून हीं धोतरें नेस पाहू!

बापूचे नेत्र ओले झाले होते. ताईने डोळ्यास पदर लाविला होता. मलाही गहिवरून आले होतें. मी बापूंच्या पायावर डोकें ठेवून म्हटलें--

" बापू ! नेसतो मी धोतर ! वडिल मातुश्रींचा प्रसाद म्हणून मी नेतों हीं बरोबर ! काय सांगू मी ? माझ्या मनात कालवाकालव होऊन गेलेली आहे ! आपल्या उपदेशाप्रमाणे मी वागेन. पुढचें काय बोलू ? "

* * *

मी आणि इमाम आनंदपूरला परत आलों. त्यावेळीं रात्रीचे नऊ वाजून गेलेले होते मामाची भजनाची पच्चपदी चालली होती. पाटलांनीं दिलेला भाजीपाला आणि ताईने दिलेले फराळाचे जिन्नस मी थोरल्या आईच्या स्वाधीन करू लागलों, त्या वेळीं मामांचा पुढील अभग चाललेला होता.

जोडोनिया धन उत्तम व्यवहारें ।
उदास विचारें खर्च करी ॥

मी त्या रात्रीं निजलो, पण मला चांगली झोप लागली नाहीं वडिलांचा उपदेश माझ्या मनात सारखा घोळत होता. आईची मूर्ति माझ्या डोळ्या-पुढें उभी राहात होती. मामाचा रात्रीचा सारा अभग पुन. पुनः माझ्या मनांत येत होता.

* * *

इतकें सांगून आजची कहाणी पुरी झाली, असे बोलून मी लगेच उठलो.

— —

## प्रकरण चोविसावें

आम्ही सारे एकत्र जमताच मी म्हटलें.

पन्नास साठ वर्षांपूर्वी आपल्या देशांत प्लेगोबाने प्रवेश केला, त्यावेळीं पुण्यामुंबईकडे प्रथम प्रथम त्याचा जोर फार होता. त्याची माहिती ओघाओघानें मी तुम्हाला मागें सांगितली आहे. कांहीं काळ आमच्या बाजूच्या खेडया-पाडयात प्लेगोबानें पाय पसरले नव्हते. पण दुष्काळ हटून जिकडे तिकडे सुबत्तेचीं चिन्हे दिसू लागल्यावर त्या घातक रोगाची वक्रदृष्टि आमच्या इकडच्या खेडयापाडयाकडे वळली.

मी संगमवाडीस असतानाच तेथे उंदीर पडत असल्याची ताईला लागलेली कुणकूण तिने बापूंना सांगितली होती. पण मला थोडीदेखील काळजी वाटू नये, म्हणून त्यांनी ती बातमी सत्य नसल्याचे माझ्या देखत सांगितले होते.

पण त्यानंतर नवरात्र सुरू झाले. साऱ्या घरचे देव बसले. त्याच संधीस तेथें प्लेगोबानीं पराक्रम गाजविण्यास सुरवात केली! संगमवाडीचे पाटील बापूंना रानात झोपडी बांधून देत होते. पण बापूंच्याच आग्रहामुळे ते पुन्हा देवगावीं आले. संगमवाडीच्या कृतज्ञ लोकांनीं त्यांना सहा महिने पुरेल एवढी धान्यसामुग्रीहि त्यांच्याबरोबर दिली. ह्या साऱ्या गोष्टी बापूंनीं मला पत्रानें कळविल्या होत्या. दिवाळीला तरी देवगावीं येच, असें त्यांनीं मला आग्रहपूर्वक लिहिलें होते.

पण ताईची वज्रटीक मिळवून ती घेऊनच आईकडे जाण्याचा मी मनात निश्चय केला होता. आईने गुरुजींचे व्याजासह सारे पैसे पाठविल्यामुळें त्यांच्यापुढेंही मोठा पेंच येऊन पडला होता!

ती वज्रटीक गुरुजींनीं आपल्या एका नातलगास विकली होती. आम्ही देवगांव सोडले व गुरुजींचीही बदली झाली. आतां पैसे येण्याची आशा नसल्यामुळे त्यांनीं तो जिन्नस विकला होता. पण ही थोडी त्याची घाई झाली होती. ते पैशाचे लोभी असल्यामुळें त्यांनीं त्या लोभाच्या पायीं वज्रटीकेचे टक्के केले, हे त्यांच्या हातून एका प्रकारे पाप घडून आलें

"लोभ मूलानि पापानि" या वचनाचा प्रत्यय त्या भल्या माणसाच्या ठिकाणीं आला.

आतां विकलेला जिन्नस परत कसा मिळेल, ह्या विवचनेंत मी असता एक दिवस मला एक आश्चर्याची गोष्ट आढळून आली मामांच्या सुनेच्या गळ्यांतच ताईच्या वज्रटीकेसारखी वज्रटीक मला दिसली ! पण तो जिन्नस ताईचाच आहे, याची खात्री करून देण्यास मजजवळ कांहीं साधन नव्हतें. थोरल्या आईजवळ ही गोष्ट काढावी, असें माझ्या मनात एकदां आलें. पण ती गोष्ट योग्य होणार नाहीं, असेंही वाटून तसे करण्यास माझे मन कचरले. गुरुजींच्या मागें एकसारखा लकडा लावला, तरच कार्य साधण्याचा संभव होता.

देवगांवाहून बापूनींच खडसावून गुरूजींना एक पत्र लिहिले असल्याचे मला कळले. बिचारे शाळामास्तरच ते ! ते घाबरून गेले आणि तडक आनंदपुरास आले !

मामांच्या घरीं मला पाहून गुरुजींना समाधान वाटले. बऱ्याच वाटा-घाटीनतर गुरुजींच्या केविलवाण्या विनतीमुळें कृष्णराव वकिलांनीं तो जिनस गुरुजींकडून रोख रुपये घेऊन त्यांना परत दिला ! त्यानीं तो ताबडतोब माझ्या स्वाधीन केला ! त्यावेळीं सर्वांना आश्चर्य वाटलें ! मी त्या वज्रटीकेची सारी कथा त्याना सागितली. तेव्हा थोरल्या आई म्हणाल्या,

"गजू बाळ ! आम्हांला तूं हें अगोदर का नाहीं सागितलस ? वज्रटीक सुंदर आहे, हें खर, पण तिच्या मागें दुःख, त्रास आणि छळ आहे, असे कळतं, तर मींच ती तुला दिली असती कीं !"

" आई ! " मी म्हणालों, " पण वहिनींच्या गळ्यांतला जिन्नस आमचाच आहे, असं मीं कसं म्हणावें ? येथील अन्नच इतकं पवित्र आहे कीं, कसलाही संशय एकाद्याच्या मनात येणें म्हणजे ते माठें थोरलें पापच आहे ! "

" पण माझ्या हातूनच चूक घडली. " गुरुजी पश्चाताप पूर्वक बोलले. " गजूच्या घरचें अठराविश्वे दारिद्र्य मला ठाऊक होते. पैसे येण्याची आशा मला तर दिसत नव्हती. म्हणून हा जिन्नस मीं विकला. त्यांत माझाच अपराध झाला. गजूची आई साध्वी आहे तिची प्रतारणा माझ्याकडून व्हावयास नको होती. चुकलं खरं. गजू ! तू शाहाणा आहेस. माझ्याकरिता तू तुझ्या आईची क्षमा माग. तिला माझा नमस्कार सांग सांगशील ना ? "

बिचाऱ्या साध्या वृत्तीच्या माझ्या गुरुजींना भडभडून आलें. आणि माझ्या आईला करावयाचा नमस्कार त्यांनीं तेथूनच वाकून केला !

सारे जण गुरुजींकडे टकमकां बघू लागले.

* * *

आता ताबडतोब गावीं जाऊन आईच्या स्वाधीन ती वज्रटीक करावी, अशी उत्कंठा मला लागून राहिली पण तेथून मला लवकर पाय काढतां येईना. इमाम आणि घोडे देण्याची मामाची हरकत नव्हती, पण तितक्यात मामाची प्रकृति अधिक बिघडली आणि आनंदपुरातही प्लेगने प्रवेश केला. त्यामुळें दिवाळीलाही मला देवगावीं जाता आलें नाहीं, आणि विशेष गमत अशी कीं, ' तू तूर्त इकडे येऊ नकोस ' असें बापूचेंही पत्र आलें !

पण देवगावीं कांहीं तरी घोटाळा झाला असला पाहिजे, असें माझें मन मला आतून सांगू लागलें आनंदपुरास आता आम्ही झोपडींत राहात होतों तेथें मामांना माझी अधिक आवश्यकता होती. इमाम शेतकामात गुतलेला होता. त्यामुळें मनात असूनही मला तेथून हलता येईना.

पण त्याच सुमारास मला कसलें तरी भीतिदायक स्वप्न पडलें; आणि त्यामुळे मी फार घाबरलों; आणि दुसऱ्या दिवशीं थोरल्या आईंना माझ्या मनःस्थितीची कल्पना आणून दिली; आणि मी पायींच देवगावास जाण्याचें प्रस्थान ठेविलें.

चालत चालतच दोन दिवसांत मी डोंगरातील महादेवापर्यंत आलों. ती वेळ संध्याकाळची होती देवाची पूजा सदू गुरुवाच्या घराकडे होती. तो तेथें मला दिसला. मी त्याला अक्षरशः कडकडून भेटलों; आणि बोलत बोलत गावाकडे निघालों.

सदूनें माझ्याजवळचें सामानाचें गाठोडें आपण घेतलें आणि आम्ही दोघे वाट तोडू लागलों. सदू घुम्यासारखा माझ्याबरोबर चालला होता. त्याला पुष्पळ बोलावयाचें होतें, असें त्याच्या चेहऱ्यावरून व मनाशींच त्याच्या पुटपुटण्यावरून मला वाटत होते. पण बोलण्यास कसा आरंभ करावा, हेंच त्याला कळत नव्हते, असे मला वाटले. ह्यासाठीं इकडे तिकडे पाहात मीच बोलण्यास सुरवात केली. मी म्हटलें--

" अरे ! यदा पीक तर बेसुमार आलेले दिसतय ! "

" यदाच पीक सव्वा रुपया आलय. " सदू कष्टाने बोलला. " पण तें खाणार कोण ? ह्या पिकाची काढणी तरी करण्यास कोण कोण राहील, देव जाणे ! "

त्याच्या बोलण्याने मी बुचकळ्यात पडलों. गावानजीक आम्ही आलों, तों जिकडे तिकडे झोपडया दिसू लागल्या ! फारसा गोंगाट ऐकू येत नव्हता. मी एकदम घरीं जाऊ नये, असे त्याचे मत पडलें. त्याच्या झोपडींत राहून मग सकाळीं घरीं जावें, असे तो म्हणत होता. तेव्हा मी त्याला म्हटले,

" सदू ! प्लेगच्या भीतीने गावात जाऊ नये, असें तू म्हणत आहेस, हें मला समजते. पण सदू ! आईला केव्हा भेटेन, असें मला होऊन गेलेलें आहे ! चल प्रथम घरींच जाऊ. "

माझ्या आईचे नाव निघाल्याबरोबर सदूला किती किती बोलू असें होऊन गेले. तो म्हणाला,

" काय सागू गजू ! तुझ्या आईनें गावावर केवढे उपकार केले आहेत ते ! त्याचें स्मरण झाले कीं, कट दाटून येतो. बोलवत नाहीं ! "

मला सदूचें बोलणें कळेना. मी गोंधळून गेलो. थोडया मी म्हटलें,

" सदू ! बसूं या येथल्या एकाद्या धोंडयावर ! माझी आई येथें आल्यापासून काय काय घडलें, तें सगळें साग ! सांग लवकर ! "

" सागतों, सारी हकीकत ! " सदू कठ साफ करून बोलला– " तुझ्या आईला येथें येऊन महिना दीड महिना झाला. त्यावेळीं पावसानें बहार केली होती. पिकें जोमात वाढलीं होतीं. आतां दुष्काळ गेला, देवानें आमचें गाऱ्हाणं ऐकलें, असें जो तो म्हणूं लागला, साऱ्यांची तोंडें आनदानें फुललीं !

पण देवानं दिलेलं पोटात जाईपर्यंत आपल कसं म्हणायचं ? इतके दिवस आपल्या गावाकडे प्लेगोबानं ढुंकूनसुद्धा बघितलं नव्हतं. सुकाळ होतो, असे दिसतांच रोगाचे निशाण आमच्या गावीं फडकूं लागलं. उंदीर पडण्याचा झपाटा सुरू झाला !

जुन्या मताचे लोक काय नशिबात असेल, तें होईल असें म्हणत गावातच राहिले. ज्याच्याजवळ चागली माया होती, त्याना चोराच्या भीतीने गाव सोडवेना.

सुशीत शेतकरी गावाबाहेर असतातच. ते पटापट बाहेर निघाले. शेतात राहू लागले. अडाणी सणगर–धनगराना तुझ्या साऱ्या मित्रानीं आग्रह करून बाहेर काढले. जे लोक गावात राहिले, त्यातले फार मेले ! बाळू खरे परगावीं गेला होता. पण नानाच्या घरचीं सारीं माणसें दगावलीं ! फक्त नानाच कसेबसे जिवत राहिले ! त्या कुटुबासाठीं तुझ्या आईने जिवापाड कष्ट केले, पण यमाच्या घरच बोलावण कोणाला सुटत का ? "

" पण ! पण ! सदू ! साग मला आधीं ! " मी त्याला अत्यत घाबरेपणानें विचारले " माझी आई, माझे वडील, सारे खुशाल आहेत ना ? मला अलीकडे त्याचे पत्र नाहीं. काहीं देखील कळलें नाहीं. बोल लवकर ! बोल कीं ! "

सदू जरा स्वस्थ बसला. माझ्या पोटात काळजीचा गोळा उठला. मी अत्यंत अधीर झालों; आणि सदूला गद्गद हलवीत म्हटलें,

" सदू ! तू असा गप्प का ? साग काय असेल ते ? "

" गजू ! " सदू पुढें बोलूं लागला. " तुझ्या घरची सारीं माणसे आतां-पर्यंत देवाच्या दयेने खुशाल आहेत. तुला इकडची हकीकत अगदीं कोणीच

कळविली नाहीं, असें दिसते. आम्ही तुझे सारे मित्र तुझ्या घरची चौकशी करून येत असतों. गजू, आपली मैत्री बेगडी नाहीं. जिव्हाळ्याची आहे. तुझी आई, आम्हां सगळ्याना आपलीच आई वाटते. तिचा प्रेमळपणा किती सांगावा ? आमच्या गावाला तर तिनें ऋणी करून ठेविले आहे ! ”

“ सदू ! ” मी मध्येंच म्हटले, “ तुम्ही सारींच मुलें आमची स्तुति करितां. माझ्या आईची योग्यता मला कळते. पण अशा भयंकर दिवसांत तिला गावावर प्रेमाची पाखर कशी घालता येणार ? घरच्या माणसाचीच काळजी घेता घेता तिच्या नाकीं नऊ येत असतील ! मग तू सांगतोस तसलीं कामे तिला झेपतील तरी कशी ? शिवाय आमची गरिबी जेथे तेथे नडत असेल कीं ! ”

“ गजू ! तूं येथे नव्हतास, म्हणून तुला असे वाटायचेंच. ” सदू अगदीं जिव्हाळ्याच्या स्वरांत बोलू लागला. “ तुझ्या घरची गरिबी आता जग-जाहीर झालेली आहे. तुझी आई कष्ट करून जगते, हेही तुमच्या शेजाऱ्या-पाजाऱ्याना पाहावत नव्हते, हेही खरे ! पण ह्या प्लेगोबाने साऱ्याच्या नजरेत दिव्य अंजन घातले. त्यांतले त्यात गरिबाच्या सेवेने तिच्या मनाचा मृदु-पणा दुष्टाना देखील कळला ! म्हणून तर तुझ्या आईची वाखाणणी सारे करितात. तोंड देखले मी बोलत नाहीं, गजू !

आणखी असे पाहा, तुझे वडील आजारी घरी पडून आहेत. त्यांची सेवाचाकरी तुझी ताई व आई ह्याच करितात. एवढा रोगाचा कहर पण घरच्या आजारामुळें त्याना घर सोडून आमच्या सागण्याप्रमाणें झोपडींतही जातां येईना. पण तुझी आई मनाची अत्यंत खंबीर, रोगाची भीति तिच्या मनाला शिवत देखील नाहीं ! प्लेगचा रोगी भयंकर असतो हे तुला माहीत असेल. अशा रोग्यापासून जो तो दूर दूर पळतो. पण अशा रोग्याचे पथ्यपाणी तुझी आई बेधडक करिते ! ती सारखी गांवभर वावरत असते ! कोणी आजारी पडलें कीं, ती धावलीच ! आपला जीव धोक्यांत घालून अशी सेवा कोण बरें करील ? तुमच्या शेजारच्या नाना खऱ्याच्या माणसांना तरवणी घालणारी तुझी आईच ! शत्रु व मित्र असा भेद तिच्या मनाला शिवला देखील नाहीं !

आम्ही तुझे मित्र गांवाबाहेर पहिल्यापासून राहिलों आहोंत. आम्ही आळीपाळीनें तुझ्या घरीं जाऊन येत असतों. आमचीं घरचीं माणसें गांवांत जाण्याबद्दल आमच्यावर रागावतातही ! पण तींच तुझ्या घरीं काय कमी पडेल, ते पोंचवितात त्याचाही उपयोग आई दुःखी आर्ताकरितां करितात !

गजू ! तुझ भाग्य मोठे म्हणून अशी आई तुला लाभली. आणखी काय सांगू ? तुझ्या व तुझ्या घरच्या माणसांच्या सगतीने आम्हाला देखील चांगले–वाईट, पूज्य–अपूज्य कळू लागले ”

सदूचे बोलणें चालले असतां, तो गहिवरला होता. माझ्याही डोळ्यांतून खळखळ अश्रु वाहात होते. आतां लगेच उठून घरीं जावे, असे मला वाटले. मी उठून उभा राहिलों. पण एकदम माझ्या डोळ्यापुढे अंधारी आल्यासारखें झालें. माझे पाय थरथर कापू लागले !

सदूने माझी मन:स्थिति जाणली. माझा दंड धरून तो हळू हळू मला घराकडे नेऊ लागला वाटेंत एक दोन प्रेतें जळत असलेलीं मला दिसलीं. तेव्हां पुन्हा थोडी चक्कर डोळ्यापुढे आली. तरी मी चालत होतों ! आता आमचे बोलणे बंद होते. काय बोलावे, हेंच मला कळत नव्हतें. वडिलाची प्रकृति इतकी बिघडलेली असेल, ह्याची मला कल्पना नव्हती. मी चांगला धट्टाकट्टा असून मला वडिलाची सेवाचाकरी करितां येत नव्हती. परिस्थितीमुळे असहाय होऊन मी परक्या ठिकाणीं पडलो होतों. तेव्हां आतां घरीं राहून वडील-मातुश्रीची सेवा करावयाची, असा निश्चय मनातले मनांत मी करीत आहें, इतक्यात आम्ही घर गाठले.

* * *

इतके सांगून मी त्यादिवशींची कहाणी संपविली व आपल्या खोलीकडे लागलींच निघालों.

जातांना सुलभाच्या तोंडचे पुढील शब्द मला ऐकू आले—

“ आई ! गोष्ट सांगतांना भाऊना फार फार कष्ट होत आहेत, असं दिसलं नाहीं का ग ? ”

———

## प्रकरण पंचविसावें

आम्ही जमलो, त्या वेळीं चंद्र पूर्वेकडे बराच वर आला होता. पन्नास वर्षांपूर्वीच्या त्या दिवसाची मला अगदीं ताजी आठवण होत होती. त्या गोष्टीला इतकीं वर्षे झालीं, तरी तो देखावा मूर्तिमत माझ्या नेत्रापुढें उभा राहात होता. मनानें किती जलद माणूस जाऊ शकतो, ह्याचा प्रत्यय मी घेत होतों. जणूं मी व सदू घरातील ओटीवरून बापूच्या बिछान्याजवळच जात आहोत, असे माझ्या मनाला भासत होते ! मी आता तोंडातून शब्द काढणार, इतक्यात सदानंद म्हणाला,

" भाऊ ! आतांचा प्लेग व त्या वेळचा प्लेग काहीं निराळा नव्हे. आता इनाक्युलेशन करून त्या रोगाचा प्रसार थांबविता येतो. त्या वेळीं तसा काहीं यत्न सरकार किंवा लोक ह्यानीं केला नाहीं का ? "

" सरकारचे संशोधन चालू झाले होतेच कीं ! " मी म्हटलें. " पण इनॉक्युलेशनचे प्रयोग अयशस्वी होत होते. लोकाना ह्या रोगावर उपाय सापडला नव्हता ! मोठमोठे वैद्यराज ह्या रोगापुढें हतबल होऊन गेलेले होते ! अद्यापही ह्या रोगावर इनॉक्युलेशनखेरीज दुसरा हमखास औषधी परिणामकारक उपाय सापडल्याचे माझ्या तरी ऐकिवात नाहीं ! "

शिवानंदही तोच विषय चालू ठेविण्याच्या विचारांत दिसला, त्या वेळीं त्याची आईच म्हणाली,

" बाई ! बाई ! कसली रे चर्चा मध्येंच काढलीत ! सासूबाईचे उदात्त जीवनचरित्र आपण ऐकतों आहोंत. गोष्ट ऐकत असतां डोळ्यातून सारखी

टिपे गळाल्याशिवाय राहात नाहींत ! इतकी ती हृदय हलवून सोडणारी गोष्ट आहे, ती ऐकत असतां उगीच भाकड गोष्टी कशाला काढतां ! ''

नंतर माझ्याकडे पाहात ती म्हणाली, '' चालू द्या पुढं ! ''

पत्नीची इच्छा जाणून मी एकदम माझ्या कहाणीस सुरवात केली. मी म्हटलें—

घाईघाईने मी घरात शिरलों. त्यावेळीं ताई स्वयंपाकांत गुंतली होती. शंभू बापूंचे पाय चेपीत होता. माझा शब्द कानीं पडतांच ते कष्टानें आंथरुणावर उठून बसले. मी त्यांच्या पायावर डोकें ठेवून त्यांचे पाय अश्रूंनीं न्हाणले.

नंतर आई कोठे आहे, याचा तपास मी करूं लागलों. मी आल्याचें पाहून ताईला आश्चर्याचा आणि भीतीचा धक्काच बसला ! ती मला म्हणाली,

'' गजू ! गावांत कशाला आलास ? गेला दिवस बरा, असं आम्हांला झालं आहे किती भयंकर दिवस आहेत हे ! ''

ताई आणखी पुढें बोलणार होती. पण माझें लक्ष तिच्या बोलण्याकडे नव्हतें. मी इकडे तिकडे पाहात आईला शोधीत होतों. मला घरात आई दिसेना, तेव्हां मी ताईला विचारलें--

'' आई कुठं आहे ताई ? रात्र पडूं लागली, तरी आई आपली बाहेरच ! ''

'' गजू ! येईल आतां आई ! '' ताई सचिंतपणे बोलली. '' आपल्या रामभटाचा तरणाताठा मुलगा रोगानें बळी पडला. दोन तीन दिवस त्याच्या सेवेला आई जात होती. रामभट गेले ! मुलगाही गेला ! मुलाची आई दुःखानें वेडी झालेली आहे ! तिकडेच कांहींतरी करीत असेल आपली आई ! पण गजू ! तूं इकडे येऊं नयेस, असेंच तिला वाटत होतें. तूं कशाला बरें आलास ? मी दशमी बांधून देतें. सदूच्या शेतातल्या झोपडींत जा निजायला ! नाहींतर, माझ्या सासरच्या मळ्यांतील वस्तींत तूं जा ! अशावेळीं भाऊजी व सासूबाई, तुला कांहीं म्हणणार नाहींत. त्यांनाही काळीज आहेच की ! ''

वडीलाचाही सल्ला तसाच पडला. पण इतक्यात घाईघाईनें आईच घरांत आली. तिला पाहातांच एक प्रकारचें पुण्याईचे दिव्य तेज तिच्या मुखावर तळपत आहे, असें मला वाटले. मी सद्गदित अंतःकरणानें तिच्या पायांवर डोके ठेविले. मला तिचे पाय बरेच उष्ण लागले ! मी विलक्षण चरकलों !

" गजू ! आलास घर झालं ! " आई गंभीरपणे म्हणाली, " दृष्टि भरून पाहून घेते मी तुला ! पण मला भडभडून येतंय हं ! अशा वाईट हवेत तूं असू नयेस, असं मला वाटत होत ! तूं आता सदूच्या झोपडीवर निजावयाला जा... "

तिने झटकन हातपाय धुऊन बापूच्या प्रकृतीची विचारपूस केली. माझी दशमी बांधली आणि सदूला कळवळून म्हणाली,

" सदू बाळ ! ने याला तुझ्याकडे ! तुझा भाऊच आहे हा ! सकाळीं तुम्ही यालच कीं ! मग काय बोलायच ते बोलू. "

" तस कांहीं नको. " मी म्हटले. " सगळीं तुम्ही घरीं आहांत. त्यांच्याच बरोबर माझें काय व्हायचें तें होईल ! आईवडिलांची सेवा मला रात्रभर तरी करूं द्या. "

इतक्यात मजजवळ असलेल्या वज्रटीकेची मला आठवण झाली. मी ती लगेच आईजवळ देऊं लागलों. ती आश्चर्यानें दिङमूढ होऊन गेली ! परमानंदानें तिचें मुख अधिकच तेजाळलें. ती माझ्या पाठीवर हात फिरवीत बोलली,

" गजू ! फार चांगली गोष्ट केलीस ! माझ्या मनातली धुगधूग गेली ! चिंता गेली ! ताईच्या सासरचा आलेला अपवाद गेला ! ताई ! हा तुझा दागिना घे, आणि दिराला तो देऊन टाक. त्यांनीं आमच्या माघारीं उगींच काढलेलीं उणीं उत्तरे विफळ झाली, हें त्यांच त्यानाच समजेल. "

आई आणि बापू ह्याना माझ्या या कृत्यानें अत्यंत हर्ष झाला. त्यांनीं

विचारल्यावरून वज्रटीक मला कशी मिळाली, ही हकीकत मी त्यांना सांगितली सारेजण विस्मय चकित झाले !

पण नतर मला मात्र सर्वांच्या आग्रहावरून सदूच्या झोपडींत झोपण्याकरिता जाणे भाग पडले.

पण तेथे मला रात्रभर झोप लागली नाहीं. सारखी आईच माझ्या नजरेपुढें येत होती.

प्रातःकाळीं लवकर उठून आम्ही घरीं गेलो. ताईला दरवाजांत पाहातांच तिचें मुख काळवडलेले दिसलें. आगणातील गाईच्या स्वच्छ गोठ्यांतच आईने आपले आथरूण टाकलेले होते. तिला ताप फणफणून भरलेला होता. गाठ उठली होती. तिचे भवितव्य तिला समजलें होतें.

ही गोष्ट ताईनें बापूना कळू दिली नव्हती. ताई आईला औषधपाणी देण्याचे कष्ट रात्रभर करीत होती. तिच्या डोळयास डोळा लागला नव्हता. आपल्या जीविताकडे लक्ष न देतां ताई आईची सर्व उस्तवारी अत्यंत काळजीपूर्वक करीत होती.

आईच्या आजाराची वार्ता गावभर पसरण्यास वेळ लागला नाहीं. दोन दिवस ती मुळींच शुद्धीवर नव्हती. नतर ती चागली शुद्धीवर आली, असें मला दिसू लागलें. पण जाणते लोक म्हणू लागले, तिला ज्ञानवायु झासेला आहे !

झोपड्यात राहिलेले लोक निर्भयपणें समाचार घेऊन जात होते. गावांतले उरलेले लोक तिच्या उशापायथ्याशीं बसलेले होते. ताईचे दीर जगाच्या लाजेकाजेस्तव्र का होईना, आईला भेटण्यास आले. तिनेंच हसतमुखाने त्याच्या स्वाधीन ती वज्रटीक केली ! त्याना मेल्यापेक्षां मेलें होऊन गेलें !

आई मला आणि शंभूला जवळ येऊ देत नव्हती. आपल्या मुलांना तरी हा आजार होऊ नये, हीच तिची इच्छा होती. पण आम्ही सर्व तिची करावयाची ती सेवा करीत होतोंच.

वडीलांना आईच्या आजाराची हकीकत कळल्यानंतर डोळ्यांत पाणी आणून ते म्हणाले,

" होतय ते ठीकच होतय ! ती साध्वी आहे, पतीच्या अगोदर ती वैकुंठाला जाणार ! "

ह्यानंतर त्याना अधिक बोलवेना.

वैकुंठ चतुर्दशीच्या दिवशींचा चंद्र डोक्यावर आला होता. आईच्या इच्छेवरून तिचे आंथरूण अंगणांत स्वच्छ जागीं घातले होतें. आम्ही मुलें व माझे जिवलग मित्र तिच्या सभोंवतीं बसलो होतो.

आकाश स्वच्छ होते. चांदण्या आमच्याकडे उत्सुकतेने पाहात होत्या. जणू माझ्या मातेकरिता स्वर्गात उत्कृष्ट स्थान राखून ठेविले आहे, असे त्या प्रसन्नपणे दर्शवीत होत्या ! हवेतील गोड थंडी आमची डोकीं शांत ठेवीत होती ! तेजस्वी सुधांशु शांतपणें पश्चिमेकडे चाललेला होता ! तोही माझ्या आईवर अमृताचे तुषारच फेकीत आहे, असे वाटत होतें !

आजचा दिवस पार पडला कीं आई उठणार, असेंच जो तो समाचारास येणारा म्हणत होता. रात्र संपून उजाडेल केव्हां, ह्याकडे आमचे लक्ष लागलेलें होते.

इतक्यात आईने डोळे उघडले. ताई तिला मात्रा चाटवीत होती. आई शुद्धीवर आल्यासारखी दिसली. मी तिच्या जवळ गेलो. ती खोल गेलेल्या आवाजात म्हणाली,

" गजू ! आता मी चाललें ! तुला अखेरचे काय सांगू ? तूच साऱ्यांचा आधार ! त्यांना आतां धीर दे ! ताई हीच आतां तुझी आई ! शंभू लहान आहे. त्याला सांभाळ....तू चांगला वाग. जगाच्या उपयोगी पड. तुला देव कुबेराचें ऐश्वर्य देईल... "

तिला आणखी बोलावयाचें होते. पण तिच्या तोंडून शब्दच बाहेर निघेनात.

सर्वत्र शांतता पसरली, मी शांतपणें आईचें डोकें मांडीवर घेतलें. आई तोंडातल्या तोंडात रामनामाचा जप करीत होती. आम्ही सारे **रघुपति राघव राजाराम पतित पावन सीताराम** हें भजन म्हणू लागलो.

" आलें !...आलें !...वैकुंठाचें विमान आलें !... " असलें कांहीं तरी आई अस्पष्टपणें बरळत होती !

तो वैकुंठ चतुर्दशीचा दिवस होता आणि ती पाहाटेची वेळ होती ! वैकुंठाचाच मार्ग आईला मोकळा झालेला आहे, अशी आमची समजूत होती.

झालें ! शेवटची घटका भरली ! आई रामरूप होऊन गेली ! विष्णुरूप होऊन गेली ! शिवरूप होऊन गेली !

**माझी आई वैकुंठाला गेली !**
**आईविना आम्ही पोरके झालों !**
**माझ्या मित्रानाही तसेंच वाटलें !**
**पुढचें वर्णन मी काय करूं !**

* * *

मलाही आतां बोलवेना. मी खालीं मान घातली होती. इतक्यांत सुलभाची आई बोलली,

" मुलांनो उठू या आतां. तोच वैकुंठचतुर्दशीचा दिवस आजचा. पाहाटेस गंगेवर स्नानाला जाऊं. महादेवाला बेल वाहू. तुमच्या आजीचें पुण्यस्मरण करूं. "

" भाऊ ! " सदानंद म्हणाला. " देवगावीं आपल्याच घरांत आमच्या आजीचें स्मारक करीत आहात, याची यथार्थता मला आज कळली. "

" होय ! " शिवानंदानें म्हटलें. " मरावें परी कीर्तिरूपें उरावें, हा समर्थांचा उपदेश आजींनीं बरोबर पाळला. अशा आदर्श महिला आर्य-संस्कृतीचें यथार्थ स्वरूप दाखवितात. भाऊ, तुम्ही हा इतिहास सांगितलात, त्यामुळें आमच्या घराण्याची उज्वल परंपरा आम्हांला कळली.

" मला पण फार वाईट वाटतं " माझी पत्नी म्हणाली, " मला सासूबाईंचा सहवास लाभण्याइतक भाग्य होतं कुठं ? "

" आई ! " सुलभानें डोळे पुशीत म्हटलें, " अग ! असं कसं म्हणतेस ? माझ्या आजीचेच अश भाऊ तुला लाभलेत ना ? तूही आमची आई कांहीं कमी नाहींस गुणान. तुझ व आमचेही नशीब थोरच कीं ! भाऊंच्या ह्या आठवणी सदानदान कशा सुंदर लिहून काढल्या आहेत ! मी पुनः पुनः त्या वाचीन म्हणते. "

इतक्यात सदानद म्हणाला, " भाऊ तुमच्या कहाणीचा एक टप्पा पुरा झाला. आता दुसरा केव्हां सुरू व्हावयाचा ? "

" होय ! " मी म्हटलें. " मी माझ्या देवगांवच्या मित्रांना उद्यां येथें बोलावलें आहे, आईचा श्राद्धदिन आहे. त्यासाठीं ते येणार आहेत."

" एवढी कथा आज पुरी झाली. पुढचें पुढें पाहू."

अस्तु.

# गजाभाऊ

## अभ्यास

— १ —

१. गजाभाऊची जन्मकथा सांगा. त्यावरून जुन्या माणसाच्या श्रद्धेविषयी तुम्हाला काय वाटतें ?

२ पूर्वी कूळ आणि जमिनीचे मालक याचे सबध कसे होते ? त्या वेळची लोकाच्या शरिरातील ताकद कशी होती ?

३ गजाभाऊने त्याच्या मित्राना चोरीबद्दल कोणता उपदेश केला ? त्याना तो का पटला नाही ? त्यामुळे गजाभाऊवर कोणती आपत्ति कोसळली ? त्यातून त्याची कशी सुटका झाली ?

४ गजाभाऊच्या व्रतबधात त्याच्या आई-वडिलानीं कोणती सामाजिक सुधारणा केली ? त्यांतील मुख्य हेतु कोणता ? त्याचा परिणाम कोणता झाला ?

५ गजाभाऊच्या ताईचे लग्न कोणत्या बिकट परिस्थितीत झाले ? त्याचा परिणाम कोणता झाला ?

६ जुन्या आचारविचाराच्या मागे कोणतें तत्त्व असते ? शाळेतील हुशारीमुळे गजाभाऊला दुसऱ्या मुलाकडून कसा त्रास झाला ? त्या प्रसंगी त्याच्या आईने त्याला कोणता उपदेश केला ?

७ गजाभाऊच्या स्मरणशक्तीची गोष्ट सागा " आधी कष्ट मग फळ " या विषयावर तीस ओळी निबध लिहा

— २ —

८ गजाभाऊने गोसेवा कशी केली ? त्याला गुड मुलांनीं कसा त्रास दिला ? त्याची बाजू न्याय्य आहे, हे कोणी व कसे ठरविले ?

९ " उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी " यावर तीस ओळी निबध लिहा

१० गजाभाऊच्या घरातील कोणासही पैशाचा मोह कसा पडला नाही, ही गोष्ट पच्चवीस ओळींपर्यंत थोडक्यात लिहा

११ गजाभाऊने घरातील उचललेल्या रुपयाचे परिणाम काय झाले ? गजूच्या वडिलांनी उपनिषदातील कोणती गोष्ट आपल्या पत्नीस सांगितली व ती का सांगितली ?

१२ १८९८ सालच्या दुष्काळातील जनतेची दैना वर्णन करा त्या वेळी गजाभाऊच्या घरी भाऊबदकी कशी शिरली ? तिची कारणें कोणती ? गजाभाऊच्या आईचा धीरगंभीर स्वभाव त्या वेळी प्रत्ययास कसा आला ?

१३ गजाभाऊच्या मेळ्याचे वैशिष्टय सांगा सर्वसामान्य समाज गजाभाऊचा चाहता का झाला ?

१४ मेळ्याची सांगता कशी झाली ? त्या वेळी गजाभाऊस कोणत्या गोष्टी कळल्या ?

— ३ —

१५. “ दुर्जनः प्रियवादी च नैतद्विश्वासकारणम् । ” गजाभाऊला हे सुभाषित केव्हा आठवले ? त्या वेळची परिस्थिति वर्णन करा

१६ गजाभाऊच्या वेळचे शाळेतील शिक्षण कशा प्रकारचें होतें ? गजाभाऊच्या पत्राची फसगत कशी व का झाली ?

१७. गजाभाऊच्या ताईवर दुःखाची आपत्ति कशी कोसळली ? त्या वेळी गजाभाऊच्या आईची वृत्ति कशी होती ? “ जगीं सर्व सूखी असा कोण आहे . ” हे गजाभाऊची आई का म्हणत असे ?

१८ ‘ पूर्व दत्तेषु या विद्या । पूर्व दत्तेषु यद्धनम् । ’ हे उद्गार कोणीं काढले ? तो प्रसंग कोणता ?

१९ जप्ती म्हणजे काय ? बापूच्या घरी कोणी जप्ती आणली ? का ? त्या वेळी त्याची गरज कोणी कशी भागविली ?

२० गजाभाऊस घर का सोडावे लागलें ? तो बेशुद्ध कसा झाला ? त्याला कोणाचा आश्रय कसा मिळाला ?

२१ गजाभाऊचे वडील ज्या खेड्यात गेले, तेथील परिस्थितीचें वर्णन करा

२२ ताईच्या दागिन्याची परवड कशी झाली? शेवटी त्याचा परिणाम कोणता झाला?

२३ प्लेगचा रोग तेव्हा कसा पसरे? त्या साथीत गजाभाऊच्या आईनें रोग्याची सेवा कशी केली? त्याचा परिणाम कोणता झाला?

२४. गजाभाऊचे मित्र कोणते? त्याच्या स्वभावाचे वर्णन करा

— ४ —

२५ गजाभाऊच्या आईचें स्वभावचित्रण तीस ओळीत लिहा

२६ गावातील तटेबखेडे कसे उत्पन्न होतात? त्याची कारणे कोणती?

२७ गजाभाऊच्या लहानपणची खेड्यातील सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक व राजकीय स्थिति कशी होती, ते स्पष्ट करा

२८ गजाभाऊच्या वडिलाचे चरित्र थोडक्यात लिहा

२९ तुम्हाला गजाभाऊत कोणते विशेष गुण आढळले? ते प्रसंग सांगा त्याच्या आईच्या उपदेशाचाही त्याच्यावर कसा परिणाम होत होता?

३० गजाभाऊच्या लहानपणी गावच्या शेतकऱ्याच्या मुख्य गरजा कोणत्या होत्या? त्याच्या उपयोगी गजाभाऊचें घर कसे पडत होतें?

३१ गजाभाऊच्या आईच्या स्वभावात सामाजिक समता कशी मुरली होती, तें उदाहरणानीं स्पष्ट करा.

३२ गजाभाऊसारखा तुमच्या माहितीचा मुलगा असल्यास त्याची माहिती तीस ओळींपर्यंत लिहा

३३. गजाभाऊच्या या आत्मचरित्रात कोणती सुभाषिते आलेलीं आहेत? ती त्या त्या प्रसंगास अनुरूप कशी आहेत, ते स्पष्ट करा

३४ गजाभाऊच्या तालमीच्या नादाचे पर्यवसान कशात झाले? का झालें?

३५ गजाभाऊच्या आईचा उपदेश तुम्हास कोणता आवडला? तो का आवडला? गजाभाऊच्या आईची योग्यता वर्णन करा

---